# महाराष्ट्रांतील राष्ट्रवादाचा विकास

लेखिका

**नलिनी पंडित**

प्राध्यापिका, पोदार कॉलेज

ऑफ कॉमर्स, माटुंगा

**मूल्य ५ रुपये**

# नि वे द न

भारतीय स्वातंत्र्यचळवळीच्या निमित्तानें गेल्या शंभरदीडशें वर्षांत महाराष्ट्रांत जे विचारप्रवाह निर्माण झाले, त्यांचें विश्लेषण व मूल्यमापन करण्याचा मी या पुस्तकांत प्रयत्न केला आहे. या काळांतील महत्त्वाच्या सामाजिक व राजकीय घटना सर्वांच्या परिचयाच्या आहेत. म्हणून वेगवेगळ्या प्रवृत्तींच्या यशापयशाची मीमांसा करतांना या घटनांचा जरूर तेथें नुसता निर्देश करून बाकीचा तपशील मी मुद्दामच वगळला आहे. या ग्रंथांत राष्ट्रवादाच्या उदयाचा व उत्कर्षाचा इत्थंभूत इतिहास देण्याचा माझा हेतु नसून त्यांतील निरनिराळ्या विचारप्रवृत्तींचा आशय व परस्परसंबंध शोधण्याचाच फक्त उद्देश आहे. म्हणून पुढील विवेचनांत प्रत्येक विचार-संप्रदायांतील चारदोन व्यक्तींचाच उल्लेख केलेला आहे. मात्र त्या संप्रदायांतील इतर व्यक्तींचें कार्य कमी प्रतीचें आहे असें मी मानीत नाहीं. सन १९४७ नंतरच्या घडामोडी फार नजीकच्या काळांतील असल्यानें त्यासंबंधीं आजच कांहीं निर्णायक मत देणें इष्ट नाहीं. म्हणून त्यांचा मी या पुस्तकांत समावेश केलेला नाहीं.

महाराष्ट्रांतील राष्ट्रवादी चळवळ ही भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचीच एक आघाडी आहे. भारतांतील निरनिराळ्या विचारप्रवाहांचें परिशीलन करावयाचें झाल्यास त्यासाठीं सर्व प्रादेशिक भाषांतील वाङ्मयाचा अभ्यास हवा. माझा तेवढा अभ्यास व अधिकार नसल्यानें मी स्वतःच्या प्रांतापुरतेंच मर्यादित क्षेत्र निवडलें आहे. सन १९२० पर्यंत महाराष्ट्रांतील पुढारी अखिल भारतीय राजकारणांत अग्रगण्य होते. त्यानंतरहि महाराष्ट्रानें राष्ट्रसभेच्या धोरणास साथ दिलेली आहे. शिवाय राष्ट्रसभेच्या बाहेर ज्या संघटना व प्रवृत्ति निर्माण

झाल्या त्यांनाहि महाराष्ट्रामधून अनेक प्रवक्ते मिळाले आहेत. म्हणून महाराष्ट्रांतील विचारप्रवृत्तींच्या या आढाव्यावरून अखिल भारतीय विचार-प्रवृत्तींचीहि स्थूल मानानें कल्पना येईल अशी आशा आहे.

माझा वैचारिक पिंड आतांपर्यंत प्रा. गं. बा. सरदार यांच्या शिकवणींतून घडलेला आहे. या पुस्तकाच्या कामांतहि मी त्यांचें मार्गदर्शन घेतलें आहे.

पोदार कॉलेजमधील माझे सहकारी प्रा. भा. शं. भणगे यांनीं स्नेह-भावानें या पुस्तकाचें हस्तलिखित वाचून कांहीं सूचना केल्या त्याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतें. साधना प्रेसनें आपुलकीनें या पुस्तकाची छपाई समाधानकारक करून दिली. श्री. प्रभाकर गोरे यांनीं मुखपृष्ठ तयार करून दिलें. याबद्दल मी या सर्वांची अत्यंत आभारी आहें.

बांबुळी–निवास,
माहीम, मुंबई १६
१ मे १९५५

**नलिनी पंडित**

# अनुक्रमणिका

: १ :

# नव्या युगांतील नव्या जाणिवा

**राष्ट्रवाद** ही आजच्या युगांतील एक प्रभावशाली प्रेरणा आहे. जगांतील पुढारलेल्या आणि मागासलेल्या देशांच्या आधुनिक इतिहासांत या प्रेरणेची अपूर्व करामत आपणांस दिसून येते. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी यांसारख्या युरोपीय देशांत जीं आर्थिक स्थित्यंतरें घडून आलीं, ज्या राज्यक्रान्त्या झाल्या, सामाजिक पुनर्घटनेचे जे प्रयोग झाले त्यांत कमजास्त प्रमाणांत राष्ट्रीयत्वाची भावनाच अनुस्यूत आहे. अलीकडे आशिया खंडांत सामाजिक पुनरुत्थानाची जी प्रचंड लाट उसळली आहे, तिचें प्राणतत्त्वहि राष्ट्रवाद हेंच आहे. राष्ट्रवादी विचारसरणीप्रमाणें राष्ट्र हा मानवसमाजाचा स्वाभाविक, स्वतंत्र व स्वयंपूर्ण घटक आहे. एकाच प्रदेशांत राहणाऱ्या लोकांच्या सामूहिक जीवनाचें व जाणिवांचें ऐक्य आणि इतर देशांतील लोकांहून त्यांचें वेगळेपण यांवर ‘राष्ट्र’ कल्पनेची उभारणी झालेली आहे. मात्र या एकतेचें, या पृथगात्मतेचें नेमकें अधिष्ठान कोणतें? राष्ट्राराष्ट्रांतील परस्पर-संबंधांचें नियामक तत्त्व कोणतें? इत्यादि प्रश्नांबद्दल राष्ट्रवादी विचारवंतांतहि एकमत नाहीं. तसें म्हटलें तर राष्ट्रवाद हें कांहीं एक सुसंबद्ध व मूलगामी तत्त्वज्ञान नव्हे; तो केवळ एक विशिष्ट दृष्टिकोन आहे. प्रत्येक देशांतील नेते व नागरिक आपल्या पुढील प्रश्न सोडवितांना जे उपाय योजतात, जीं साधनें

निवडतात, जे मार्ग अनुसरतात त्यांवरून त्यांच्या राष्ट्रवादाचें स्वरूप निश्चित होतें; आणि उदारमतवाद, व्यक्तिवाद, समाजवाद, फॅसिझम, सर्वोदयवाद यांसारख्या एकाद्या स्वयंपूर्ण तत्त्वज्ञानाचा आशय त्यांत भरला जातो. राष्ट्रवाद्यांचें तत्त्वज्ञान जरी कोणतेंहि असलें, तरी त्यांचें लक्ष नेहमीं राज्यसंस्थेवर केंद्रित झालेलें असतें. आपलें तत्त्वज्ञान प्रत्यक्षांत आणण्यासाठीं प्रथम संघटितपणें राज्ययंत्र ताब्यांत घेण्यास ते उत्सुक असतात. त्यामुळें त्यांच्या विचारप्रणालींत साहजिकच राजकारणाला अग्रस्थान मिळतें. त्यांची धर्ममीमांसा, साहित्यसमीक्षा, अर्थसिद्धान्त, नीतिमूल्यें व कलोपासना यांवर त्यांच्या राजकीय संप्रदायाचा ठसा उमटतो. मात्र समाजजीवन सलग व एकसंध असल्यामुळें या सर्व क्षेत्रांतील विचारप्रवाहांचा पुन्हां राजकीय क्षेत्रावर परिणाम झाल्याखेरीज राहात नाहीं. या क्रिया—प्रतिक्रियेंतूनच नेहमीं राष्ट्रवादाची घडण होते. तेव्हां राष्ट्रवादाचा इतिहास म्हणजे सत्तासंपादनास प्रेरक व पोषक होणाऱ्या सामाजिक प्रवृत्तींचाच इतिहास होय.

## ब्रिटिश पूर्वकाल

इंग्रजी राज्याच्या स्थापनेनंतरच भारतांतील निरनिराळ्या प्रदेशांत राष्ट्रवादी प्रवृत्ति रुजल्या आणि वाढीस लागल्या. त्यापूर्वीं आपल्या देशांतील लोकांत सामाजिक ऐक्याची जाणीव कायम राखण्यास धर्म व संस्कृति यांचा बराच उपयोग झाला. हिंदू धर्म व भारतीय संस्कृति यांच्या सर्वसंग्राहकतेमुळें आपल्या लोकजीवनांत ग्राम, वतन, जाति, पंथ यांसारख्या अनेक पुरातन व स्वयंपूर्ण संस्था शतकानुशतकें एकत्र नांदत होत्या; आणि लोकांच्या दैनंदिन व्यवहाराशीं त्यांचा प्रत्यक्ष संबंध होता. आपआपल्या क्षेत्रांत या संस्थांची हुकमत स्वयंसिद्ध व अनियंत्रित असल्यामुळें त्यांच्यांतील फुटीर प्रवृत्तीच धार्मिक व सांस्कृतिक ऐक्याहून अधिक प्रभावी ठरल्या; आणि आपलें समाजजीवन सुसूत्र व एकात्म न बनतां विस्कळीत व समुच्चयात्मक राहिलें. जाति, गांवें आणि पंथ हे समाजाचे सुसंघटित विभाग होऊं शकले नाहींत. उलट हिंदू समाजालाच या अठरा धान्यांच्या कडबोळ्याचें स्वरूप प्राप्त झालें. मुसलमानांच्या स्वाऱ्यांना तोंड देण्यासाठीं पुष्कळदां हिंदू राजे एकत्र आले हें खरें; परंतु त्यांच्या प्रतिकारांत इस्लामच्या कडव्या अनुयायांतील

एकजिनसीपणा व एकजूट यांचा लवलेशहि नव्हता. परधर्मीय आक्रमणाविरुद्ध जरी त्यांनीं संयुक्त आघाडी उभारली असली, तरी त्यांच्या ठिकाणीं धर्मनिष्ठेपेक्षां आत्मसंरक्षणाची आणि संस्कृतिप्रेमापेक्षां वैयक्तिक हितसंबंधाची भावनाच प्रबल होती. त्यामुळें मुसलमानांच्या जोरदार चढाईपुढें मोठमोठ्या बलाढ्य हिंदू राज्यांचाहि टिकाव लागला नाहीं.

महाराष्ट्राची भौगोलिक व सामाजिक परिस्थिति इतर प्रांतांहून जरा निराळी होती. म्हणून येथील लोकांना मुसलमानी आक्रमणाची लाट परतविण्यांत यश मिळालें. तेराव्या शतकाच्या उत्तरार्धांत महानुभाव आणि वारकरी हे दोन धर्मपंथ उदयास आले; आणि चक्रधर–ज्ञानेश्वरांसारख्या महाभागांच्या पुण्याईमुळें महाराष्ट्रांत एक स्वतंत्र वाङ्मयीन व सांस्कृतिक परंपरा निर्माण झाली. प्रादेशिक भाषेच्या अभिमानामुळें व उपासनेमुळें सामाजिक ऐक्याला हळुहळू आकार येऊं लागला. भक्तिसंप्रदायांतील उदारतेच्या, समतेच्या व बंधुभावाच्या भूमिकेमुळें सामाजिक जीवनांतील फुटीर प्रवृत्तींना अंशतः आळा बसला. त्यानंतर तीन साडेतीन शतकें जरी दक्षिणेंत मुसलमानांचा अंमल चालू होता, तरी येथें ते अगदींच अल्पसंख्य असल्यानें जुन्या सत्ताधारी वर्गाशीं त्यांना वारंवार जुळतें घ्यावें लागलें. इतकेंच नव्हे तर त्यांच्यांतील दुफळीचा फायदा घेऊन येथील सरंजामदार वर्ग उत्तरोत्तर जास्त प्रबळ होत गेला; आणि त्यांतूनच पुढें मराठेशाहीची स्थापना झाली. शिवाजीच्या कर्तृत्वामुळें भाषिक व प्रादेशिक ऐक्याला राजकीय स्वायत्ततेची जोड मिळाली; व आजच्या अर्थानें जरी लोकांत एकराष्ट्रीयत्वाची जाणीव निर्माण झाली नाहीं, तरी मराठी राज्य, महाराष्ट्रधर्म यासारख्या नव्या संज्ञा रूढ व सर्वमान्य झाल्या.

पेशव्यांच्या अमदानींत स्वराज्याची साम्राज्यांत परिणति झाली. मुलुखगिरीमुळें इतर प्रांतांतील संपत्तीचा ओघ हळुहळू महाराष्ट्राकडे वळला. समाजांतील सर्वच थरांत थोडेंबहुत चैतन्य सळसळूं लागलें. मराठेशाहीच्या वाढत्या पसाऱ्यामुळें ग्रामजीवनाची जुनी ठराविक चाकोरी सोडून स्वतंत्रपणें कर्तृत्व गाजविण्याची पुष्कळांना संधि लाभली. कोंकणांतील ब्राह्मणांनीं रणांगणांत समशेर गाजवून हिंदुस्थानच्या राजकारणाचीं सूत्रें हातीं घेतलीं. मावळांतील शेतकरी शिलेदार बनले; आणि दिल्लीच्या दिशेनें त्यांनीं दौड

आरंभिली. अशा तऱ्हेनें कांहीं थोड्या व्यक्तींच्या आयुष्यांत जरी फार मोठें स्थित्यंतर घडून आलें तरी खेड्यापाड्यांतील लक्षावधि लोकांच्या जीवनाची जुनी चौकट अभंग राहिली; आणि हिंदुसमाजरचनेंतील मूलतत्त्वांना यत्किंचितहि धक्का बसला नाहीं. ग्रामसंस्था आणि जातिसंस्था यांच्या उभ्या-आडव्या धाग्यांनीं आपला सामाजिक जीवनपट विणला गेला होता. एकाच गांवांत राहणाऱ्या निरनिराळ्या जातीच्या लोकांना शेतीच्या कामासाठीं सहकार्य करावें लागे; आणि एकाच जातीचे लोक अनेक गांवांत विभागले गेले तरी विवाहसंस्थेच्या द्वारें एकत्र येत. ग्रामसंस्थेचा तुटकपणा जातिसंस्थेमुळें थोडा कमी होई; आणि जातीयतेची संकुचित वृत्ति घालविण्यास गांवगाड्यांतील सहकार्य उपयोगी पडे. स्वयंपूर्ण ग्रामसंस्थेचा मध्यवर्ती राजसत्तेशीं संबंध जोडण्याचें काम लहानमोठे वतनदार करीत. मात्र वतनदारांचे हक्क आणि कर्तव्यें परंपरेनें ठरलेलीं असल्यामुळें राज्यकर्त्यांमध्यें बदल झाला तरी ग्राम-जीवनांत कधीं उलथापालथ होत नसे. मराठेशाहींतील राजकीय आंदोलनानें लोकजीवनावरील या पुरातन संस्थांची पकड बिलकूल ढिली पडली नाहीं; आणि इंग्रज येथें येईपर्यंत आर्थिक क्षेत्रांत वतनदारी व सामाजिक क्षेत्रांत जातिभावना यांचें वर्चस्व अबाधित राहिलें.

समाजव्यवस्थेंतील या स्थितिशीलतेस पोषक होईल असेंच आपलें भारतीय तत्त्वज्ञान आहे. आपल्या अध्यात्मपरंपरेंत बाह्यजीवन आणि अंतर्जीवन यांची फारकत असल्यामुळें जीवितसाफल्याची आपली कल्पना व्यक्तिनिष्ठ व समाजनिरपेक्ष आहे. हिंदू धर्मशास्त्रांप्रमाणें समाजसंस्था शाश्वत व ईश्वरनिर्मित असल्यामुळें सामाजिक प्रगतीला हातभार लावण्याची व्यक्तीवर जबाबदारी पडत नाहीं. ऐहिक जीवनांतील सुखदुःखें हीं त्या त्या व्यक्तीच्या पूर्वकर्मांचीं फळें आहेत असें मानल्यामुळें बहुजनसमाजाचें दैन्य व दुःख योजनापूर्वक नाहींसें करण्याचा प्रश्नच उद्भवला नाहीं. म्हणून मोक्षप्राप्तीसाठीं जरी सर्व साधुसंतांनीं चित्तशुद्धीचा, आत्मौपम्यदृष्टीचा, भूतदयेचा आणि परोपकाराचा उपदेश केला, तरी त्यांत सामूहिक प्रयत्नांचा कधीं अंतर्भाव झाला नाहीं. म्हणून मराठेशाहींत खालच्या वर्गांतील लोकांच्या वैयक्तिक आकांक्षा वाढल्या, पण त्यांना सामाजिक हक्कांची जाणीव झाली नाहीं. चारदोन असामान्य

व्यक्तींना जरी राज्यपद मिळालें, पांचपन्नास घराणीं जरी नांवलौकिकास चढलीं, तरी एकंदर समाजाची पातळी कांहीं उंचावली नाहीं. म्हणून दीडशें वर्षांच्या मराठ्यांच्या ह्या वैभवशाली इतिहासांत राजकीय दृष्ट्या जरी प्रचंड घडामोडी झाल्या, तरी विचारसृष्टींत त्यांचे पडसाद उमटले नाहींत; व अर्थव्यवस्थेंतहि कांहीं बदल झाला नाहीं. व्यक्तिजीवनांतील परिवर्तनाचा जुन्या सामाजिक जाणिवांशीं कधीं विरोध आला नाहीं; आणि सर्वसामान्य लोकांत सामाजिक कर्तव्यनिष्ठा कधीं उत्पन्न झाली नाहीं. कुळाची प्रतिष्ठा, जातीची शुद्धता, वतनाचा अभिमान या मध्ययुगीन कल्पनांतच लोक अखेरपर्यंत गुंतून राहिले. म्हणून महाराष्ट्रीयत्वाच्या वा मराठेपणाच्या भावनेचा योग्य परिपोष होऊं शकला नाहीं. स्वराज्य गेल्यामुळें पुष्कळांना दुःख झालें असेल. पण सामाजिक पराभवाची किंवा राष्ट्रीय मानहानीची कुणालाच खंत वाटली नाहीं. वैयक्तिक नुकसानीबद्दलच जो तो हळहळत होता.

## नव्या राजवटीचे परिणाम

इंग्रजांची राजवट सुरू झाल्यावर कायदा आणि व्यक्तिस्वातंत्र्य, विज्ञान आणि यंत्रव्यवसाय यांवर आधारलेल्या प्रगमनशील पाश्चात्य संस्कृतीशीं आपला निकट संबंध आला. साहजिकच येथील समाजजीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत त्याचे कमीजास्त परिणाम दिसूं लागले. लष्करी सामर्थ्य, औद्योगिक प्रगति, वैचारिक स्वातंत्र्य व सामाजिक नीतिमत्ता इत्यादि सर्व बाबतींत ब्रिटिश लोक आपल्याहून वरचढ होते. त्यामुळें हिंदुस्थानांतील इतर प्रांतांप्रमाणें महाराष्ट्रांतहि त्यांनीं लौकरच आपलें बस्तान बसविलें. जुलूमजबरदस्तीनें जनतेला लुबाडणाऱ्या भिल्लरामोश्यांचा बंदोबस्त करून शासनसंस्था व शेतकरी यांच्यांतील प्रतिष्ठित व पिढीजात मध्यस्थहि त्यांनीं क्रमाक्रमानें नाहींसे केले. त्याबरोबर वंशपरंपरागत अधिकार व जबाबदाऱ्या मागें पडून वैयक्तिक हक्क व कर्तव्यें यांनीं त्यांची जागा घेतली; आणि जन्मसिद्ध श्रेष्ठत्वाच्या व शाश्वत समाजरचनेच्या कल्पनेला हादरा बसला. इंग्लंडमधील लोकशाहीच्या व सनदशीरपणाच्या परंपरेमुळें तेथील शासनसंस्थेविषयींच्या कल्पना पुष्कळच पुढारलेल्या होत्या. त्यामुळें हिंदुस्थानच्या पिळणुकीला कायदेशीर स्वरूप देण्याची इंग्रजांनीं दक्षता घेतली. भोंवतालची परिस्थिति लक्षांत घेऊन त्यांनीं आपल्या मूळच्या उदार

व समतावादी मूलतत्त्वांना स्वार्थबुद्धीनें वेळोवेळीं मुरड घातली, तरी देखील जुन्या राज्यकर्त्यांच्या तुलनेनें त्यांची वागणूक लोकांना खूपच न्यायाची व निःपक्षपातीपणाची वाटली. देशांतील बहुसंख्य शेतकरी स्वभावतःच शांतताप्रधान व राजकीय घडामोडीबद्दल उदासीन होते. पेशवाई गेल्यामुळें त्यांच्या मनांत कांहीं चलबिचल झाली नाहीं. मात्र एकाएकीं निराधार बनलेले जहागिरदार व शास्त्रीपंडित यांना हें सत्तासंक्रमण अनिष्ट व तापदायक वाटलें. सर्वसामान्य जनतेवर या दोन्ही वर्गांची बरीच छाप होती. म्हणून सुरवातीस एल्फिन्स्टन प्रभृति अधिकाऱ्यांनीं त्यांना हाताशीं धरलें; व त्यांच्यामधील असंतोष कमी व्हावा म्हणून त्यांचीं इनामें व दक्षिणा पूर्वी-प्रमाणें चालू ठेवण्याचीं आश्वासनें दिलीं.† शिवाय राज्यकारभाराच्या सोयीसाठीं मध्यमवर्गांतील लोकांना इंग्रजी शिक्षण देऊन नवा नोकरपेशा वर्ग त्यांनीं अस्तित्वांत आणला. पाश्चात्य शिक्षणपद्धतीच्या द्वारें या वर्गांत आधुनिक कल्पनांबद्दल निष्ठा उत्पन्न करून आपल्या राजसत्तेला त्यांनीं नैतिक अधिष्ठान मिळविलें. परकीय कारखानदारांची दलाली करून गब्बर होण्याची संधि मिळाल्यामुळें व्यापारी वर्गहि स्वाभाविकपणेंच कंपनीसरकारला अनुकूल होता. ह्या दोन्ही वर्गांचें पाठबळ मिळतांच जुन्या वर्गाला दूर सारण्यास सरकारला अडचण पडली नाहीं.

इंग्रजी विद्येचें प्रवेशद्वार जरी सर्व वर्गांना खुलें होतें, तरी शतकानुशतकें ज्यांना विद्येची मिरास व परंपरा लाभली होती, त्या वर्गांनींच त्या सवलतीचा आधीं फायदा घेतला. पेशवाईत राज्यकारभारांत ब्राह्मण वर्गाचाच भरणा अधिक होता; म्हणून इंग्रजी शिक्षण घेऊन तयार झालेल्या लोकांतहि त्यांचीच संख्या जास्त आढळल्यास नवल नाहीं. पैशाच्या कमतरतेची सबब पुढें करून सरकारनें बहुजनसमाजाच्या शिक्षणाची तरतूद केली नाहीं. म्हणून नव्या अमदानींत वरिष्ठ वर्णाच्या विद्येच्या मिरासदारीला जरी तत्त्वतः हरताळ फासला गेला, तरी इंग्रजी शिक्षणाचें व आधुनिक विचारांचें लोण खेड्यापाड्यापर्यंत

---

† Colebrooke *Life of Mount Stuart Elphinstone,* **Vol. II, P. 74.**

जाऊन पोहोंचलें नाहीं. जिल्ह्यांचीं मुख्य ठिकाणें व कांहीं तालुक्यांचीं शहरें येथपर्यंतच त्याचा मोठ्या मिनतवारीनें प्रसार झाला.

पाश्चात्य विद्येचें शिक्षण घेणाऱ्या ह्या मूठभर पांढरपेशा लोकांमध्यें इंग्रजांच्या सहवासानें व अनुकरणानें नव्या जाणिवांचा व आकांक्षांचा उदय झाला. इंग्लंडचा इतिहास, पाश्चात्य समाजसंस्था व युरोपीय विचारसंप्रदाय यांच्या अध्ययनानें त्यांना आधुनिक जगाचें प्रथमदर्शन घडलें. जुन्या रूढ प्रवृत्तींची विकलता व नव्या प्रगतिशील विचारांचें सामर्थ्य यांच्यांतील विरोध त्यांना तीव्रतेनें जाणवला; आणि इंग्रजांच्या अनुकरणाची प्रवृत्ति बळावून त्यांच्या बोलण्याचालण्यांत व आचारविचारांत झपाट्यानें फरक पडूं लागला. खेड्यापाड्यांतील बहुसंख्य जनतेचें जीवन मात्र पूर्वीच्या चाकोरींत रेंगाळत होतें. दळणवळणाचीं साधनें अस्तित्वांत आलीं नसल्यामुळें ग्रामसंस्था अजून तग धरून होत्या. इंग्रजी राज्यांतील शांतता, कायद्याचें अधिराज्य, व रयतवारी पद्धति शेतकऱ्यांच्या फायद्याचीच होती. शिवाय शेंकडों वर्षांच्या संस्कारामुळें 'आलीया भोगासी असावें सादर' अशा भावनेनें बाह्य परिस्थितीशीं नेहमीं जुळतें घेण्याची प्रवृत्ति त्यांच्या हाडीमांशीं खिळली होती. म्हणून यंत्रसंस्कृतीमुळें शहरवासीयांत घडून येणाऱ्या विचारप्रवर्तनाची त्यांना ओळख पटली नाहीं. इंग्रजांचें अनुकरण करणाऱ्या मूठभर सुशिक्षितांकडे खेड्यापाड्यांतील बहुजनसमाज विस्मयानें, भीतीनें व साशंकतेनें पाहूं लागला; आणि सुशिक्षितांचें व अशिक्षितांचें, शहरवासीयांचें व खेडुतांचें अशीं दोन जगें अगदीं निराळीं झालीं. त्यांतच सरकारी अंमलदारांची संकुचित बेजबाबदार वृत्ति व खिस्ती मिशनऱ्यांची धर्मप्रसाराची चळवळ यांची भर पडली. त्यामुळें मध्यमवर्ग व जनता यांच्यांतील ही दरी जास्तच रुंदावत जाऊन त्यांच्या स्वाभाविक संबंधांत कृत्रिमता आली. म्हणून शहरवासीयांतील या विचार-परिवर्तनाचा खेड्यांतील जीवनावर यत्किंचितहि परिणाम झाला नाहीं.

## मध्यमवर्ग आणि विचारक्रान्ति

महाराष्ट्रांतील राष्ट्रवादाचा इतिहास हा मुंबई येथील सुशिक्षित मध्यम-वर्गाच्या बदलत्या जाणिवांचा इतिहास होय. शाळा आणि कॉलेजें, वृत्तपत्रें आणि मासिकें, सभा आणि संमेलनें व व्याख्यानें आणि ठराव ह्यांत भाग

घेणाऱ्या बहुसंख्य व्यक्ति ह्याच वर्गांतील होत्या. सुधारणावाद, राष्ट्रवाद, बुद्धिवाद, व्यक्तिवाद, उदारमतवाद व मानवतावाद इत्यादि प्रवृत्तींचा ह्याच वर्गानें पुरस्कार केला; व त्यांच्यांतील झगडेहि अहमहमिकेनें चालविले. सुधारकहि तेच आणि सनातनीहि तेच; जहालहि तेच आणि मवाळहि तेच; व्यक्तिवादाची तुतारी फुंकणारे तेच आणि राष्ट्रवादाची नौबत झडविणारेहि तेच. त्यामुळें ह्या सर्व चळवळींच्या कार्यक्षेत्रांना आपोआप मध्यमवर्गीय जीवनाच्या आणि कल्पनांच्या मर्यादा पडल्या. त्यांच्या प्रवर्तकांना बहुजनसमाजाच्या सुखदुःखांशीं समरस होतां आलें नाहीं; आणि बहुजनसमाजालाहि या चळवळीबद्दल तेवढी उत्सुकता वाटली नाहीं. अर्थातच गेल्या सव्वाशें वर्षांतील निरनिराळ्या चळवळींचें संगोपन व मूल्यमापन उच्चवर्णीय प्रवक्त्यांकडून व उच्चवर्णीय कार्यकर्त्यांसाठींच झालें. त्यामुळें त्यांचे पूर्वग्रह व हितसंबंध यांची येथील विचारक्रांतीवर दाट छाया पडल्याखेरीज राहिली नाहीं.

महाराष्ट्रांतील सामाजिक स्थित्यंतराला ज्या काळीं सुरवात झाली, त्याकाळीं इंग्लंडांतील औद्योगिक क्रांतीचा कालखंड संपत आला होता. नव्या उद्योगप्रधान अर्थव्यवस्थेंत जे वर्ग जुन्या सत्ताधाऱ्यांशीं झगडून विजयी झाले, त्यांनीं आपलें स्वतःचें खास तत्त्वज्ञान निर्माण केलें होतें. इंग्रजी शिक्षणाबरोबर येथील मध्यमवर्गीय विचारवंतांनीं तें तत्त्वज्ञान प्रथम बुद्धीनें आत्मसात् केलें; आणि येथील परिस्थितीशीं त्याची सांगड घालण्याचा प्रयत्न आरंभिला. युरोपमध्यें परिस्थितीच्या प्रवाहांत सामाजिक प्रगतीला पोषक अशा नव्या प्रवृत्ति जन्म पावत; आणि त्यांच्या जोरावर तेथील समाजस्थितींत पुन्हां परिवर्तन घडून येई. महाराष्ट्रांत अशा स्वाभाविक विकासक्रमाला वाव नव्हता. महाराष्ट्रांतील मध्यमवर्गाच्या आकांक्षांना पोषक असें तत्त्वज्ञान युरोपांत आधींच विकास पावलें होतें. येथील अपरिपक्व परिस्थितींतहि एतद्देशीय विचारवंतांना परदेशांतील तर्कशुद्ध विचार जसेच्या तसे स्वीकारण्याचा मोह होणें साहजिक होते. म्हणून युरोपीय विचारप्रवाहांच्या अनुरोधानें महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं आपल्या विचारांची जुळणी केली; आणि त्यांच्या द्वारें येथील समाजजीवनाला वळण देण्याची खटपट आरंभिली. त्यामुळें भौतिक परिस्थिति व वैचारिक प्रतिक्रिया यांच्या संघर्षांतून स्वतंत्रपणें निर्माण होणाऱ्या मतप्रणालींतील जिवंत-

पणा व प्रवाहीपणा येथें कधींच दिसून आला नाहीं. उलट कल्पनावशता व साचेबंदपणा यांचेंच आपल्या विचारांत प्राबल्य माजलें. प्रत्येक विचारसरणींतील कांहीं प्रवृत्तींना येथील वस्तुस्थितीचा आधार मिळाला; व तेवढ्याच समाजांत लोकप्रिय झाल्या. पण कोणतेंहि तत्त्वज्ञान आपल्या शुद्ध व संपूर्ण स्वरूपांत प्रगट होऊं शकलें नाहीं. उलट तात्कालिक उपयुक्ततेच्या भरीम पडून सुधारणावादानें शब्दप्रामाण्याची कांस धरली, राष्ट्रवादानें जातिवादाला थारा दिला, आणि व्यक्तिवादानें अध्यात्माचा आश्रय घेतला. विचार व वस्तुस्थिति यांच्या अशा तडजोडींतूनच येथील समाजजीवनाची घडण होत गेली.

## जुन्या नव्याचा संघर्ष व संकर

पाश्चात्य संस्कृतीच्या वैभवानें अव्वल इंग्रजींतील मध्यमवर्गाचे डोळे दिपून गेले; आणि विस्मय, भीति व न्यूनगंड यांच्या चक्रांत सांपडून तो किंकर्तव्यमूढ बनला. बदललेली शासनपद्धति, इंग्रजी शिक्षण आणि सरकारी नोकरीचा सवंगपणा यामुळें या वर्गाची आर्थिक परिस्थिति आरंभीच्या काळांत तरी सुधारत होती. म्हणून इंग्रजी राज्य हा 'ईश्वरी अनुग्रह' आहे असा त्याचा समज होणें स्वाभाविक होतें. कालाचा प्रवाह आपणास अनुकूल आहे, तेव्हां त्यांतील नवप्रवृत्तींचें निःसंकोचपणें स्वागत करावयास हवें याची या वर्गांतील लोकांना जाणीव झाली होती. पण या सुवर्णसंधीचा फायदा उठवितांना पुष्कळदां त्यांचे पूर्वसंस्कार व रूढ आचार त्यांच्या आड येत. म्हणून धर्मशास्त्राची प्रतिष्ठा कायम राखून लौकिक व्यवहार कसा सुकर करतां येईल याचा ते विचार करूं लागले. भोंवतालच्या वातावरणांत प्रत्यहीं घडून येणारा हा फरक ज्यांना अगम्य व अप्रिय वाटला अशा सनातन्यांनीं प्रारब्धाला दोष देऊन प्राप्त परिस्थितीपुढें निमूटपणें मान वांकविली. परंतु सुशिक्षित वर्गाला समाजस्थितींतील हें परिवर्तन हितकारक व आशादायक वाटत होतें. मात्र त्याच्या मनावरील परंपरेच्या संस्कारामुळें बाह्य व्यवहाराशीं त्याच्या अंतर्जीवनाचा मेळ बसेना. नवे प्रश्न सोडविण्यास, नव्या आपत्तींना तोंड देण्यास, नव्या आकांक्षांचा पाठपुरावा करण्यास जुने आदर्श अपुरे पडले, जुन्या श्रद्धा तोकड्या वाटूं लागल्या. म्हणून नव्या विचारसूत्रांत चालू घडामोडी गुंफण्याचा या वर्गांतील समाजधुरीणांनीं प्रयत्न केला. पाश्चात्यांचें भौतिक

ऐश्वर्य व वैचारिक प्रगति पाहून त्यांची जिज्ञासा जागृत झाली. त्यांच्या सामाजिक व्यवहारांतील स्वातंत्र्य, समता, उदारता, मानवता इत्यादि तत्त्वांचा प्रभाव पाहून त्यांना समाजसुधारणेची आवश्यकता पटली. तसेंच येथील ख्रिस्ती धर्मोपदेशकांची कार्यनिष्ठा, नीतिधैर्य व सेवावृत्ति बघून धर्मसुधारणेची निकड भासूं लागली. परकीय सरकार व परदेशी व्यापारी यांच्याकडून प्रजेची पद्धतशीर पिळवणूक चालू होती. त्यामुळें देशांत सर्वत्र दारिद्र्याची अवकळा दिसूं लागली. म्हणून केवळ शेतीवर अवलंबून न राहतां यापुढें नव्या उद्योगधंद्यांत मन घातलें पाहिजे अशी पांढरपेशा वर्गाची खात्री झाली. शिक्षण, समाजव्यवस्था, धर्मकारण व अर्थोत्पादन इत्यादि क्षेत्रांतील हे विचारतरंग सर्वगामी असले तरी त्यांचें स्वरूप स्फुट व संकीर्णच होतें. शिवाय परिस्थिति, मनोवृत्ति व संस्कार यामुळें निरनिराळ्या व्यक्तींच्या प्रतिक्रिया वेगवेगळ्या प्रकारच्या होत्या. कांहीं जणांनीं उत्साहातिरेकानें इंग्रजांचें अनुकरण केलें. कित्येकांनीं नाईलाजास्तव नव्याचा अंगीकार केला तरी त्यांची जुन्याची ओढ कायमच राहिली. कांहीं थोड्या विचारवंतांनीं मात्र नव्या प्रवृत्तींचें डोळस वृत्तीनें व खुल्या दिलानें स्वागत केलें. जुन्या नव्या विचारांच्या या संघर्षांतून व संकरांतून राष्ट्रवादाला आधारभूत असणाऱ्या भौतिकवाद, बुद्धिवाद व व्यक्तिवाद या प्रवृत्तींचा उगम झाला.

### ज्ञान हीच शक्ति

भौतिकवाद ही आधुनिक पाश्चात्य सुधारणेंतील बीजभूत व प्रभावशाली प्रवृत्ति आहे. या प्रवृत्तीमुळें स्वातंत्र्य व प्रगति, सहानुभूति व सहकार्य या कल्पनांचा जुना आध्यात्मिक आशय लुप्त होऊन युरोपमध्यें त्यांची स्वतंत्र सामाजिक मूल्यांत गणना होऊं लागली. परंतु इंग्रजांचा संबंध येण्यापूर्वी भारतीय विचारसरणींत ह्या भौतिकवादी प्रवृत्तीस कधीं थारा मिळाला नाहीं. आत्मस्वातंत्र्यासाठीं सर्वस्व वेचणाऱ्यांचीं उदाहरणें आपल्या इतिहासांत पुष्कळ दाखवितां येतील. परंतु केवळ राजकीय, आर्थिक वा वैचारिक स्वातंत्र्यासाठीं बलिदान करणाऱ्यांची परंपरा मात्र आपल्याला नव्यानेंच निर्माण करावयाची होती. त्यासाठीं लोकांचें लक्ष परलोकाकडून इहलोकाकडे, अमूर्त तत्त्वांकडून प्रत्यक्ष परिस्थितीकडे, प्रारब्धवादाकडून प्रयत्नवादाकडे वळविणें आवश्यक

होतें. म्हणून उपरिनिर्दिष्ट जाणिवांमध्यें भौतिकवादाची जाणीव ही सर्वांत अधिक व्यापक व महत्त्वाची आहे. या जाणिवेचा पहिला आविष्कार सृष्टि-विज्ञानाच्या जिज्ञासेंतून झाला. १८२७ सालीं मुंबईत निघालेल्या एल्फिन्स्टन विद्यालयामधून बाहेर पडलेल्या नवशिक्षितांनीं या कल्पनेचा हिरीरीनें प्रसार केला. निसर्गावर ताबा मिळवूं पाहाणाऱ्या भौतिक शास्त्रांतील एकेक शोध पाहून त्यांची मति कुंठित होऊन गेली. आतांपर्यंत आपण निसर्गाला भीत होतों, त्याची पूजा करीत होतों, पदोपदीं त्यापुढें नमतें घेत होतों. पण आपल्या हितासाठीं व सुखासाठीं आतां पंचमहाभूतांना हवें तसें राबवितां येईल याचा त्यांना नव्यानेंच प्रत्यय आला. म्हणून ते मुक्तकंठानें भौतिक ज्ञानाचीं स्तोत्रें गाऊं लागले. अध्यात्मविद्या व शब्दपांडित्य यांऐवजीं सृष्टिज्ञान व प्रयोगशीलता यांचा त्यांनीं उदोउदो केला. महाराष्ट्रांतील जुनें आणि नवें साहित्य यांकडे नुसती ओझरती नजर टाकली, तरी हा फरक ताबडतोब जाणवतो. नव्या साहित्याचे विषय बदलले, लेखकांची भूमिका बदलली आणि लेखनाच्या पद्धतींतहि फरक पडला. शास्त्रीपंडितांची व साधुसंतांची जुनी परंपरा, आणि जांभेकर, हरि केशवजी, दादोबाप्रभृति नवशिक्षितांची आधुनिक परंपरा यांत खूपच तफावत आहे. अव्वल इंग्रजींतील या पंडितांना न्यायवेदान्ताच्या चर्चेत गोडी वाटली नाहीं. अध्यात्मभक्तीच्या निरूपणांत त्यांचें मन रमलें नाहीं. पदार्थविज्ञान, रसायन, खगोल, भूगोल, इंद्रियविज्ञान इत्यादि विषयांकडेच त्यांनीं आपली दृष्टि वळविली. पाठ्य-पुस्तकें व नियतकालिकें यांच्या द्वारां ‘ इंग्रजी ’ विद्येची व ‘ उपयुक्त ’ ज्ञानाची त्यांनीं वरिष्ठ वर्गाला धूळभेट करून दिली. इंग्रजी व बंगाली वृत्तपत्रांचा प्रभाव पाहून वृत्तपत्रांच्या नव्या माध्यमाची शक्ति त्यांना उमगली; आणि ‘ दर्पण ’, ‘ दिग्दर्शन ’, ‘ प्रभाकर ’, ‘ ज्ञानप्रसारक ’, ज्ञानप्रकाश ’ यांसारखीं नियत-कालिकें काढून लोकशिक्षणाचें एक अमोघ साधन त्यांनीं पुढील पिढीच्या हवालीं केलें.

### शास्त्र आणि व्यवहार

इंग्लंडचा इतिहास व पाश्चात्य समाजसंस्था यांच्या परिशीलनानें नव्या पिढींतील जबाबदार सुशिक्षितांची वृत्ति अंतर्मुख बनली. युरोपच्या तुलनेनें हिंदू

समाजांतील विषमता, स्थितिशीलता, प्रवाहपतितत्व इत्यादि घातक प्रवृत्ति त्यांना कळून चुकल्या. खिस्ती धर्मोपदेशकांनीं आपल्या प्रचारांतून हिंदू धर्मग्रंथांवर व समाजव्यवस्थेवर वेळीअवेळीं कोरडे ओढण्यास सुरवात केली होती. त्यामुळें आपल्या सामाजिक चालीरीतींची छाननी करून त्यांतील इष्टानिष्टतेचा फेरविचार करणें येथील उच्चवर्णीय पंडितांना भाग पडलें. मोरभट दांडेकर, कृष्णशास्त्री साठे यांसारख्या कांहीं सनातनी शास्त्रीपंडितांनीं खिस्ती धर्मोपदेशकांच्या कोटीस प्रतिकोटी लढवून त्यांना निरुत्तर करण्याची शिकस्त केली. परंतु नवविचारांचें बाळकडु मिळालेल्या सुशिक्षितांना वितंडवादाचा हा मार्ग पसंत पडला नाहीं. म्हणून त्यांनीं धर्मश्रद्धेला बाध न आणतां आपल्या सामाजिक समजुतींत सुधारणा घडवून आणण्याचा उपक्रम केला.

बाळशास्त्री जांभेकर, गंगाधरशास्त्री फडके, विष्णुशास्त्री बापट व कृष्णशास्त्री चिपळूणकर हे या सुधारकांचे अध्वर्यु होते. त्यांनीं शास्त्रवचनांच्या आधारानें स्त्रीशिक्षणपुनर्विवाहादि सुधारणांचा पुरस्कार केला. ह्या सुधारकांच्या विचारांत तत्त्वजिज्ञासेची आंच नाहीं, तशी मूलगामी सिद्धांतांची ओळखदेखहि नाहीं हें ' स्त्रीविद्याभ्यास ', ' हिंदुधर्मतत्त्व ' इत्यादि पुस्तकांवरून स्पष्ट होतें. ' दर्पण ', ' प्रभाकर ', ' विचारलहरी ' इत्यादि नियतकालिकांतील जें थोडेंबहुत लिखाण उपलब्ध आहे, त्यांवरूनहि कांहीं निराळा निष्कर्ष निघत नाहीं. व्यवहार आणि शास्त्र यांच्यांतील अंतर वाढत गेल्यास शास्त्रांचा बोज राहाणार नाहीं, व त्यामुळें समाजांतील नियामक शक्तिच कदाचित् नाहींशी होईल या भीतींतूनच त्यांनीं ही हालचाल सुरू केली; व फक्त अत्यंत निकडीच्या सुधारणांना शास्त्राधार देऊन पावन करून घेतलें. अशा रीतीनें जुने धर्मग्रंथ व नवा व्यवहार यांची त्यांनीं कशीबशी सांगड घातली. जांभेकर–चिपळूणकरांसारख्या तैलबुद्धीच्या विचारवंतांनींहि निर्णायक मतप्रणाली न मांडतां जुन्यानव्याच्या तात्कालिक तडजोडीवरच समाधान मानलें यावरून त्याकाळच्या वैचारिक गोंधळाची चांगली कल्पना येते.

## पारमहंसिक ब्राह्म धर्म

व्यावहारिक तडजोडीचा हा मार्ग ज्यांच्या अंतर्मुख वृत्तीला मानवला नाहीं असे कांहीं भावनाप्रधान तरुण धर्मसुधारणेकडे वळले. शास्त्रवचनांचा

काथ्याकूट करण्याची त्यांना गरज भासली नाहीं. कारण जुन्या वैदिक परंपरेंत आतां मुळींच त्राण उरलेलें नाहीं याबद्दल त्यांचें मन त्यांना ग्वाही देत होतें. त्याबरोबरच इतर धर्मांच्या पवित्र ग्रंथांनाहि निरपवाद प्रामाण्य देण्यास त्यांची मान्यता नव्हती. जग हाच एक ईश्वरनिर्मित ग्रंथ आहे; आणि कृष्ण, बुद्ध, खिस्त, महंमद इत्यादि साक्षात्कारी पुरुषांनीं आपआपल्या परीनें त्याचा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे अशी त्यांची मनोधारणा होती. ¶ तेव्हां सर्व धर्मांतील चांगलीं तत्त्वें एकत्र करून एक मानवधर्म स्थापन करण्याची त्यांनीं ईर्षा बाळगली. राम बाळकृष्ण, दादोबा पांडुरंग, डॉ. आत्माराम पांडुरंग ह्यांनीं पुढाकार घेऊन एकेश्वरवाद व विश्वबंधुत्व या दोन तत्त्वांच्या आधारावर मुंबईत १८५० च्या सुमारास 'परमहंस मंडळी'ची स्थापना केली. § बाह्य सुधारणेपेक्षां अंतःशुद्धीकडे त्यांचें अधिक लक्ष होतें. म्हणून धर्मसाधनेंतील अज्ञानमूलक व हास्यास्पद आचार निषिद्ध मानून भूतदया, सत्यप्रीति, सदाचार, परधर्मसहिष्णुता इत्यादि नैतिक गुणांचा त्यांनीं आग्रह धरला. खिस्ती धर्मोपदेशकांपासून जरी त्यांनीं स्फूर्ति घेतली, तरी आपले विचार भागवतधर्मीय संतांच्या भाषेंत मांडण्याचा त्यांचा प्रयत्न होता. मात्र 'परमहंस मंडळी'च्या सभासदांनीं भावनेच्या भरांत एकेश्वरवादाचें निशाण फडकावून धर्मसुधारणेच्या कार्यास जरी हात घातला, तरी त्यांच्या चळवळीस तत्त्वनिष्ठेचें पाठबळ कधींच मिळालें नाहीं. लोकापवादाच्या भीतीनें त्यांनीं मंडळीच्या कार्यांत पहिल्यापासून गुप्तता राखली. खिस्ती धर्मोपदेशकांचा स्वार्थत्याग, चारित्र्य व चिकाटी या गुणांचा गौरव करण्याऐवजीं खिस्ती मतांतील दीक्षाविधीचें त्यांनीं फाजील स्तोम माजविलें; ‡ आणि जुन्या आचारांचा बीमोड करतांना नव्या परकीय आचारांचें शुक्लकाष्ठ मागें लावून घेतलें. त्यामुळें त्यांच्या चळवळीबद्दल लोक अधिकच साशंक बनले. धर्मसुधारणेचें कार्य किती बिकट, दुःसाध्य व जोखमीचें आहे याची त्यांना कल्पना आली नाहीं. त्यांचे

---

¶ दादोबा पांडुरंग–पारमहंसिक ब्राह्म धर्म, परिच्छेद १५.

§ अ. का. प्रियोळकर–दादोबा पांडुरंग, १९४७, पृ. २५१.

‡ बाबा पदमनजी—अरुणोदय, (आवृत्ति दुसरी), पृ. ९६

हेतु शुद्ध असले, तरी त्यांच्या भूमिकेंत खंबीरपणा नव्हता. म्हणून रहस्य-स्फोटाच्या नुसत्या भीतीनेंच ही मंडळी विराम पावली.*

## ‘ कालमान ओळखा ’

जुनीं शास्त्रें आणि परंपरा झुगारून देऊन बदलत्या परिस्थितीच्या संदर्भात नव्या निष्ठांचा श्रद्धापूर्वक व निर्भयतेनें स्वीकार करण्याचा पहिला मान आपणांस गोपाळराव देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांना द्यावा लागेल. लोकहिताची उत्कट तळमळ, सर्वंकष व्यापक दृष्टि, निःस्पृहता आणि सत्यप्रीति यामुळें लोकहितवादी हेच महाराष्ट्रांतील सुधारणावादाचे आद्य प्रवर्तक ठरतात. जांभेकर व लोकहितवादी समकालीन खरे परंतु जांभेकरांचें बहुतेक सर्व आयुष्य मुंबईत गेलें. त्यांच्या काळांत मुंबईत नव्या व्यापारी युगाचा उदय होत होता. त्यामुळें जुने वर्ग किंवा परंपरा यांची प्रतिष्ठा आपोआप कमी होत गेली. शिवाय अनेक जातींचे व प्रांतांचे, नाना व्यवसाय करणारे व निरनिराळ्या भाषा बोलणारे लोक मुंबईत एकत्र आल्यामुळें सुधारणांना संघटित विरोध होण्याचा फारसा संभव नव्हता. म्हणून जुन्या शास्त्रांकडे पाठ फिरवून नव्या सुधारणांचें उत्साहानें स्वागत करणें जांभेकरांसारख्या मुंबईकरांना शक्य झालें. हिंदू समाजरचनेच्या मूलतत्त्वाची चिकित्सा करण्याचें त्यांना कारण पडलें नाहीं. लोकहितवादींचें वास्तव्य नेहमीं पुण्यांत असल्यामुळें त्यांची परिस्थिति याहून निराळी होती. पुण्यांत पेशवाईचे अवशेष अजून शिल्लक होते. नव्या अमदानींत शास्त्रीपंडित लवकरच निराश्रित झाले, जहागिरदारांचीं इनामें जप्त होऊं लागलीं, आणि बेकारी व दारिद्य यांनीं पेशव्यांच्या राजधानीवर आपला आसुरी अंमल गाजविण्यास सुरवात केली. चारहि बाजूंनीं खालावत चाललेल्या अशा परिस्थितींतहि पुण्यांतील वजनदार वरिष्ठ वर्ग पूर्णपणें गाफिल होता. सामाजिक संकटाची कुणालाच क्षिति नव्हती. सार्वजनिक हितावर पाणी सोडून प्रत्येकजण स्वतःची तुंबडी भरण्यासाठीं धडपडत होता. प्रतिष्ठित वर्गाचें हें अज्ञान, ही जडता, हा संधिसाधुपणा पाहून लोकहितवादींचें मन उद्विग्न झालें.

* अ. का. प्रियोळकर—दादोबा पांडुरंग पृ. २५२

समाजांतील पुढारी वर्गाला या घोर निद्रेतून जागें करण्यासाठीं त्यांनीं केलेला आक्रोश म्हणजेच त्यांचीं 'शतपत्रें' होत. †

लोकहितवादींनीं आधुनिक युगाचा आशय यथार्थतेनें ओळखला; आणि त्याच्या मुळाशीं असणाऱ्या निष्ठांचीहि त्यांनाच प्रथम चाहूल लागली. त्यांची भाषा अघळपघळ व ओबडधोबड असली, तरी त्यांचे विचार मूलगामी व मौलिक आहेत. मराठ्यांच्या पराभवाचें कारण काय? आपल्या सामाजिक अधःपाताचें मूळ कशांत आहे? भावी प्रगतीची दिशा कोणती? ह्या प्रश्नांचा त्यांनींच पहिल्यानें विचार केला; आणि ब्रिटिशांच्या अभ्युदयाची चिकित्सा करून त्यांच्या समाजव्यवस्थेंतील मूलतत्त्वांची मराठी भाषिकांना ओळख करून दिली. त्यांच्या 'शतपत्रां'तून अनेक नव्या कल्पना व विचार व्यक्त झाले असले, तरी मानवतावाद आणि ऐहिक जीवनावरील निष्ठा ह्याच त्यांतील मुख्य प्रेरणा होत. लोकहितवादींना जुन्याचा उबग आला होता. जुन्या श्रद्धा हानिकारक आहेत, जुने वर्ग ऐतखाऊ आहेत, जुनी विद्या निरुपयोगी आहे अशी त्यांची खात्री झाली होती. म्हणून पाश्चात्य जीवनमूल्यांच्या पायावर आपल्या समाजाची पुनर्रचना होणें त्यांना अगत्याचें वाटलें. परंतु आपले उपजीविकेचे व्यवसाय, सामाजिक नीतिनियम व परमार्थसाधना या सर्वांचीच धर्मशास्त्रांनीं परलोकाशीं सांगड घातली होती. त्यांच्यांत बदल घडवून आणण्यापूर्वीं त्यांच्यामागील हें शास्त्रप्रणीत दैवी अधिष्ठान काढून घेणें जरूर होतें. यासाठीं लोकहितवादींनीं धर्म व व्यवहार यांची प्रथम फारकत केली. "ज्या ज्या गोष्टी, चालीरीति लोकांमध्यें आहेत त्या सर्वच धर्म; व्यवहार धर्म; ईश्वरभक्तिहि धर्म; पागोटें, धोतर, अंगरखा घालावा, हे सर्व धर्मांमध्यें मोडूं लागले. ही समजूत विलक्षण लोकांची पडली" ¶ ही चुकीची समजूत बदलली पाहिजे. "संसार आणि परमार्थ हीं दोन कामें पृथक् आहेत त्यांची

---

† हीं शतपत्रें मुंबई येथील 'प्रभाकर' पत्रांत १८४८ ते १८५० ह्या काळांत प्रसिद्ध झालीं.

¶ लोकहितवादींचीं शतपत्रें—संपादक श्री. रा. टिकेकर, उषा प्रकाशन, औंध, पृ. ७१.

मिसळ करूं नये ‡ ” संसाराकरितां जीं कामें आपण करतों तीं देवाकरितां केलीं असें मानूं नये असें म्हणून प्रपंच व परमार्थ, बुद्धि व श्रद्धा यांचे प्रांत त्यांनीं अलग केले आणि महाराष्ट्रांत भौतिकवादाची पार्श्वभूमि तयार केली.

धार्मिक बाबतींत लोकांच्या परमेश्वरावरील श्रद्धेला लोकहितवादींनीं धक्का लावला नाहीं. परंतु तुकारामादि संतांचा आधार घेऊन कर्मठपणावर मात्र त्यांनीं कठोरपणें कोरडे ओढले. पेशवाईच्या अखेरीस पुण्यांत व्रतवैकल्यें, दानधर्म यांचें प्रस्थ माजलें होतें; आणि ढोंग, लाचारी, सुखासीनता व धर्मभोळेपणा यांना ऊत आला होता. लोकहितवादींनीं ह्या दोषांवर सतत प्रहार करून अंतःशुद्धि, सदाचार, प्रामाणिकपणा, परोपकार इत्यादि गुणांचे गोडवे गायिले. खिस्ती धर्मोपदेशकांच्या वर्तणुकीवरून ह्या गुणांचें महत्त्व त्यांच्या ध्यानांत आलें असेल. पण परमहंसांप्रमाणें खिस्ती मताचें अनुकरण करून सामुदायिक प्रार्थनेचा आणि सांप्रदायिक दीक्षाविधीचा त्यांनीं बडेजाव माजविला नाहीं. त्यांच्या विचारांत अनुकरणापेक्षां अनुभवाचा आणि दिखाऊपणापेक्षां पोटतिडिकेचा भाग अधिक आहे. आपल्या सामाजिक वैशिष्ट्याचें अनुसंधान राखून समाजांतील पुढारलेल्या वर्गास आत्मपरीक्षणास उद्युक्त करण्याची त्यांची खटपट आहे.

कालाच्या प्रवाहाचा बदललेला रोख त्यांना जाणवला. तेव्हां समाज-व्यवहाराचें नियंत्रण करण्यास जुनी परंपरा व शास्त्रें आतां निरुपयोगी आहेत याबद्दल त्यांना संशय उरला नाहीं. म्हणून पापपुण्याचा व कार्याकार्याचा निर्णय करण्यास नव्या कसोट्यांची आवश्यकता त्यांनीं प्रतिपादिली; आणि प्रत्येक क्षेत्रांत ऐहिक उपयुक्ततेचा निकष लावून आपल्या आचारविचारांची फेरतपासणी केली. देशांतील लोकांना सुख व ऐश्वर्य प्राप्त होण्यास ज्यांचा उपयोग होतो तीच विद्या व तेच व्यवसाय श्रेष्ठ व स्वीकारार्ह आहेत असें त्यांनीं आवर्जून सांगितलें. शेवटल्या बाजीरावानें आपल्या कारकीर्दीत भरमसाट दक्षिणा वाटून पोटभरू भिक्षुकांचा एक मोठा वर्ग पुण्यांत पोसला होता. अर्थशून्य वेदपाठ किंवा शास्त्रपारायणें म्हणजेच विद्या अशी त्यामुळें लोकांची

‡ कित्ता, पृ. १९३

समजूत झाली होती. लोकहितवादींनीं या पढिक पंडितांचा पोकळपणा उघड करून दाखविला. " ब्राह्मणांस अर्थज्ञान नाहीं...येणेंकरून वेद, शास्त्र, पुराणें हीं परवचा किंवा लमाणाचें गाणें यासारखीं झालीं. "§ असा त्यांचा स्पष्ट अभिप्राय होता. भाषेच्या, साहित्याच्या व अध्यात्माच्या दृष्टीनें जुन्या संस्कृत ग्रंथांचें महत्त्व त्यांना मान्य होतें. पण आजच्या परिस्थितींत " संस्कृत विद्या निरुपयोगी व नाना प्रकारचे कुतर्क उत्पन्न करणारी, व संसारावरील चित्त उडवून आळशी करणारी व निरुपयोगी कर्मे करणारी आहे. सांप्रत काळीं जें ज्ञान पाहिजे तें त्यांत मुळींच नाहीं. "‡ आजचे प्रश्न सोडविण्यास आणि आजच्या अडचणींतून मार्ग काढण्यास ह्या ज्ञानाचा यत्किंचितहि उपयोग नाहीं. म्हणून " ज्या ज्ञानानें आपल्यावर इतर लोकांनीं सरशी केली तें ज्ञान आपण धिक्कारूं नये. कारण कीं त्याचा आपणांस अनुभवच आला आहे. "† असा त्यांनीं इशारा दिला. ' इंग्रजी पंडितच ' आतां देशाचें कल्याण करूं शकतील याबद्दल त्यांना मुळींच शंका नव्हती. म्हणून सामाजिक दृष्ट्या उपयुक्त असलेल्या इंग्रजी विद्येचा व भौतिक शास्त्रांचा प्रसार करण्यांत त्यांनीं आपली बुद्धि खर्च केली.

व्यवसाय, उद्योगधंदे, दानधर्म यांनाहि त्यांनीं हेंच उपयुक्ततेचें तत्त्व लागूं केलें. " मनुष्यांस लाकडें तोडावयाचें कसब शिकविलें तर बरें; परंतु हें व्याकरण नको. "¶ किंवा "चार ब्राह्मण लावून अभिषेक करावा, त्यापेक्षां चार मजूरदार लावून रस्ता नीट करावा हें चांगलें; कारण ती लोकहिताची मजुरी आहे. "* असें त्यांनीं निक्षून सांगितलें. पढिक पंडित व लाचार भिक्षुक ह्यांच्याविरुद्ध त्यांचा विशेष कटाक्ष होता. ह्या लोकांकडून समाजोन्नतीला कोणतीच मदत होत नाहीं. उलट आपला ' वृत्तिच्छेद ' होईल म्हणून ते प्रत्येक सुधारणेला विरोध करतात; आणि " आळसाचे चौकीदार " बनतात. अशा निकामी माणसांचा सांभाळ केल्यानें द्रव्य आणि शक्ति यांचा अपव्यय होतो, मूर्खपणाचें पोषण होतें, आणि अनीतीला उत्तेजन मिळतें अशी त्यांची भावना होती. म्हणून जुन्या ऐतखाऊ वर्गाविरुद्ध त्यांनीं शस्त्र

§ किता, पृ. ११८. ‡ कित्ता, पृ. १४४. † कित्ता, पृ. १४५.
¶ कित्ता, पृ. १४८. * कित्ता, पृ. १७९.

उपसलें. पुरोहितपंडितांप्रमाणें सरदारजहागिरदारांचाहि त्याकाळीं अधःपात झाला होता. म्हणून विद्येची पोपटपंची करणाऱ्या ब्राह्मणांबरोबरच द्रव्याचा दुरुपयोग करणाऱ्या जहागिरदारांचीहि त्यांनीं हजेरी घेतली. राष्ट्राच्या पुनरुज्जीवनासाठीं आतां निराळ्या नेत्यांची गरज आहे. म्हणून द्रव्याचा उपयोग भौतिक ग्रंथप्रसारासाठीं, व्यापारवृद्धीसाठीं अथवा कारागिरीसाठीं करण्याची लोकांना शिफारस करून त्यांनीं उगवत्या मध्यमवर्गाला व व्यापारी वर्गाला आपला पाठिंबा दिला.

## मन हेंच ईश्वरी शास्त्र

परिस्थितीच्या दडपणाखालीं मध्यमवर्ग नव्या विद्या व व्यवसाय यांचा स्वीकार करूं लागला होता. परंतु आपली प्रतिष्ठा कमी होईल या भीतीनें सामाजिक कल्पनांत बदल घडवून आणण्याची त्याची तयारी नव्हती. उलट या बाबतींत नव्या मूल्यांचा आग्रह धरणें हीच सुधारकांच्या समयज्ञतेची व कर्तव्यबुद्धीची कसोटी होती. विचारांच्या बाबतींत तरी लोकहितवादी ह्या कसोटीला उतरले; आणि अंतःप्रेरणेची तरफदारी करून त्यांनीं शब्द-प्रामाण्यावर पहिला घाव घातला. त्यापूर्वी भारतांतील कोणत्याहि विचारवंतानें इतक्या निर्भीडपणें शब्दप्रामाण्यावर आघात केला नव्हता. लोकहितवादींनीं उघडपणें शब्दप्रामाण्याचें हें जोखड झुगारून दिलें. "धर्मशास्त्र हा केवळ कायदा आहे" § "शास्त्र लोकांचे सुखाकरितां केलें आहे. शास्त्राचा मुख्य हेतु हाच आहे कीं लोकांमध्यें व्यवस्था व्हावी." ‡ परंतु आतां काळ बदलला असल्यामुळें जुन्या रूढि जाचक झाल्या आहेत. सुखाच्या आणि स्वातंत्र्याच्या आड येत आहेत. म्हणून "शास्त्रास एकीकडे ठेवा, आपली बुद्धि चालवा", † आपल्या बुद्धीचा वापर करून जरूर तेथें सामाजिक नीतिनियमांत बदल करा असें त्यांचें म्हणणें होतें. मानवाच्या सद्भावनेवर, न्यायबुद्धीवर आणि दयाशीलतेवर त्यांची श्रद्धा होती. म्हणून शब्दप्रामाण्याची व रूढिप्रियतेची काजळी झाडून त्याची अंतर्ज्योत उजळल्यास तिच्या प्रकाशांत सुधारणेचा मार्ग त्याला आपोआप दिसेल अशी त्यांना आशा

§ किता, पृ. ३८६. ‡ किता, पृ. १७५. † किता, पृ. ३८५.

वाटली. याच भूमिकेवरून त्यांनीं पुनर्विवाह, प्रौढविवाह, स्त्रीशिक्षण, विभक्तकुटुंबपद्धति इत्यादि सुधारणांचा पुरस्कार केला.

## मनुष्यानें मनुष्याचें कल्याण करावें. §

व्यक्तीला राष्ट्राचा स्वतंत्र व जबाबदार घटक बनविण्यापूर्वी जाति, गांव कुटुंब इत्यादि वेगवेगळ्या संस्थांच्या पाशांतून तिची मुक्तता करणें आवश्यक होतें. शिवशाहींत अशा प्रकारची समाजक्रांति होऊं शकली नाहीं. म्हणून मराठ्यांच्या राज्याला राष्ट्रीयत्वाचें प्रगतिकारक अधिष्ठान कधींच मिळालें नाहीं. इंग्रजी अमदानींतील बदललेल्या परिस्थितींत मात्र परंपरेशीं झगडून व्यक्तिप्रेरणेचें स्वतःसिद्ध प्रामाण्य स्थापित करण्यांत लोकहितवादींनीं पुढाकार घेतला. मानवता हा त्यांच्या विचारांचा प्रारंभबिंदु होता. हिंदु तत्त्वज्ञानानें विश्वव्यापारांतील मानवाच्या स्वतंत्रतेवर व वैशिष्ट्यावर पुरेसा भर दिलेला नाहीं. म्हणून आपल्या धर्मजीवनांत सर्वभूतहित, जीवदया, जगदुद्धार इत्यादि कल्पनांचें प्राबल्य आढळतें. 'जगांतील यच्चयावत् गोष्टींचा मानदंड मानव आहे' ह्या सिद्धांताची महती युरोपीय संस्कृतीच्या अध्ययनानें लोकहितवादींना पटली. 'मानव हा इतर प्राण्यांहून अगदीं वेगळा व श्रेष्ठ आहे' आणि 'सारीं माणसें मूलतः समान दर्जाचीं आहेत' ह्या दोन कल्पना त्यांच्या साहित्यांत प्रमुख आहेत. मानवाला विचारांचें लक्ष्यकेंद्र ठरवून महाराष्ट्रांतील सांस्कृतिक जीवनाला अध्यात्माच्या पातळीवरून विज्ञानाच्या व समाजशास्त्राच्या पातळीवर आणण्याची लोकहितवादींची मनीषा होती. विश्वांतील अनादि, नित्य व शाश्वत तत्त्वाची चिकित्सा करीत न बसतां दैनंदिन व्यवहारांत मानवांचा ज्या निरनिराळ्या नात्यांनीं व नियमांनीं एकमेकांशीं संबंध येतो, त्यांचा त्यांनीं ऊहापोह केला. समाजजीवनांतील नानाविध प्रश्नांची त्यांनीं सारख्याच तत्परतेनें दखल घेतली; आणि धर्मसुधारणा, राज्यसुधारणा, इंग्रजी विद्या, स्त्रियांची स्थिति, पुनर्विवाह, स्वदेशप्रीति इत्यादि विषयांकडे लोकांचें लक्ष वेधलें. धर्माच्या बाबतींत मानवतावादाचें तत्त्वज्ञान संतांनीं अनेक शतकांपूर्वी

§ किता, पृ. १७९.

पुरस्कारिलें होतें. आपण सर्व एकाच ईश्वराचीं लेकरें आहोंत म्हणून जातगोताचा विचार न करतां परस्परांशीं बंधुभावानें वागणें, आणि एकमेकांच्या कल्याणासाठीं झटणें हीच खरी ईश्वरभक्ति होय अशी ज्ञानेश्वरएकनाथांची व नामदेवतुकारामांची शिकवण होती. लोकहितवादींनीं ही परंपरा पुढें चालविली. मात्र या मानवतावादाला धार्मिक क्षेत्राच्या मर्यादा घालणें त्यांना पसंत नव्हतें. म्हणून सार्वजनिक व्यवहारांतील सर्व बाबींना निरपवादपणें ही विचारसरणी लागू करण्याचा त्यांनीं उपक्रम केला. मानवाला निसर्गावर ताबा मिळवून देणारीं भौतिक शास्त्रें, त्याचें जीवनमान वाढविणारे उद्योगधंदे आणि त्याचे सामाजिक व्यवहार सुकर करणारे नीतिनियम यांचा त्यांनीं मुक्तकंठानें गौरव केला. विशेषतः सामाजिक व्यवहारांतील अज्ञान व विषमता यांवर आघात करून त्यांनीं ऐक्याच्या मार्गांतील अडथळे नाहींसे केले. सामाजिक ऐक्याच्या ह्या वाढीवर राष्ट्रवादाचें भवितव्य अवलंबून होतें. म्हणून स्थितिशील व साचेबंद समाजव्यवस्थेला विरोध करून आणि ऐहिक उपयुक्तता व व्यक्तिविकास ह्या नव्या प्रगतिशील तत्त्वांचा कैवार घेऊन लोकहितवादींनीं एक प्रकारें राष्ट्रवादाला पोषक अशा प्रवृत्तींचाच परिपोष केला.

## आर्थिक दुःस्थितीची मीमांसा

इंग्रजांच्या ऐश्वर्यानें दिपून गेलेल्या सुशिक्षितांना आपल्या देशाच्या वाढत्या दारिद्र्याबद्दल दुःख वाटणें स्वाभाविक होतें. ब्रिटिश कारखान्यांच्या स्पर्धेमुळें हिंदी उद्योगधंद्यांचा ऱ्हास होत होता. शहरांतील कारागीर बेकार झाले होते. परकीय पक्क्या मालाच्या आयातीबरोबर हिंदुस्थानांतील कच्च्या मालाची निर्यात वाढत होती. अशा प्रकारच्या व्यापारानें देशाला दारिद्र्य येणें अपरिहार्य आहे; आणि राजकीय सत्ता, आर्थिक मक्तेदारी व यांत्रिक साधनें यांच्या जोरावर ब्रिटिशांनीं आपली आर्थिक पिळवणूक चालविली आहे याची स्पष्ट जाणीव महाराष्ट्रांत रामकृष्ण विश्वनाथ यांच्या लिखाणांत प्रथम दिसून येते.¶ हिंदी अर्थव्यवस्थेचें प्रत्यक्ष अवलोकन आणि परदेशां-

¶ रामकृष्ण विश्वनाथ—हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति व पुढें काय त्याचा परिणाम होणार, याविषयीं विचार, १८४३.

तील घडामोडींचें यथार्थ आकलन यामुळें त्यांचे विचार मार्मिक व सडेतोड वाटतात. "एथील लोकांचें हातीं यंत्रें असल्यास हे लोक कलाकौशल्याचे कामांत आणि त्यांस ज्यावस्तूचा खप आहे, त्या विलायतेप्रमाणें करण्यांत कुशल आहेत, असें ज्यांहीं हिंदुस्थानांत पाहिलें आहे, ते सर्व कबूल करतात, परंतु दुसऱ्या विलायतेंतल्या लोकांबरोबर या कामांत टक्कर द्यावी, किंबहुना सर्व त्या जिनसांचा मक्ता आपणच घ्यावा असें करण्यास ते डचकतात. जर इंग्लड देशानें दुष्टपणानें हिंदुस्थानचे सर्व जिनसांचा मक्ता घेऊन त्या लोकांची उमेद खचविली नसती, आणि हिंदुस्थानचा जिन्नस दुसऱ्या कोणत्या मुलुखांत जाऊं नये, असा प्रतिबंध केला नसता, तर एथें मजूरी कमी, तेणेंकरून त्या लोकांहीं आपण केलेला जिन्नस सर्व पृथ्वीभर पुरविला असता" § असें मत निःसंदिग्धपणें मांडून पुढें मुसलमान व इंग्रज यांच्या आर्थिक धोरणाची त्यांनीं तुलना केली आहे. "मुसलमानांचे राज्यांत हिंदुस्थानांतील उत्पन्न केलेलें सामानहि बरेच पूर्णतेस आलें होतें व त्याचा सर्व लोकांत चाहाहि झाला होता. परंतु ब्रिटिशांचा बेत व वर्तणूक अशी आहे कीं हिन्दुस्थानची सामान इत्यादि उत्पन्न करण्याची शक्ति अगदीं मोडून टाकावी कीं जेणेंकरून युरोपांतील उत्पन्न केलेले सामानाचा खप व्हावा." ‡ मुसलमानांनीं देशांतील संपत्ति लुटली, तर इंग्रजांनीं संपत्ति निर्माण करण्याचीं साधनेंच नाहींशीं केलीं. साऱ्याचे दर वाढवून इंग्रजांनीं शेत जमिनी ओसाड पाडल्या, हिंदी मालावर भरमसाट जकाती बसवून त्याची निर्यात बंद केली, व त्यामुळें येथील उद्योगधंद्यांचा व कलाकसबांचा ऱ्हास झाला. ह्यावरून मुसलमानांपेक्षां इंग्रजांची पिळणूक अधिक घातक व भयंकर आहे असा त्यांनीं निष्कर्ष काढला. हिंदुस्थानचा उत्कर्ष हा यंत्रसंस्कृतीच्या स्वीकारावर व कारखाने-गिरण्या यांच्या भरभराटीवर अवलंबून आहे हें त्यांनीं ओळखलें. त्यासाठीं लोकांना स्वावलंबन, देशाभिमान व ऐक्यभावना यांची वाढ करण्याचा त्यांनीं उपदेश केला. "हिंदुस्थानाची स्थिति दुसऱ्या देशांपेक्षां फारच विशेषेंकरून चांगली आहे" * कारण संपत्ति निर्माण करण्यासाठीं लागणारा कच्चा माल, श्रमशक्ति

§ किता, पृ. १२ ‡ किता, पृ. ७८ * किता, पृ. २०.

आणि कौशल्य आपल्या देशांत भरपूर आहे. तेव्हां श्रीमंत लोकांनीं आपलें भांडवल घालून लिमिटेड कंपन्या काढल्यास कापड, साखर, सिमेंट वगैरे धंद्यांत हिंदी लोक ब्रिटिश कारखानदारांशीं सहज स्पर्धा करूं शकतील असा त्यांच्या प्रतिपादनाचा रोख आहे. म्हणून रामकृष्ण विश्वनाथ हा भांडवलदारी युगाचा महाराष्ट्रांतील अग्रदूत होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. परकीय स्पर्धेमुळें हिंदी अर्थव्यवस्थेवर होणाऱ्या परिणामांची चिकित्सा करून व त्यांचें निवारण करण्याचा मार्ग सुचवून त्यांनीं अभावितपणें का होईना पण रानडे-दादाभाईंच्या पूर्वी जवळ जवळ तीस वर्षें आर्थिक राष्ट्रवादाची मुहूर्तमेढ रोवली.

लोकहितवादींनीं आपल्या शतपत्रांमधून आधुनिक दृष्टीनें हिंदुस्थानच्या आर्थिक जीवनाची पाहणी केली; व अनेक पुरोगामी तत्त्वांचें बीजारोपण केलें. यंत्रविद्येचें स्वागत, परकीय स्पर्धेला विरोध, स्वदेशीचा पुरस्कार, पिळणुकीचा निषेध, समतेचा आग्रह हीं त्यांच्या विवेचनांतील प्रमुख तत्त्वें आहेत. इंग्रजी राजवटीबद्दल त्यांना आदर होता. तरीहि हिंदुस्थानला दारिद्र्यांत ठेवणाऱ्या इंग्रजांच्या धोरणावर त्यांनीं सडकून टीका केली. त्याबरोबरच देशाच्या उत्कर्षासाठीं यंत्रसाधनांवर आधारलेल्या नव्या उद्योगधंद्यांची आवश्यकता प्रतिपादन केली. मात्र या बाबतींत सरकारी संरक्षणापेक्षां स्वावलंबनावरच त्यांची अधिक मदार होती. "हल्लीं इंग्रज लोक सर्व जिन्नस विलायतेंतून आणतात व इकडील व्यापारी, कोष्टी वगैरे उपाशी मरतात" †...... "याजकरितां सर्वांही असा कट करावा कीं, जें आपल्या देशांत पिकेल, तेंच नेसूं, तेंच वापरूं, कसेंहि असो. आणि तितक्यांत चांगल्या विद्या व जिन्नस उत्कृष्ट करावयास विद्या शिकूं" § असें म्हणून त्यांनींच प्रथम स्वदेशीच्या व्रताचा पुरस्कार केला. जगांतील सर्व माणसें सारखीं आहेत, या जगांत सुख संपादन करण्याचा सर्वांना सारखा हक्क आहे हीं तत्त्वें फ्रान्सच्या राज्यक्रांतीनंतर युरोपीय लोकांच्या परिचयाचीं झालीं होतीं. लोकहितवादींच्या लिखाणावरहि त्यांचा प्रभाव पडलेला आढळून येतो. शारीरिक श्रम हे बौद्धिक मेहनतीपेक्षां कोणत्याहि दृष्टीनें कमी प्रतीचे नाहींत. एका माणसानें स्वकष्टानें निर्माण केलेली संपत्ति रूढि, कायदा किंवा सत्ता यांच्या जोरावर उपभोगण्याचा दुसऱ्याला

† शतपत्रें, पृ. ३३९. § शतपत्रें, पृ. ३५२.

हक्क नाहीं. देशांतील संपत्तीचा उपयोग लोकांच्या सुखासाठीं व विद्या आणि कला यांच्या उत्तेजनासाठीं झाला पाहिजे. हे त्यांचे विचार ह्या समतेच्या तत्त्वज्ञानाचेच द्योतक आहेत. लोकहितवादींच्या विचारांत जरी तार्किक सुसंबद्धता व शास्त्रीय काटेकोरपणा नाहीं, तरी अर्थकारण व सामाजिक प्रगति यांच्या अन्योन्य संबंधाचें अंधुक व ओझरतें दर्शन त्यांना घडलें होतें यांत शंका नाहीं. उत्पादनसाधनें बदलल्याशिवाय समाजाची आर्थिक प्रगति होऊं शकत नाहीं. हजारों वर्षें आपण तेच नांगर, तेच माग वापरीत आहोंत हें आपल्या मागासलेपणाचें लक्षण आहे. तेव्हां इतर देशांची बरोबरी करण्यासाठीं उत्पादनसाधनांत आधीं सुधारणा घडवून आणली पाहिजे असें त्यांना वाटत होतें. ही सुधारणा करण्यांत जुने वर्ग अडथळा आणतात. त्यांना विरोध करून नव्या विचारांचें वर्चस्व प्रस्थापित केलें पाहिजे हे त्यांचे विचार त्यांच्या द्रष्टेपणाचीच साक्ष देतात.

## राजकीय हक्क व आकांक्षा

पेशवाईतील अंदाधुंदी व अशांतता यांस कंटाळलेल्या बहुसंख्य महाराष्ट्रीय जनतेला इंग्रजांची सुनियंत्रित राजवट पुष्कळच सुखावह वाटली. वरिष्ठ वर्गांतील कांहीं शास्त्रीपंडित व इनामदार सत्तांतरानें नाराज झाले असले, तरी त्यांची संख्या फारच थोडी होती. नव्या अमदानींत जीवित व मालमत्ता यांना सुरक्षितता लाभली. शहरांतील लोकांना उत्कर्षाची संधि मिळाली. म्हणून जांभेकर, दादोबा पांडुरंग ह्यांच्यासारख्या विद्वान् पुढाऱ्यांना इंग्रजी राजवट ही अपूर्व पर्वणी वाटली तर त्यांत आश्चर्य नाहीं. इंग्रजांची सत्ता स्थिर झाल्यावर मात्र तिच्यांतील दोष हळुहळू लोकांच्या नजरेस येऊं लागले; आणि वर्तमानपत्रांतून त्यांना वाचा फुटूं लागली. ह्या काळांतील राजकीय जागृतींत वृत्तपत्रांचा कार्यभाग फार मोठा आहे. सभा संमेलनें व मोर्चे–मिरवणुका इत्यादि लोकजागृतीचे आजचे मार्ग त्यावेळीं अस्तित्वांत नसल्यानें समाजांतील चालू घडामोडींचें सुशिक्षितांस ज्ञान करून देण्याचें व लोकांच्या अडीअडचणी सरकारास कळविण्याचें वृत्तपत्रें हें एकच साधन होतें. तत्कालीन पत्रकर्त्यांनाहि ह्याची जाणीव होती. "येकोपा होण्याचें व परस्पर अभिप्राय कळण्याचें व कांहीं मजकूर सरकारास समजविण्याचे व

कोणतेहि उद्योगास लोकांनीं एकत्र होण्याचे व छापण्याचे अपकीर्तीचे भयानें दुर्गण टाकावयाचे कारण वर्तमानपत्र आहे" * अशा शब्दांत 'ज्ञानप्रकाश'कर्त्यांनीं वर्तमानपत्र काढण्याचा आपला उद्देश व्यक्त केला आहे. १८३५ च्या कायद्यानें हिंदी लोकांना मुद्रणस्वातंत्र्याचा हक्क मिळाला होता. ह्या हक्काचा उपयोग करून सरकारी राज्ययंत्रांतील दोष अधिकाऱ्यांच्या नजरेस आणणें हें तत्कालीन संपादकांना आपलें कर्तव्य वाटलें. "जो सरकारचा नोकर तो लोकांचा चाकर व छापणार लोकांचे डोळे आहेत" ¶ अशा कर्तव्यबुद्धीनें त्यांनीं हें कार्य हातीं घेतलें; व राजकीय क्षेत्रांतील निरनिराळ्या प्रश्नांची सतत चर्चा करून त्यांवर लोकमत तयार केलें. 'दर्पण', 'प्रभाकर', 'ज्ञानप्रकाश', 'धूमकेतु' हीं त्याकाळचीं प्रमुख वृत्तपत्रें होत. भाऊ महाजन ह्यांच्या प्रभाकर पत्रांत अनेक राजकीय लेख प्रसिद्ध झाले आहेत. साताऱ्या राजाला कंपनी सरकारनें पदच्युत केलें तेव्हां येथील सुशिक्षितांच्या मनांत खळबळ उडाली. साताऱ्चें राज्य हा मराठेशाहीचा शेवटचा अवशेष होता. शिवाय ब्रिटिश येथें येण्यापूर्वीं सातारकर व दक्षिणेंतील जहागिरदार यांच्या दातृत्वावर येथील उच्चवर्णियांचा उदरनिर्वाह चालला होता. तेव्हां पंचवीस तीस वर्षांच्या काळांत ही गादी खालसा होतांना पाहून त्यांना खंत वाटणें स्वाभाविक होतें. प्रभाकर पत्रांतून हें शल्य तीव्रतेनें प्रगट झालें आहे. मात्र ह्या जुन्या संस्थानाचा अभिमान राखूनहि भाऊ महाजनांनीं नव्या कल्पना लोकांसमोर मांडल्या. या दृष्टीनें 'प्रभाकर' पत्रांत प्रसिद्ध झालेले 'ग्रेट ब्रिटन देशाची राजनीति' व 'फ्रेंचाचे बंडाचा वृत्तान्त' हे लेख महत्त्वाचे आहेत. अठराव्या शतकांत युरोपमध्यें राष्ट्रवादाचा भावनात्मक आविष्कार फ्रान्सच्या राज्यक्रांतीमधून झाला; आणि राष्ट्रवादाला पोषक अशा लोकशाहीप्रधान संस्था इंग्लंडमध्यें विकास पावल्या. फ्रान्सची राज्यक्रांति व इंग्लंडची शासनपद्धति यांच्याकडे विचारवंतांचें लक्ष वेधलें जाण्याचें कारण महाराष्ट्रांतहि राष्ट्रवादाच्या उदयाची पूर्वतयारी होत होती हेंच होय.

---

* रा. गो. कानडे—मराठी नियतकालिकांचा इतिहास, पृ. ३६.

¶ कित्ता पृ. ३६.

लोकहितवादींनीं प्रभाकरांतील आपल्या शतपत्रांत लोकसत्ताक राज्य-व्यवस्थेच्या मूलतत्त्वांचें दिग्दर्शन केलें; आणि पेशवाई गेल्याबद्दल हळहळणाऱ्या पांढरपेशा समाजांत नव्या राजकीय आकांक्षांचें बी पेरलें. राजनीतीचा विचार करतांना ब्रिटिशांची शासनसंस्था त्यांच्या डोळ्यासमोर होती. कायद्याच्या दृष्टीनें सर्व माणसें समान आहेत हें ब्रिटिशांच्या राजनीतीचें पहिलें तत्त्व आहे. प्रत्येक नागरिकाला कांहीं नैसर्गिक हक्क आहेत; आणि ते अबाधित राखणें समाजाचें कर्तव्य आहे असें इंग्रज लोक मानतात. म्हणून बेजबाबदार राजे आणि जुलुमी अधिकारी यांच्या लहरीपासून सामान्य माणसाला वांचविण्याची इंग्रजांच्या राज्यघटनेंत तरतूद आहे. हिंदुस्थानांतील शासनपद्धतीमध्येंहि यांतील कांहीं तत्त्वांचा इंग्रज अधिकाऱ्यांनीं साहजिकच अवलंब केला. अशा राज्यव्यवस्थेंत व्यक्तीला सुरक्षितता आणि स्वातंत्र्य मिळत असल्यामुळें लोकहितवादींना ती अधिक हितकारक वाटली. इंग्रजांचें गुणगान केल्याबद्दल लोकहितवादींवर अनेकांनीं आग पाखडली आहे. त्यांना परधार्जिणे व स्वाभिमानशून्य ठरविलें आहे. परंतु इंग्रजी राज्याची त्यांनीं केलेली स्तुति ही मुख्यतः त्या राज्यव्यवस्थेंतील मूलतत्त्वांची प्रशंसा आहे हें आपण ध्यानांत घेतलें पाहिजे. प्रजेचें सुख आणि हित हेंच कोणत्याहि राज्यसंस्थेचें मुख्य उद्दिष्ट असलें पाहिजे; व तें प्रत्यक्ष अंमलांत आणण्यांतच तिची मुख्य कसोटी आहे हा लोकहितवादींच्या म्हणण्याचा इत्यर्थ होता. राज्यसंस्थेच्या उद्दिष्टांच्या बाबतींतील त्यांचे विचार फार प्रगल्भ आहेत. तत्कालीन इंग्रज राज्यशास्त्रज्ञांनीं नुसती कायदा व सुव्यवस्था राखणें एवढेंच शासनसंस्थेचें कार्य मानलें होतें. परंतु लोकहितवादींनीं प्रजेच्या दुःखदारिद्र्याचें निवारण करणें ह्यालाहि तितकेंच महत्त्व दिलें. शांतता व सुरक्षितता यांबद्दल त्यांनीं इंग्रजांना धन्यवाद दिले. त्याबरोबरच हिंदुस्थानला दरिद्री केल्याबद्दल त्यांना दोष देण्यास ते कचरले नाहींत.

राज्यसंस्थेच्या उद्दिष्टांप्रमाणें निरनिराळ्या शासनपद्धतींच्या इष्टानिष्टतेचाहि त्यांनीं विचार केला; आणि इंग्लंड–अमेरिकेचा इतिहास ध्यानांत घेऊन लोकसत्ताक पद्धति सर्वांत श्रेष्ठ ठरविली. "सरकारची मातोश्री लोक आहेत,"‡

‡ शतपत्रें, पृ. २६४.

सरकारचे अधिकार प्रजेच्या अनुमतींतून उगम पावतात; व राज्याचें स्थैर्य व सामर्थ्य नागरिकांच्या निष्ठेवर अवलंबून असतें. म्हणून ही निष्ठा कायम राखण्यासाठीं कायदे करतांना लोकांची संमति घेणें आवश्यक आहे असें त्यांचें मत होतें. लोकसत्ताक शासनपद्धतींत नागरिकांचे हक्क सुरक्षित राहण्याचा आणि त्यांच्या हिताकडे लक्ष पुरविलें जाण्याचा अधिक संभव असतो म्हणून त्यांनीं तिचें समर्थन केलें. हिंदुस्थानांत अशी पद्धति आल्यास सध्यांच्या सरकारपेक्षां ती अनेक पटींनीं चांगली होईल असें त्यांनीं म्हटलें आहे. परंतु लोकसत्ताक पद्धति राबविण्याची पात्रता व शहाणपण लोकांमध्यें आल्याशिवाय ती यशस्वी होणार नाहीं असें दिसून आल्यामुळें लोकशिक्षणाच्या मार्गाकडे त्यांनीं आधीं लक्ष पुरविलें.

हिंदुस्थानांतील लोकांचें भवितव्य उज्ज्वल आहे असा त्यांचा विश्वास होता. त्यांच्या हक्कांचीहि त्यांना जाणीव होती. आपल्या देशांत इंग्लंडसारखें एक जबाबदार पार्लमेंट असावें, आणि जातीचा विचार न करतां लायक माणसांचा त्यांत समावेश करण्यांत यावा ही कल्पना त्यांनीं शंभर वर्षांपूर्वी लोकांपुढें मांडली; आणि त्याला मूर्तस्वरूप येण्याच्या दृष्टीनें अर्ज व शिष्टमंडळें यांचा सनदशीर मार्ग सुचविला. हे हक्क प्रजेला दिले नाहींत तर अमेरिके-प्रमाणें येथेंहि बंड होईल असें सरकारला बजावण्यास ते चुकले नाहींत. मात्र गुन्हेगारांची स्वार्थी दंगल व जनतेची न्याय्य उठावणी यांतील फरक त्यांना माहीत होता. जनतेच्या उठावणीसाठीं बराच काळ तिच्या शिक्षणाची तयारी करावी लागते. या लोकशिक्षणाच्या कार्यांत वृत्तपत्रांना फार महत्त्वाचें स्थान आहे. जनतेच्या अडचणी व आकांक्षा बोलून दाखविण्याचें कार्य तीं करीत असल्यामुळें सरकार व लोक ह्यांच्यांतील तो दुवा आहे; ती लोकांची 'बृहत्तर जिव्हा' आहे, असें म्हणून त्यांनीं वृत्तपत्रांचा गौरव केला आहे.

लोकहितवादींच्या पूर्वी आपल्याकडे एकराष्ट्रीयत्वाची कल्पना जन्म पावली नव्हती. सुयंत्रित राज्यपद्धति व दळणवळणाचीं साधनें यांच्या अभावीं राष्ट्रीय ऐक्याची भावना निर्माण होणें शक्यच नव्हतें. दर्पणप्रभाकरांतून बंगाल व इतर प्रांतांचे उल्लेख असले, तरी त्यांत परकीपणाचा सूर होता. लोकहितवादींचे विचारहि मुख्यतः महाराष्ट्रावरच केंद्रित झाले होते. महाराष्ट्रीय उच्चवर्णियांची

स्वार्थी, भांडखोर व लाचार वृत्ति पाहून त्यांना हळहळ वाटत होती; आणि त्यांच्यांत स्वदेशाभिमान व एकजूट उत्पन्न करण्यासाठीं ते झटत होते. असें असूनहि इतर प्रांत त्यांच्या दृष्टीच्या टप्प्यांतून सुटले नाहींत. हिंदुस्थान हा एकच अखंड देश आहे अशी कल्पना त्यांच्या लेखामध्यें आढळते. मराठ्यांच्या स्वाऱ्यांबद्दल ते लिहितात, 'जेव्हां मराठे लोक शिंदे, होळकर, परमुलुखांत ( म्हणजे त्यांचे समजुतीप्रमाणें पर मुलूख परंतु वास्तविक पाहिलें तर मुलूख एक ) गेले, तेव्हां त्यांची वर्तणूक कशी होती ?" † एकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेमुळेंच त्यांनीं अखिल हिंदुस्थानच्या प्रश्नांचा विचार केला. हिंदुस्थानांतील लोकांबद्दल बोलतांना हिंदु हा शब्द त्यांनीं वारंवार वापरला असला तरी त्यांचा वास्तविक आशय भारतीय असाच होता. निरनिराळ्या जातींच्या व प्रांतांच्या लोकांनीं एकत्र येऊन आपलें हित करून घेतलें पाहिजे असें मत त्यांनीं मांडलें आहे. अशा रीतीनें निरनिराळ्या क्षेत्रांतील राष्ट्रीय प्रश्नांकडे लोकांचें लक्ष वेधून त्यांनीं महाराष्ट्रांत राष्ट्रवादाला अनुकूल भूमिका तयार करून ठेवली.

## सार्वजनिक कार्याचा श्रीगणेशा

सुधारणेच्या कल्पना निश्चित झाल्यावर त्या प्रत्यक्षांत उतरविण्याच्या मार्गांचा साहजिकच शोध होऊं लागला. लोकोद्धाराच्या तळमळीनें विशिष्ट कार्यक्षेत्रांत जन्मभर सतत झिजत राहाण्याचा ख्रिस्ती धर्मोपदेशकांचा आदर्श लोकांच्या डोळ्यांसमोर होताच. त्यांचे धर्मप्रसाराचे प्रयत्नहि सेवाप्रधान व संघटित होते. त्यांच्या स्फूर्तीनें व प्रोत्साहनानें येथील सुशिक्षितांनीं आपल्या लोकांच्या सुधारणेसाठीं अनेक मंडळ्या काढल्या. 'स्टुडंटस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी', 'परमहंस मंडळी', 'कल्याणोन्नायक मंडळी', 'महार, मांग इत्यादि लोकांस विद्या शिकविण्याकरितां मंडळी' 'बाँबे असोसिएशन' ह्या त्या काळांतील प्रमुख संस्था होत. ह्यापैकीं यशस्वी झालेल्या बहुतेक संस्था शिक्षणक्षेत्रांतील होत्या. त्यांनीं पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, यंत्रशास्त्र, प्राणिशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादि विषयांवर

---

† शतपत्रें, पृ. ६३.

छोटे लेख प्रसिद्ध केले. त्याचप्रमाणें स्त्रिया व मागासलेल्या जाति यांच्या शिक्षणाचें कार्यहि त्यांनीं आपुलकीनें सुरू केलें. मुंबईत जगन्नाथ शंकरशेट, दादोबा पांडुरंग, महादेव गोविंदशास्त्री कोल्हटकर व पुण्यांत ज्योतिबा व सावित्रीबाई फुले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णु मोरेश्वर भिडे, सदाशिव बल्लाळ गोवंडे व मोरो विठ्ठल वाळवेकर यांनीं या प्रश्नाला प्रथम जोराची चालना दिली. निरनिराळ्या जातींचे व धर्मांचे लोक स्वयंस्फूर्तीनें ह्या संस्थांतून एकत्र जमले; आणि आपल्या देशबांधवांना सहकार्याचे व संघटनेचे पाठ देऊं लागले.

राजकीय क्षेत्रांतील संघटनांनाहि ह्याच काळांत प्रथम सुरवात झाली. १८३० नंतर इंग्रजी शिक्षण घेऊन जी पिढी तयार झाली, तिच्यावर इंग्रजांची सनदशीरपणाची परंपरा व लोकशाहीचीं ध्येयें यांचा प्रभाव पडला होता. म्हणून आपल्या मागण्या सरकारपुढें ठेवण्यासाठीं राजकीय संस्था काढण्याची या पिढींतील समाजधुरीणांना आवश्यकता वाटूं लागली. १८५३ सालीं ईस्ट इंडिया कंपनीची जुनी सनद रद्द होऊन तिला नवी सनद मिळणार होती. त्यानिमित्तानें ब्रिटिश पार्लमेंटमध्यें जो वादविवाद सुरू झाला, त्यामधून येथील लोकांचें राजकीय प्रश्नांकडे लक्ष वेधलें आणि “ कंपनी सरकारची नवीन सनद होणार त्यामध्यें फेरफार काय केला पाहिजे याविषयीं येथील लोकांची काय इच्छा असेल ती सरकारास कळविण्याकरितां” १८५२ सालीं पुणें येथें ‘दक्षणी प्रांतस्थ मंडळी ( The Dekhan Association ] ’ नांवाची सभा स्थापन झाली.* रास्ते, पुरंदरे, बिनीवाले, नातु यांसारखे सरदारजहागिरदार व गोपाळराव देशमुख, वामनराव जगन्नाथ यांसारखी नवशिक्षित मंडळी या संस्थेंत एकत्र आली होती. ‘ हिंदुस्थानांत सरदार वगैरे जमिनीचे मालक कायम राहावे, हिंदुस्थानचे राज्यकारभारांत स्वदेशीय लोकांस मोठ्या जागा व हुद्दे मिळावे व सरकारनें स्वदेशांतील लोकांचें दारिद्र्य जाण्याविषयीं उपाय काय योजावे या गोष्टींविषयीं सरकारकडे अर्ज करण्याचा या मंडळीनें विचार केला होता. सरंजाम वंशपरंपरेनें चालावेत, वतनें चालू राहावींत, सरंजामदारांचे अधिकार व किताब यांमध्यें फेरफार होऊं नये, इनाम जमिनीबद्दल

* ज्ञानोदय, १ एप्रिल १८५२.

१८२७ व १८३३ मध्यें जे कायदे झाले होते ते रद्द न करतां पुन्हां जारी करण्यांत यावेत इत्यादि कलमांमागील प्रेरणा स्पष्ट आहे. उलट सरकारी नोकऱ्या किंवा धंदेशिक्षण याविषयींच्या मागण्यांमागें मध्यमवर्गीय प्रवृत्ति व हितसंबंध उघड दिसून येतात. मात्र जुन्या युगाच्या अस्तामुळें हताश बनलेला सरंजामदारवर्ग आणि नव्या सुधारणांची आशा बाळगणारा सुशिक्षित मध्यमवर्ग यांची ही आवळ्याची मोट फार काळ टिकूं शकली नाहीं; आणि आपआपसांतील भांडणामुळें दोन चार महिन्यांतच ही मंडळी संपुष्टांत आली.§

मुंबईच्या बॉंबे असोसिएशननें मात्र बराच काळ निर्धारानें व धीरगंभीरपणानें आपलें कार्य चालू ठेविलें. "या इलाक्याचा सरकारचे अंमलाखालीं जे एतद्देशीय राहातात त्यांचा अनुपपत्तींची चौकशी करून या देशाची सुधारणूक करण्यास व येथील लोकांची कल्याणवृद्धी करण्यास कोणते उपाय अवश्य आहेत ते सरकारास नेहेमी कळीवणे"¶ या उद्देशानें मुंबईत १८५२ च्या ऑगस्ट महिन्यांत या संस्थेचा जन्म झाला. मुंबईतील निरनिराळ्या जातींचे प्रतिष्ठित व वजनदार गृहस्थ तिचे सभासद असून जगन्नाथ शंकरशेठ, डॉ. भाऊ दाजी, विनायक जगन्नाथजी, नवरोजी फर्दुनजी व बोमनजी होरमसजी हे तिच्या कार्यकर्त्यांपैकीं प्रमुख होते. कंपनीच्या सनदेंत कोणता फेरफार करावा हें ब्रिटिश सरकारला सुचविण्याच्या हेतूनें बॉंबे असोसिएशननें एक जाहीर सभा भरविली; आणि मुंबई, ठाणें व पुणें येथील लोकांच्या ३००० सह्या असलेला एक अर्ज पार्लमेंटसभेकडे सादर केला. हिंदुस्थानच्या कारभारासाठीं बोर्ड ऑफ कंट्रोलऐवजीं इंडिया कौन्सिल नांवाचें पार्लमेंटसभेला प्रत्यक्ष रीतीनें जबाबदार असणारें मंडळ असावें, राज्यकारभाराचा खर्च कमी करण्यांत यावा, हिंदी लोकांना राज्यकारभारांत भाग मिळावा, युनिव्हर्सिट्यांची स्थापना व्हावी, दळणवळणाच्या साधनांची वाढ करावी, जमिनीच्या साऱ्यापैकीं शेंकडा ५ टक्के त्या त्या जिल्ह्यांत ठेवून रस्ते, पूल, तळीं इत्यादि लोकोपयोगी कामांसाठीं त्याचा उपयोग करण्यांत

---

§ ज्ञानोदय, १६ ऑगस्ट १८५२.

¶ बंबे आसोसिएशन सभेचा हकिकतीचें पुस्तक, १८५२, पृ. ८.

यावा व कंपनीच्या कारभाराची दर दहा वर्षांनीं चौकशी व्हावी इत्यादि मागण्यांचा या अर्जांत समावेश करण्यांत आला होता.§ त्यानंतरहि न्यायखातें, पोलीसखातें इत्यादि बाबतच्या लोकांच्या तक्रारी सरकारच्या कानावर घालून त्या दूर करण्यासाठीं बाँबे असोसिएशननें बरीच खटपट चालविली होती. राजकीय स्थित्यंतरामुळें झालेला गोंधळ नाहींसा होऊन सरकार व प्रजा यांचे संबंध सलोख्याचे राहावेत अशी या संस्थेच्या कार्यकर्त्यांना तळमळ होती. ब्रिटिश लोकांच्या सद्‌भावनेवर विश्वास ठेवून लोकमताच्या बळावर सनदशीरपणें राजकीय हक्क मिळविण्याचा पहिला प्रयत्न या दृष्टींनें ह्या अर्जाला हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासांत फार महत्त्व आहे. ह्या संस्थेमध्यें पारशी व गुजराती व्यापारी आणि सुशिक्षित मध्यमवर्गीय लोकच विशेष असल्यानें सरंजामदारांचे हक्क कायम राहावेत ही मागणी त्यांच्या अर्जांतून वगळली गेली हें साहजिकच आहे. युनिव्हर्सिट्यांची स्थापना व्हावी, किंवा दळणवळणाच्या साधनांत वाढ करण्यांत यावी या मागण्या वरिष्ठ वर्गीय असल्या तरी एकंदर समाजाच्या हितास त्या पोषक होत्या. उलट वंशपरंपरागत हक्क व अधिकार कायम टिकविण्याचा जुन्या वर्गाचा प्रयत्न प्रगतीच्या मार्गांत अडथळे आणण्यास कारणीभूत होत होता. म्हणूनच सरंजामदारांना त्याकाळींहि कोणाचा पाठिंबा मिळाला नाहीं. उलट बाँबे असोसिएशननें थोड्याच काळांत मुंबईतील लोकांची सहानुभूति संपादन केली; आणि मध्यमवर्ग व व्यापारी वर्ग यांच्या सहकार्यांतून राजकीय चळवळ हळुहळू वृद्धिंगत होऊं लागली.

## कोणीकडून कोणीकडे ?

याप्रमाणें पेशवाईच्या अस्तानंतरच्या पहिल्या चाळीस वर्षांत महाराष्ट्रीय नेत्यांना आधुनिक संस्कृतीच्या मूलतत्त्वांचा साक्षात्कार झाला. जुनी समाजसंस्था अजून ढांसळली नव्हती. नवी अर्थपद्धति हळुहळू पुढें येत होती. १८५० नंतर रेल्वेला सुरवात झाली, मुंबईत कापसाची पहिली गिरणी निघाली. या घटनांचे परिणाम पुढें दिसून यावयाचे होते. या संक्रमणकाळांत दोन भिन्न संस्कृतींच्या

---

§ Petition to Parliament from the members of the Bombay Association, 1852.

संपर्कांतून निर्माण झालेला गोंधळच आपल्या दृष्टीस पडतो. इंग्रजांचा इतिहास व वाङ्मय यांच्या अभ्यासाला सुरवात झाली असली, तरी युरोपीय दृष्टिकोन पूर्णपणें आत्मसात् करण्याइतकी सुशिक्षितांच्या बुद्धींत अजून कुवत नव्हती. म्हणून बहुतेक लेखकांच्या विचारांत उत्साह, स्फूर्ति व ताजेपणा असला तरी चिकित्सक दृष्टीचा अभावच आहे. नव्या युगाच्या दर्शनानें भांबावून गेलेल्या अव्वल इंग्रजींतील या पहिल्या पिढीकडून सुसंबद्ध व सखोल विचारांची अपेक्षा करणेंच चुकीचें नव्हे काय ?

कोणत्याहि समाजव्यवस्थेंत नवे वर्गच नव्या कल्पना लवकर स्वीकारतात. पण त्या प्रत्यक्षांत उतरविण्यासाठीं त्यांना प्रतिष्ठित वर्गांशीं झगडा करावा लागतो. म्हणूनच विचारानें कितीहि उंच भराऱ्या मारल्या, तरी कृतीची वाटचाल बहुधा मंदच असते. समाजसुधारणेच्या सर्व क्षेत्रांत शिक्षणाचें क्षेत्र सर्वांत निरुपद्रवी आहे. शैक्षणिक बाबतींतील क्रांतीचे परिणाम समाज-रचनेवर तात्काळ दिसून येत नाहींत. म्हणून नव्या सुधारणांना शिक्षणक्षेत्रा-पासून सुरवात झाली. त्या ठिकाणींहि मुलींची शाळा काढणाऱ्या सावित्रीबाई फुले यांचा पुण्यांत जो छळ झाला, त्यावरून सुधारणाविरोधकांच्या असहिष्णुतेची व अविवेकाची चांगली कल्पना येते. राजकीय बाबतींत मुख्य झगडा परकीयांशीं असल्यामुळें तेथें सर्व वर्गांचे हितसंबंध सारखे होते. राजकीय जागृतीच्या प्राथमिक अवस्थेंत या चळवळीचें उद्दिष्ट व उपाय यांबाबत वाद माजण्याचा संभव नसतो. म्हणून बॉंबे असोसिएशनला अंतर्गत विरोध सहन करावा लागला नाहीं. मात्र सामाजिक सुधारणेसाठीं जुन्या रूढींवर आघात करणें ज्यांना आवश्यक होतें त्यांचें काम सर्वांत कठिण होतें. त्यांतून पार पडण्याइतकी तत्त्वनिष्ठा, नीतिधैर्य, व संख्याबल सुशिक्षितांच्या पहिल्या पिढीमध्यें येणें शक्य नव्हतें. पेशवाईचे अवशेष व स्मृति ताजी असल्यामुळें रूढिवादाची बाजू अद्यापि खंबीर होती. म्हणून सुधारक व सनातनी यांच्यांतील झगड्याला १८५७ पर्यंत तरी तोंड लागलें नाहीं. १८५७ च्या बंडानंतर मध्ययुगीन समाजव्यवस्थेस कायमची मूठमाती मिळाली; आणि नव्या सुधारणांचीं पावलें वेगानें पडूं लागलीं.



: २ :

# राष्ट्रवादाचा उदय

राणीच्या जाहीरनाम्यानंतर हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत एक नवीन पर्व सुरू झालें. पेशव्यांचें राज्य संपुष्टांत येऊन जरी १८१८ सालींच महाराष्ट्रांत कंपनीचा अंमल सुरू झाला होता, तरी सर्वत्र शांतता व सुव्यवस्था स्थापन करण्यास इंग्रजांना तीसपस्तीस वर्षांचा कालावधि लागला. १८२६ पासून १८४६ पर्यंतच्या काळांत उमाजी नाईक, भाऊ खरे, चिमणाजी जाधव, नाना दरबारे, रघूजी आंग्र्या इत्यादि लोकांनीं रामोशी, कोळी यांसारख्या वन्य जमातींना इंग्रजांविरुद्ध उठवून अनेकदां बंडाचें निशाण उभारलें.† सरकार व सावकार यांना लुटून गरिबांना मदत करण्याच्या त्यांच्या धोरणामुळें कांहीं भागांतील लोकांना त्यांच्याबद्दल सहानुभूतिहि वाटली. पण वरिष्ठ वर्ग किंवा सर्वसामान्य जनता या दोहोंपैकीं कोणाचेंहि प्रत्यक्ष सहकार्य त्यांना मिळालें नाहीं. त्यामुळें त्यांचीं बंडें दडपून टाकणें इंग्रजांना फार सोपें गेलें. १८५७ मध्यें नानासाहेब पेशवे, राणी लक्ष्मीबाई, तात्या टोपे यांसारख्या झुंजार लढवय्यांनीं इंग्रजी राज्य उलथून टाकण्याचा शेवटचा प्रयत्न केला. मात्र त्यांचा पराक्रम कितीहि अभिमानास्पद

† Poona Gazetteer P. 308.

व स्फूर्तिदायक असला, तरी स्वराज्यस्थापनेबाबतच्या त्यांच्या कल्पना मध्ययुगीनच होत्या. देशाच्या सामाजिक, राजकीय व आर्थिक पुनर्घटनेचा त्यांच्या ध्येयांत समावेश झालेला नव्हता. म्हणून इंग्रजी राजवटीचे फायदे जेथें दिसून येऊं लागले होते, त्या ठिकाणीं बंडाच्या काळांत कोणतीच सरकारविरोधी हालचाल झाली नाहीं.

बंडवाल्यांच्या पराभवानंतर अखिल हिंदुस्थानांत ब्रिटिशांचें एकछत्री राज्य स्थापन झालें. सार्वभौम सत्तेवर सर्वस्वी अवलंबून असणारीं कांहीं संस्थानें आपल्या साम्राज्यशाहीचे आधारस्तंभ म्हणून ब्रिटिशांनीं शिल्लक ठेवलीं. पण दळणवळणाच्या साधनांमुळें होणारीं आर्थिक व सामाजिक स्थित्यंतरें थोपविण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नव्हतें. ह्या स्थित्यंतरांमुळें महाराष्ट्रांत आधुनिक विचारांना पोषक अशी पार्श्वभूमि तयार झाली. अव्वल इंग्रजींत निर्माण झालेल्या विविध प्रेरणांतून पुढें समन्वयशील नेमस्त उदारमतवाद व संस्कृतिनिष्ठ जहाल राष्ट्रवाद या दोन भिन्न विचारसरणी उदयास आल्या; आणि त्यांच्या संघर्षांतून व समन्वयांतून समाजजीवनाला अगदीं वेगळें वळण लागलें.

## आर्थिक संक्रमण

अठराशें पन्नासच्या सुमारास इंग्रज कारखानदारांच्या आर्थिक धोरणांत एक महत्त्वाचा फरक घडून येत होता. इंग्लंडांतील औद्योगिक क्रांति पुरी झाल्यामुळें आपलें भांडवल गुंतविण्यास त्यांना नवी संधि हवी होती. म्हणून हिंदुस्थानांतील पक्का माल युरोपमध्यें खपविण्याऐवजीं, इंग्लंडच्या कारखान्यां-साठीं हिंदुस्थानांत कच्चा माल उत्पादन करण्याचें, आणि रस्ते व लोहमार्ग बांधून आपल्या मालास बाजारपेठा मिळविण्याचें काम त्यांनीं तत्परतेने हातीं घेतलें. कंपनीच्या काळांत आर्थिक शोषणानें शेतकरी नागवला गेला, तरी दळणवळणाचीं साधनें अस्तित्वांत नसल्यानें ग्रामीण अर्थव्यवस्थेंतील स्वयंपूर्णतेला बाध आला नाहीं. बलुतेदारांचे व्यवसायहि निर्वेधपणें चालू होते. मात्र वाहतुकीच्या साधनांमुळें परदेशी मालाचा खप जसा वाढूं लागला, तसे जुन्या उत्पादनसाधनांना चिकटून राहिलेले महाराष्ट्रांतील शेकडों कारागीर बेकार झाले. नवे उद्योगधंदे अजून निर्माण झाले नसल्यामुळें उपजीविकेसाठीं त्यांनीं खेड्याची वाट धरली. शिपाईगिरीला वाव नसल्यामुळें हजारों सैनिकांना

शेतीखेरीज दुसरा व्यवसाय उरला नाहीं. त्यामुळें साहजिकच जमिनीवरील लोकसंख्येचा भार अतोनात वाढला.

शेतसाऱ्यांतील वाढ, धान्याऐवजीं पैशामध्यें सारा वसूल करण्याचें सरकारी धोरण, आणि नोकरशाही राज्यव्यवस्थेंतील कडकपणा व सहानुभूतिशून्यता यांमुळें शेतकऱ्यांच्या अडचणींत आणखी भर पडली. सारा भरण्यासाठीं धान्य विकणें जरूर असल्यामुळें आतां बाजारपेठेशीं त्यांचा प्रत्यक्ष संबंध येऊं लागला. या बाजारपेठेंतील भाव स्थानिक पुरवठ्याऐवजीं जागतिक अन्नधान्यपरिस्थितीवर अवलंबून असल्यामुळें त्यांची स्थिति जास्तच अनुकंपनीय झाली; आणि पैशांसाठीं त्यांना वारंवार सावकाराचे उंबरठे झिजवावे लागले. थकलेल्या कर्जामुळें त्यांच्या जमिनींनीं सावकाराच्या घरची वाट धरली. सरकारी कायदेहि शेतकऱ्यांपेक्षां सावकारांना अधिक सोयीस्कर होते. शेतीचीं अवजारें व बैल कर्जादाखल जप्त करण्यांत येऊं नयेत हें कलम १८५९ च्या कायद्यांत गाळण्यांत आलें; व थकबाकी वसूल करण्यासाठीं दावे घालण्याची मुदत १२ वर्षांवरून ३ वर्षांवर आणण्यांत आली. अमेरिकेंतील यादवी युद्धामुळें १८६२ नंतर बाजारांत तेजी येत होती. म्हणून कायद्यांतील या बदलाचे परिणाम तात्काळ दिसून आले नाहींत. भाववाढीचा फायदा घेऊन सरकारनें १८६८ सालीं सारा वाढविला. त्यामुळें भाव गडगडूं लागतांच शेतकऱ्यांच्या कर्जबाजारीपणाला सीमा राहिली नाहीं. एकट्या पुणे जिल्ह्यांत जप्तीचे अर्ज १८६८ पासून १८७३ पर्यंतच्या सहा वर्षांत १२००० पासून २८००० पर्यंत वाढले ¶ यावरून शेतकऱ्यांच्या त्यावेळच्या हलाखीची कल्पना येईल. १८७५ सालीं पुणे, सातारा, सोलापूर व अहमदनगर या जिल्ह्यांतील शेतकऱ्यांनीं दंगे करून सावकारांचीं दप्तरें जाळलीं. त्यामुळें दक्षिणेंतील शेतकऱ्यांच्या बचावासाठीं कायदा करणें सरकारलाहि भाग पडलें. पण त्यामुळें परिस्थिति सुधारली नाहीं. निसर्गानेंहि गोरगरिबांचा अंत पाहाण्याचें ठरविलें होतें. १८७६–७७ मध्यें महाराष्ट्रांत भयंकर दुष्काळ पडला, आणि शेतकऱ्यांच्या निर्धनतेचें भुकेकंगालपणांत पर्यवसान होण्यास फार वेळ लागला नाहीं.

---

¶ Keatinge : *Rural Economy in the Bombay Deccan.* p. 85.

शेतकऱ्यांच्या आर्थिक हलाखीबरोबर एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत ग्रामसंस्थेचें स्वरूपहि आमूलाग्र बदलत होतें. शेकडों वर्षें ग्रामसंस्था आणि जातिसंस्था यांच्या आधारावर भारतीय समाजव्यवस्था उभी होती. यांपैकीं जातिसंस्थेला पुरातन धर्मशास्त्राचें अधिष्ठान लाभल्यामुळें तिच्या निर्बंधांना स्वभावतःच पावित्र्य प्राप्त झालें होतें. उलट गांवकीच्या स्थैर्यास व प्रतिष्ठेस शास्त्रविहित नियमांऐवजीं मध्ययुगीन अर्थव्यवस्थेंतील स्वयंपूर्णता व समाजांतील गतानुगतिकता हीं कारणीभूत होतीं. नव्या राज्यकर्त्यांचें लक्ष आर्थिक शोषणाकडे असल्यामुळें त्यांच्या धोरणानें अर्थव्यवस्थेंत बदल झाला; व ग्रामसंस्था हळुहळू कोसळूं लागली. इंग्रजांच्या न्यायालयांनीं ग्रामपंचायतीची प्रतिष्ठा नाहींशी केली. पाटील-कुळकर्णी हे गांवकींतील कामदार न राहतां सरकारी राज्ययंत्राचे घटक बनले. रयतवारी पद्धतींत सारा भरण्याची जबाबदारी व्यक्तिगत असल्यामुळें सामाजिक जबाबदारीची कल्पना आपोआप मागें पडली. अशा प्रकारें नव्या कारकीर्दींत ग्रामीण जीवनांतील एकजिनसीपणा हळुहळू लुप्त झाला. सामाजिक बाबतींत इंग्रजांनीं तटस्थतेचें धोरण स्वीकारलें. त्यामुळें त्यांच्या राज्यांत जातिसंस्थेला मात्र धक्का लागला नाहीं. सरकारचा पाठिंबा, शेतकऱ्यांचें अज्ञान व समाजांतील गतानुगतिकता यांचा फायदा घेऊन खेड्यांतील वरिष्ठ वर्गाला बदललेल्या परिस्थितींतहि आपले हक्क व इभ्रत कायम ठेवतां आली. शहरांतील सुशिक्षित वर्गाचा तर खेड्यांशीं कांहींच संबंध उरला नव्हता. म्हणून ग्रामसंस्थेच्या ऱ्हासाची कोणीच कधीं फिकीर केली नाहीं.

## भांडवलदारी युगाचीं पूर्वचिन्हें

खेड्यांतील संपत्तीला जरी ओहोटी लागली असली, तरी १८५० च्या सुमारास मुंबई शहरामध्यें कारखानदारी युगास सुरवात झाली होती. अमेरिकेंतील यादवीयुद्धामुळें कापसाची मागणी वाढून जी तेजी आली, त्यामध्यें मुंबईंतील व्यापाऱ्यांनीं बराच पैसा मिळविला. ब्रिटिशांशीं स्पर्धा करावयाची, तर यांत्रिक उत्पादनपद्धतीचा स्वीकार करण्याखेरीज त्यांना गत्यंतर नव्हतें. म्हणून मुंबईंत गिरण्या उभारून व येथील स्वस्त कापूस नि सवंग श्रमशक्ति यांचा फायदा घेऊन अंतर्गत व्यापार काबीज करण्याची त्यांनीं

मनीषा बाळगली. १८७० नंतर गिरण्यांच्या संख्येंत हळुहळू वाढ होऊन हिंदी मांडवलदारांचा एक स्वतंत्र वर्ग निर्माण होऊं लागला. मात्र इंग्रजांच्या स्पर्धेमुळें त्याच्या स्वाभाविक विकासाला पुष्कळच मर्यादा पडल्या; आणि पहिल्या महायुद्धापर्यंत तरी हा वर्ग स्वावलंबी, सुसंघटित व सामर्थ्यवान् होऊं शकला नाहीं. नवी उत्पादनपद्धति बाल्यावस्थेंत असल्यामुळें जुन्या सरंजामदार वर्गाचें महत्त्व अद्याप शिल्लक होतें. म्हणून त्याचें पाठबळ मिळविण्याची भांडवलदारांनाहि अनेकदां गरज भासली. रेल्वे व गिरण्या यांमधील मजुरीवर पोटासाठीं अवलंबून राहाणारा कामगारवर्गहि याच काळांत उदयास आला. परंतु एकंदर लोकसंख्येच्या मानानें हा वर्ग फारच थोडा होता. शिवाय अडचणीच्या काळांत तो खेड्याकडे परत जात असल्यामुळें त्याचा खेड्याशीं असलेला संबंध अजून तुटला नव्हता. म्हणून कामगार वर्गाची जी एक स्वतंत्र जाणीव असते, ती बराच काळपर्यंत या वर्गात दिसून आली नाहीं.

मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेनंतर सुशिक्षित मध्यमवर्गाची संख्या मात्र वाढत होती. विश्वविद्यालयीन शिक्षणानें त्याच्या आकांक्षा जशा विस्तारूं लागल्या, तसें सरकारी नोकरीचें क्षेत्र स्वतंत्र कर्तृत्वास त्याला अपुरें वाटूं लागलें. राज्ययंत्रांतील जबाबदारीच्या जागा इंग्लंडमधील वरिष्ठ वर्गासाठीं राखून ठेवलेल्या होत्या. औद्योगिक क्षेत्रांतील मोक्याचीं ठिकाणें पारशी व गुजराती लोकांनीं अगोदरच हस्तगत केलीं होतीं. त्यांतूनहि पैशाच्या आशेनें व्यापारधंद्यांत शिरण्याचें ज्यांनीं धाडस केलें, त्यांना १८६५ मधल्या आर्थिक अरिष्टांत ( Share market crisis ) इतका हबका बसला कीं बराच काळ त्यांनीं परत तिकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं; व जुन्या चाकोरीचाच पुन्हां आश्रय घेतला. अशा प्रकारें महाराष्ट्रांतील बुद्धिवान् व महत्त्वाकांक्षी तरुणांची सर्वच बाजूंनीं कुचंबणा झाली होती. तेव्हां आपल्याच देशांत आपणास सत्ता, ऐश्वर्य व मानमरातब मिळविण्यास यत्किंचितहि वाव नाहीं हें शल्य त्यांच्या अंतःकरणांत सलूं लागलें.

## सांस्कृतिक पुनरुज्जीवन

विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमामुळें महाराष्ट्रीय विचारवंतांचें पाश्चात्य व पौरस्त्य तत्त्वज्ञानाकडे लक्ष वेधलें गेलें. पाठ्यपुस्तकांचा काळ संपला. अभिजात

वाङ्मयाबद्दल आतां गोडी वाटूं लागली. सतराव्या शतकापासूनच युरोपीय भाषांत संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें होण्यास सुरुवात झाली होती. परंतु वॉरन हेस्टिंग्जच्या कारकीर्दीपर्यंत पाश्चात्य पंडितांचें संस्कृत साहित्याकडे फारसें लक्ष गेलें नव्हतें. अठराव्या शतकाच्या शेवटीं चार्लस् विल्किन्स आणि विल्यम जोन्स् या इंग्रज पंडितांनीं शाकुंतल, ऋतुसंहार, भगवद्गीता, मनुस्मृति यांसारख्या प्रमुख ग्रंथांचीं इंग्रजींत भाषांतरें करून युरोपीय विद्वानांमध्यें भारतीय वाङ्मया-बद्दल गोडी उत्पन्न केली. हेन्री थॉमस कोलब्रुक यानें तर धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, व्याकरण, ज्योतिषशास्त्र व गणितशास्त्र इत्यादि विविध विषयांवरील ग्रंथांचीं भाषांतरें करून प्राच्यविद्येचें पुरातन वैभव पाश्चात्यांच्या निदर्शनास आणून दिलें. एकोणिसाव्या शतकांत जर्मनीमध्यें संस्कृतच्या अभ्यासाला सुरवात झाली. श्लेगेलबंधू, हर्डर, हंबोल्ड यांसारख्या कल्पनावादी जर्मन पंडितांना अध्यात्मवादी भारतीय तत्त्वज्ञानाबद्दल फार आकर्षण वाटलें. म्हणून वेद, उपनिषदें, धर्मशास्त्र आणि साहित्य यांचें त्यानीं सहृदयतेनें व सूक्ष्म दृष्टीनें अध्ययन केलें. बूर्नोफ, रॉथ व मॅक्सम्युलर यांनीं तर हिंदु व बौद्ध धर्मग्रंथांच्या प्रकाशनाची व परिशीलनाची एक स्वतंत्र परंपराच सुरू केली.§ तेव्हां मिशनऱ्यांची उथळ व एकांगी टीका मागें पडून भारतीय संस्कृतीच्या समतोल व सहानुभूतिपर अशा मूल्यमापनाला सुरवात झाली. शिलींग, शोपेनॉर यांसारख्या जर्मन विचारवंतांनीं वैदिक तत्त्वज्ञानाचीं गाइलेलीं स्तुतिस्तोत्रें ऐकून महाराष्ट्रीय तरुणांचा स्वाभिमान जागृत होणें, आपलें साहित्य व तत्त्वज्ञान यांच्याबद्दलच्या त्यांच्या प्रेमाला भरती येणें स्वाभाविक होतें. या संशोधकांचीं अनुमानें एतद्देशियांच्या पूर्वग्रहांना किंवा अहंकाराला जशीं केव्हांकेव्हां पोषक झालीं, तशीं कित्येकदां बाधकहि ठरलीं. तेव्हां त्यांना उत्तरें देण्यासाठीं येथील अभ्यासकांना प्राच्यविद्यासंशोधनाची निकड वाटली. इंग्रजी अंमलाच्या सुरवातीपासून ग्रॅन्ट डफ, प्रिन्सेप, टॉड, एल्फिन्स्टन, मालकम् इत्यादि इंग्रज इतिहासकारांनीं हिंदुस्थानच्या इतिहासावर अनेक ग्रंथ लिहिले होते. त्यांच्या परिश्रमामुळेंच

§ M. Winternitz : *A History of Indian Literature.* Introduction. pp. 9–21.

आम्हांस इतिहासाचें महत्त्व कळून आलें. परंतु पक्षांधतेमुळें कळत-नकळत सत्याची गळचेपी करून हिंदी लोकांची नालस्ती करण्याकडे ह्यापैकीं कांहीं इतिहासकारांची प्रवृत्ति होती. तेव्हां त्यांच्या ग्रंथांतील अपसिद्धान्तांचें खंडन करण्यासाठीं महाराष्ट्रांतील सुशिक्षितांनीं इतिहाससंशोधनाचें कार्य मोठ्या ईर्षेनें हातीं घेतलें. इतिहासाच्या अध्ययनाबरोबर जुन्या मराठी वाङ्मयाचा अभ्यासहि होऊं लागला. अशा प्रकारें जुनें वाङ्मय, तत्त्वज्ञान व इतिहास यांच्या परिशीलनांतून सांस्कृतिक पुनरुज्जीवनाची एक नवी चळवळ ( Renaissance ) महाराष्ट्रांत सुरू झाली; आणि तिच्यामुळें राष्ट्रवादी तत्त्वज्ञानाला उठाव मिळाला.

व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दींत इंग्लंडमध्यें उदारमतवादी विचारसरणीस बरीच मान्यता लाभली. बेंथॅम, मिल यांसारखे उपयुक्ततावादी तत्त्वज्ञ व स्मिथ, रिकार्डो यांसारखे व्यक्तिवादी अर्थशास्त्रज्ञ यांनीं व्यक्तिस्वातंत्र्य, आर्थिक धोरण इत्यादि विषयांवर जे विचार प्रगट केले, त्यांना अनुसरून राजकीय व आर्थिक व्यवस्थेंत सुधारणा होऊं लागली. १८३२ च्या कायद्यानें ब्रिटिश पार्लमेंट ही एक जबाबदार व प्रातिनिधिक अशी संस्था बनली. १८४६ च्या कायद्यानें जकातीचे सर्व निर्बंध दूर करून आंतरराष्ट्रीय व्यापारास उत्तेजन देण्यांत आलें. ह्याचवेळीं इंग्लंडच्या मजूरवर्गांतहि जागृति घडून येऊन आर्थिक व राजकीय हक्कांसाठीं त्यानें मागणी सुरू केली; व त्याला संरक्षण देण्यासाठीं अर्थव्यवस्थेंत हस्तक्षेप करणें सरकारला भाग पडलें. इंग्लंडचा इतिहास व तत्त्वज्ञान वाचणाऱ्या सुशिक्षितांवर या सर्व घडामोडींचा परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. म्हणून उदारमतवादी विचार आत्मसात् करून त्यांच्या अनुरोधानें येथील सामाजिक, राजकीय व आर्थिक परिस्थितींत सुधारणा घडवून आणण्याचा त्यांनीं निश्चय केला.

निरनिराळ्या प्रांतांतील लोकांच्या विचारविनिमयाला दळणवळणाच्या नव्या साधनांचा बराच उपयोग झाला. बाबू केशवचंद्र सेन, ईश्वरचंद्र विद्यासागर, दयानंदसरस्वती प्रभृति परप्रांतीय पुढाऱ्यांशीं प्रत्यक्ष चर्चा करण्याची पुणेंमुंबईकरांना वारंवार संधि मिळूं लागली. परस्परांचे अनुभव व दृष्टिकोन समजून घेतल्यावर त्यांना एकमेकांबद्दल आत्मीयता व सहानुभूति

वाटूं लागली; आणि जुन्या समजुतींशीं झगडा करून नव्या कल्पना प्रसृत करतांना त्यांना एकमेकांचा पाठिंबा मिळवितां आला. ह्या सहकार्यांमधून समाजाच्या सर्वांगीण सुधारणेचा सावधपणें पण श्रद्धापूर्वक प्रसार करणारा सुधारकांचा एक गट प्रत्येक प्रांतांत निर्माण झाला.

## गुजरात आणि महाराष्ट्र

मुंबईसारख्या शहरांत राहणारे गुजराती व पारशी व्यापारी आणि महाराष्ट्रांतील सुशिक्षित मध्यमवर्गीय लोक यांच्यावर एकाच वेळीं इंग्रजी संस्कृतीचा प्रभाव पडत होता. परंतु प्रत्येकाची ऐतिहासिक पार्श्वभूमि आणि वर्तमानकालीन परिस्थिति यांच्या अनुषंगानें त्यांच्या प्रतिक्रिया निरनिराळ्या झाल्या. महाराष्ट्रीय सुशिक्षितांप्रमाणें गुजराती व्यापारीहि उच्चवर्णीय होते. परंतु त्यांच्यामागें महाराष्ट्रीयांप्रमाणें नजीकच्या काळांतील वैभवशाली राजकीय इतिहास किंवा सांस्कृतिक परंपरा नव्हती. तसेंच अनेक पिढ्यांच्या अनुभवानें व्यापारांतील कसब त्यांनीं हस्तगत केलें होतें. म्हणून नव्या जमान्यांतहि ते अर्थकारणांत आघाडीवर राहिले. नोकरीची अपेक्षा नसल्यामुळें इंग्रजी शिक्षण घेण्याच्या भानगडींत ते पडले नाहींत. उद्योगप्रधान संस्कृतीची व्यवहारनीति त्यांच्या पूर्व संस्काराशीं विसंगत होती. म्हणून व्यावहारिक दृष्ट्या नव्या कल्पनांशीं जरी त्यांनीं जुळतें घेतलें, तरी त्यांच्या तात्त्विक चिकित्सेंत शिरण्याची त्यांना आवश्यकता वाटली नाहीं. गुजराती व्यापाऱ्यांनीं भांडवल गोळा केलें, गिरण्याकारखान्यांच्या द्वारें उद्योगधंद्यांची स्थापना केली, तरी राजकीय व सांस्कृतिक दृष्ट्या गांधीयुगापर्यंत गुजराती समाज खूपच मागें राहिला.

त्यामानानें पारशी विचारवंतांनीं समाजसुधारणेकडे अधिक लक्ष दिलें. जुन्या समाजव्यवस्थेशीं ते कोणत्याहि प्रकारें जखडलेले नव्हते. शिवाय कर्तृत्व व पैसा यांच्या जोरावर समाजांत त्यांना बरीच मानमान्यता व वजन प्राप्त झालें होतें. म्हणून साहजिकच नव्या मूल्यांची तरफदारी करण्यांत त्यांनीं पुढाकार घेतला. दादाभाई नौरोजी, नौरोजी फर्दुनजीप्रभृतींनीं प्रथम सुधारणावादाचें स्वागत केलें. त्यांनीं नवीन वर्तमानपत्रें काढलीं, शाळा उघडल्या, धर्मसुधारणेसाठीं मंडळ्या स्थापन केल्या; आणि कायद्याच्या द्वारें प्रौढविवाहादि सुधारणा प्रचलित करण्याची खटपट केली. अशा रीतीनें पारशी

समाजाचा जरी लवकर उत्कर्ष झाला, तरी अंतर्गत विरोधाच्या अभावीं त्यांच्यामध्यें अनुकरणाची वृत्तिच अधिक बळावली. म्हणून दादाभाई नौरोजींसारख्या लोकोत्तर पुढाऱ्यांबद्दल जरी सर्वांनाच आदर असला, तरी एकंदर पारशी जमातीबद्दल बहुसंख्य महाराष्ट्रीय समाजाला दुजाभावच वाटला; आणि पारशी समाजाच्या पुरोगामीपणाचा समाजसुधारणेच्या दृष्टीनें फारसा उपयोग होऊं शकला नाहीं.

आर्थिक क्षेत्रांतील कर्तृत्वाच्या अभावीं शाळाकॉलेजें आणि कोर्टकचेऱ्या यांत गुंतून पडलेल्या महाराष्ट्रीय सुशिक्षितांचें सांस्कृतिक व राजकीय क्षेत्रांकडे आधीं लक्ष गेलें. त्यांच्यामागें आंग्लपूर्व काळांतील साहित्यिकांची, तत्त्वचिंतकांची, मुत्सद्यांची व सेनानींची उज्ज्वल परंपरा होती. शाळाकॉलेजांतून इंग्रजी संस्कृतीचा व तत्त्वज्ञानाचा ते सांगोपांग अभ्यास करीत होते. म्हणून त्यांनाच प्रथम नव्या मूल्यांबद्दल कुतूहल वाटलें, राजकीय व सामाजिक क्षेत्रांतील सुधारणावादाची धुरा त्यांनीं तत्परतेनें आपल्या खांद्यावर वाहिली; आणि भारतांतील विचारजागृतीच्या कार्यास त्यांनीं फार मोठ्या प्रमाणांत हातभार लावला.

## नेमस्त उदारमतवाद

१८४० सालापासून बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग यांच्यासारख्या समाजधुरीणांनीं स्त्रीशिक्षण व विधवाविवाह या दोन बाबतींत सामाजिक चालीरीतींत आवश्यक बदल घडवून आणण्यासाठीं प्रयत्न चालविले होते. विष्णुशास्त्री बापट यांचें 'पुनर्विवाहप्रकरण' व दादोबा पांडुरंग यांचें 'विधवाश्रुमार्जन' या पुस्तकांमध्यें विधवाविवाहाच्या प्रश्नाचा शास्त्रदृष्टीनें ऊहापोह केलेला होता. प्रभाकर, ज्ञानोदय, इंदुप्रकाश इत्यादि वृत्तपत्रांनीं या सुधारणांबाबत हळुहळू लोकमत तयार केलें. १८५६ सालीं विधवाविवाहाचा कायदा झाल्यामुळें सुधारणेच्या मागातील मोठी अडचण नाहींशी झाली. परंतु या प्रांतांत सुसंघटित प्रयत्नांशिवाय समाजाचें पाऊल पुढें पडणें कठीण होतें. म्हणून विष्णुशास्त्री पंडित, श्रीकृष्णशास्त्री तळेकर, काशिनाथ महादेव थत्ते व गोपाळराव देशमुख ह्यांनीं पुण्यास १८६६ सालीं पुनर्विवाहोत्तेजक मंडळीची स्थापना केली; आणि १८६९ सालीं मुंबईस एक पुनर्विवाह मोठ्या

थाटमाटानें घडवून आणला. तेव्हां सनातन्यांचें पित्त खवळलें; आणि पुनर्विवाहाला पाठिंबा देणाऱ्या पुढाऱ्यांना बहिष्कृत करण्याची मागणी करण्यांत आली. १८७० सालीं पुनर्विवाहाच्या सशास्त्रतेबद्दल पुण्यास शंकराचार्यांच्या नेतृत्वाखालीं सनातनी व सुधारक पक्षांत नऊ दिवस कडाक्याचा वाद झाला. विधवाविवाहाच्या प्रश्नावर झालली ही खडाजंगी म्हणजे जुन्या शास्त्री वर्गानें आपलें अस्तित्व टिकविण्यासाठीं केलेली शेवटची धडपड होय.

सुधारकांच्या प्रयत्नांना तात्त्विक अधिष्ठान मिळवून देण्याचें कार्य महाराष्ट्रांत न्या. माधव गोविंद रानडे ह्यांनीं केलें. रानडे हेच खरे आधुनिक महाराष्ट्राचे जनक होत. रानड्यांनीं आपल्या विशाल व सहानुभूतिपूर्ण दृष्टीनें सामाजिक जीवनाच्या सर्व अंगोपांगांचें विश्लेषण केलें; आणि धार्मिक, सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रांतील विचारांना एका व्यापक तत्त्वज्ञानाची बैठक मिळवून दिली. विचारांतील समतोलपणा व सर्वंकषता, स्वभावांतील सहिष्णुता व औदार्य, लोकहिताची तळमळ आणि लोकसंग्रहाची हातोटी यांमुळें महाराष्ट्रांतीलच काय पण अखिल हिंदुस्थानांतील कार्यकर्त्यांनीं त्यांना गुरुस्थानीं मानलें. रानड्यांच्या काळांत इंग्लंडमध्यें ॲडम स्मिथ, बेन्थॅम, मिल ह्यांच्या उदारमतवादी विचारांचा बराच प्रसार झाला होता. विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमांतूनच या विचारसरणीची रानड्यांना प्रथम ओळख झाली. आणि त्यांच्या सौम्य, शांत व धीरगभीर वृत्तीला ती मानवण्याजोगी असल्यामुळें थोड्याच काळांत त्यांच्या मनावर तिनें आपला चांगलाच पगडा बसविला. मात्र आध्यात्मिक संस्कारामुळें हें व्यक्तिवादी तत्त्वज्ञान जसेंच्या तसें पत्करणें त्यांना श्रेयस्कर वाटलें नाहीं. शिवाय शेंकडों वर्षें रूढींनीं जखडलेल्या समाजाला उदारमतवाद संपूर्णपणें पचणें शक्य नव्हतें. लोकांची तयारी नसतांना तात्त्विक शुद्धतेचा अकारण आग्रह धरणारा मनुष्य बहुधा समाजाकडून बहिष्कृत होण्याचाच अधिक संभव असतो. म्हणून समाजाला बरोबर नेण्यासाठीं लोकाग्रणींना कार्यावर दृष्टि ठेवून तत्त्वांना पुष्कळदां मुरड घालावी लागते. रानड्यांनींहि लोकसंग्रहासाठीं आपल्या उदारमतवादाची परंपरावादाशीं सांगड घातली. आपल्या सार्वजनिक

जीवनांत ध्येयाचें अनुसंधान त्यांनीं सदैव कायम राखलें; पण वास्तवावरची दृष्टि कधीं ढळूं दिली नाहीं. त्यामुळें वैचारिक समन्वय व व्यावहारिक तडजोड हेंच त्यांच्या धोरणाचें वैशिष्ट्य बनलें.

ब्रिटिश उदारमतवाद्यांनीं ऐहिक उपयुक्तता ही सामाजिक व्यवहाराची कसोटी ठरविली होती. समाजव्यवस्था ईश्वरप्रणीत व शाश्वत नसून मानव-निर्मित व विकसनशील आहे. म्हणून परंपरागत सामाजिक बंधनांपुढें अंधपणानें मान न तुकवितां चिकित्सक बुद्धीच्या साहाय्यानें समाजहिताचें उद्दिष्ट पुढें ठेवून त्या सर्वांची फेरतपासणी केली पाहिजे असें त्यांचें मत होतें. मात्र समाजाचें हित म्हणजे समाजांतील जास्तींतजास्त व्यक्तींचें जास्तींत जास्त हित होय. समाजांतील सर्व व्यक्ति तत्त्वतः सारख्या दर्जाच्या आहेत; आणि व्यक्तिप्रेरणा हीच सामाजिक प्रगतीची प्रेरक शक्ति आहे. म्हणून आर्थिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रांत व्यक्तीच्या स्वतंत्र कल्पकतेला व कर्तृत्वाला आणि सुसंस्कृत स्वार्थप्रवृत्तीला ( free initiative and enlightened self-interest ) अधिकाधिक वाव देण्यावर सामाजिक प्रगति अवलंबून आहे अशी त्यांची श्रद्धा होती. बुद्धिनिष्ठा व व्यक्तिस्वातंत्र्य हीं मूल्यें रानड्यांनीं युरोपीय विचारवंतांकडून उचललीं. गतानुगतिकता, धर्मभोळेपणा, विहितकर्म, शब्दप्रामाण्य, असहिष्णुता आणि प्रारब्धवाद यांऐवजीं अंतःप्रेरणा, तत्त्वनिष्ठा, व्यवसायस्वातंत्र्य, बुद्धिवाद, परमतसहिष्णुता आणि प्रयत्नशीलता यांचें वर्चस्व प्रस्थापित करून समाजजीवन सुसंघटित व एकात्म बनविणें म्हणजे सामाजिक उत्क्रान्ति होय अशी रानड्यांची विचारसरणी होती. * समाजजीवनाच्या सर्व क्षेत्रांत व्यक्तीला बंधमुक्त करून तिला विकासाची संधि

* " The change which we should all seek is thus a change from constraint to freedom, from credulity to faith, from status to contract, from authority to reason, from unorganized to organized life, from bigotry to toleration, from blind fatalism to a sense of human dignity. This is what I understand by social evolution both for individuals and societies in this country. " Ranade : *Miscellaneous Writings.* p. 116.

देणें हें त्यांचें ध्येय होतें. मात्र व्यक्तिप्रेरणा उदार तशीच आक्रमक, सहानुभूतिशील तशीच स्वार्थलोलुप असूं शकते. तेव्हां समाजहिताच्या दृष्टीनें लोकांच्या मनांतील सत्प्रवृत्तींची जोपासना करून त्यांना समाजाचे जबाबदार व कर्तव्यदक्ष घटक बनविण्याच्या उद्देशानें त्यांनीं ‘प्रार्थना समाजा’ ची स्थापना केली. धार्मिक बाबतींत कर्मठपणा व कूपमंडुक वृत्ति यांना विरोध करून त्यांनीं वारकरी संतांप्रमाणें लोकांना समतेची, उदारतेची व बंधुभावाची शिकवण दिली. सामाजिक बाबतींत बालविवाह, केशवपन इत्यादि दुष्ट रूढींवर प्रहार करून प्रौढविवाह, पुनर्विवाह, स्त्रीशिक्षण इत्यादि सुधारणांचा पाठपुरावा केला. पैसा हें विष आहे, संपत्ति हें मायाजाळ आहे असल्या भ्रामक समजुती सोडून देऊन उत्पादन शक्तींचा विकास करणाऱ्या उद्योगप्रधान संस्कृतीचें त्यांनीं स्वागत केलें. तसेंच राजकीय बाबतींत लोकांच्या न्याय्य मागण्यांना व रास्त आकांक्षांना तोंड फोडण्यासाठीं ‘सार्वजनिक सभे’ची संघटना उभारली. मात्र नव्या कसोट्या मान्य करूनहि जुन्या धर्मकल्पना व सामाजिक चालीरीती यांजवर निष्ठुर प्रहार करणें त्यांना पसंत नव्हतें. व्यक्तीचें सुख आणि उन्नति यांच्यापेक्षां समाजाचें स्थैर्य आणि उत्कर्ष यांकडे त्यांचें अधिक लक्ष होतें. म्हणून व्यक्तीच्या हक्कांचें अवास्तव स्तोम न माजवितां समाजाच्या सद्भावनेला व कर्तव्यबुद्धीला त्यांनीं आवाहन केलें. भारताच्या उज्ज्वल सांस्कृतिक परंपरेचाहि त्यांना अभिमान होता. म्हणून तिच्यांतील चांगलीं मूल्यें नाहींशीं होऊं न देण्याची त्यांनीं खबरदारी घेतली. * शिवाय लोकांच्या मनावरील जुन्या परंपरेचे संस्कार दृढ होते. आणि त्यांवर एकदम हल्ला केल्यास सुधारणांना पाठिंबा मिळण्याऐवजीं लोकांचा बुद्धिभेद होईल अशी त्यांना भीति होती. ह्या कारणांमुळें जुन्या रूढींवर त्यांनीं चौफेर हल्ला चढविला नाहीं; तर नव्या प्रवाहांच्या अनुरोधानें त्यांना सावकाश पण इष्ट वळण देण्याचें त्यांनीं धोरण ठेवलें.

---

* We cannot break with the past altogether; with our past we should not break altogether, for it is a rich inheritance and we have no reason to be ashamed of it". ibid. p. 118.

सुधारणावादाचे निव्वळ तात्त्विक सिद्धान्त मांडून किंवा प्रगतीची केवळ दिशा दाखवून रानडे स्वस्थ बसले नाहींत, तर दैनंदिन व्यवहारांतील दुष्ट चालीरीतींचा नायनाट करून नव्या सुधारणा रूढ करण्यासाठीं त्यांनीं आपल्या अनुयायांना कार्यप्रवृत्त केलें. 'पुनर्विवाहोत्तेजक मंडळी', 'वक्तृत्वोत्तेजक सभा', 'वसंत व्याख्यानमाला', 'फिमेल हायस्कूल', 'प्रार्थना समाज' 'सार्वजनिक सभा' इत्यादि लहानमोठ्या संस्था म्हणजे मुख्यतः त्यांच्याच प्रयत्नांचा परिपाक होय. विष्णुशास्त्री पंडित, रामकृष्णपंत भांडारकर, सीतारामपंत चिपळूणकर, रा. ब. नूलकर, गणेश वासुदेव जोशी या मंडळींचें त्यांनीं या कार्यांत सहकार्य घेतलें. महाराष्ट्रांतील समाजसेवकांना संघटित प्रयत्नांची दीक्षा देऊन त्यांनीं संस्थात्मक जीवनाचा पाया घातला. अर्जविनंत्या, सभासंमेलनें, व्याख्यानेंमासिकें यांच्या द्वारां त्यांनीं प्रत्येक सामाजिक प्रश्नावर लोकजागृति घडवून आणण्याची महत्त्वाची कामगिरी बजावली.

## राष्ट्रवादी अर्थशास्त्र

समाजरचनेची चिकित्सा करतांना तिचें एक महत्त्वाचें अंग जी अर्थव्यवस्था तिच्याकडे रानड्यांनीं दुर्लक्ष केलें नाहीं. युरोपमधील दोनशें वर्षांतील अर्थशास्त्रीय विचारांचा आढावा घेऊन त्यांच्या अनुरोधानें हिंदुस्थानांतील अर्थव्यवस्थेचें त्यांनीं परिशीलन केलें; आणि तिच्यांतील वैगुण्याची छाननी करून त्यांच्या निराकरणाचा उपाय सुचविला. म्हणून त्यांना हिंदी अर्थशास्त्राचे जनक म्हणतात. रानड्यांच्या पूर्वी दादाभाई नौरोजींनीं राष्ट्रवादी दृष्टिकोनांतून हिंदुस्थानच्या वाढत्या दारिद्र्याचीं कारणें शोधलीं होतीं. इग्लंडच्या हिंदुस्थानांतील भांडवलावरील व्याज, लष्करावरील अफाट खर्च, हिंदुस्थानसरकारची इग्लंडमधील खरेदी आणि इंग्रज अंमलदारांचे पगार व पेन्शनें याखातर हिंदुस्थानांतून प्रतिवर्षी कोट्यवधि रुपये इग्लंडला जातात. त्यानें भारताच्या संपत्तीला गळती लागली असून तो दिवसानुदिवस अधिकाधिक दरिद्री बनत चालला आहे अशी दादाभाईंची तक्रार होती. दादाभाईंच्या विचारांतील तथ्यांश रानड्यांना मान्य होता. परंतु येथून परदेशांत जाणाऱ्या पैशाबद्दल कांहीं माल, उद्योगधंद्यांना लागणारें

भांडवल व विशेषतः संरक्षण आणि सुव्यवस्था यांचा फायदा आपल्या पदरांत पडत असल्यामुळें या आर्थिक विनिमयाच्या एकाच बाजूवर बाजवीपेक्षां जास्त जोर देण्यांत इशील नाहीं असें रानड्यांचें मत होतें. ¶ संपत्तीच्या विभाजनापेक्षां उत्पादनाचा प्रश्न मूलभूत असल्यामुळें हिंदी उद्योगधंद्याच्या विकासाकडे त्यांचे डोळे लागले होते. हिंदी उद्योगधंदे इतर देशांच्या शर्यतींत खूप मागें पडल्यामुळें सरकारनें त्यांचें संगोपन करून त्यांना ऊर्जितावस्था आणावी अशी येथील कारखानदारांची मागणी होती. हिंदुस्थान सरकार युरोपीय अर्थशास्त्रांतील तटस्थतेच्या (laissez-faire) तत्त्वानें आपल्या उदासीनतेचें समर्थन करीत होतें. रानड्यांनीं या अर्थशास्त्रीय तत्त्वाचें खरें स्वरूप उघड करून या समर्थनाचा पाया उखडून टाकला. स्मिथ-रिकार्डोंचें अर्थशास्त्र हें व्यक्तिगत स्वार्थप्रेरणा, निरंकुश स्पर्धा (perfect competition), उत्पादन साधनांची अनिरुद्ध गतिक्षमता (perfect mobility of factors of production), करारांचें निरपवाद प्रामाण्य या गृहीतकृत्यांवर आधारलेलें आहे. हीं गृहीतकृत्यें प्रगत राष्ट्रांतील अर्थव्यवस्थेलाहि तंतोतंत लागूं पडत नाहींत. मग हिंदुस्थानसारख्या मागासलेल्या देशाबद्दल तर बोलावयासच नको. आपल्या समाजजीवनावर अद्याप स्पर्धेपेक्षां मिरासदारीचा, करारापेक्षां रूढीचा पगडा अधिक आहे. लोकांच्या मनांतील जुन्या श्रद्धा व मध्ययुगीन कल्पना यांचा लोप झालेला नाहीं. सर्वसाधारण माणसाच्या जीवनाला आकार देण्यांत त्याच्या स्वतःपेक्षां कुटुंब आणि जात यांचा भाग फार मोठा आहे. प्रत्यक्ष व्यवहारांत वैयक्तिक स्वार्थाला जरी वाण नसली, तरी व्यक्तिप्रेरणा ही येथील सामाजिक जीवनाची प्रेरक शक्ति नाहीं. कांहीं ठराविक क्षेत्रें व गट वगळल्यास अनिर्बंध व खुल्या स्पर्धेची येथें कुणालाच इच्छा नाहीं, किंवा धमकहि नाहीं. जागोजाग हिंडण्यासाठीं लागणारी धडाडी, चातुर्य व गतिक्षमता यांचा येथील भांडवलदार व मजूर या दोघांमध्येंहि अभाव आहे. म्हणून मजुरी व नफा यांचे दर ठराविक आहेत. परिस्थितीप्रमाणें ते बदलत नाहींत. लोकसंख्या वाढत जाण्याऐवजीं

¶ Ranade : *Essays on Indian Economics*. p. 177.

दारिद्य आणि रोगराई यांनीं तिची खची होत आहे. आणि उत्पादनाचा गाडा ठराविक चाकोरींतच रुतून राहिला आहे. एका वर्षाला पीक आलें, तर दुसऱ्या वर्षी दुष्काळामुळें हातातोंडाची मिळणी होण्याची मारामार पडते आहे. अशा वेळीं युरोपसारख्या विकसित अर्थव्यवस्थेंतील सिद्धान्तांचा येथें वेळींअवेळीं जप करण्यानें काय निष्पन्न होणार? खुद्द पाश्चिमात्य देशांतहि या अर्थशास्त्रीय सिद्धान्तांवर अनेकांनीं आक्षेप घेतले आहेत; आणि प्रत्येक सरकारचें धोरण त्या देशांतील परिस्थितीला अनुसरून स्वतंत्रपणें ठरविलें पाहिजे असें प्रतिपादन केलें आहे. तेव्हां हिंदुस्थानांतील विशिष्ट परिस्थिति जमेस न धरतां त्या तत्त्वांचा येथें पुरस्कार करणें श्रेयस्कर नाहीं ही गोष्ट रानड्यांनीं सरकारच्या निदर्शनास आणून दिली.*

अर्थशास्त्रीय सिद्धान्त परिस्थितिसापेक्ष आहेत असें प्रतिपादण्यांत रानड्यांचा उद्देश केवळ तत्त्वचर्चेचा नव्हता. या विवेचनाच्या पार्श्वभूमीवर त्यांना हिंदुस्थानच्या औद्योगीकरणाच्या बाबतींतील जबाबदारीची सरकारला जाणीव करून द्यावयाची होती. आयात कापडावरील जकात रद्द करण्यासाठीं १८७४ सालापासून मँचेस्टर येथील कारखानदारांनीं इंग्रज सरकारच्या मागें टोचणी लावली होती. त्यावेळेपासून उद्योगधंद्यांच्या संरक्षणाच्या प्रश्नांबद्दल हिंदी अर्थशास्त्रज्ञांमध्यें चर्चा सुरू झाली. न्या. तेलंगानीं 'खुला व्यापार व संरक्षण' ह्या आपल्या निबंधामध्यें हिंदी उद्योगधंद्यांची बाजू मोठ्या कौशल्यानें मांडून श्रमविभागणीच्या तत्त्वाखालीं हिंदुस्थानच्या औद्योगिक विकासाला पायबंद घालणाऱ्या इंग्रज अर्थशास्त्रज्ञांना समर्पक व सयुक्तिक उत्तर दिलें होतें. प्रत्येक देशानें जो माल आपणांस स्वस्त दरानें काढतां येईल त्याचें उत्पादन करावें; आणि सर्व राष्ट्रांनीं त्या मालाची खुलेपणानें देवघेव करावी. म्हणजे सर्वांना स्वस्त दरानें माल मिळून सर्वांचाच फायदा होतो असा श्रमविभागणीच्या ह्या तत्त्वाचा आशय आहे. म्हणून उष्ण कटिबंधांतील लोकांनीं सुपीक जमीन व मुबलक पाणी यांचा उपयोग करून कच्चा माल पैदा करावा, व त्याच्या मोबदल्यांत यंत्रसामुग्रींत पुढारलेल्या देशांकडून पक्का माल घ्यावा असा इंग्रज अर्थशास्त्र-

---

* *Essays*. p. 9.

ह्यांच्या विवेचनाचा रोख होता. परंतु अशा प्रकारचा विनिमय हा उष्ण देशांतील लोकांच्या हिताचा ठरत नाहीं. ‘हिंदुस्थानची प्रजा आज जरी बव्हंशीं शेतीवर अवलंबून असली, तरी आपलें हस्तकौशल्य व कारागिरी ह्यांच्या जोरावर एकेकाळीं हिंदी कारागिरांनीं पाश्चिमात्यांचे डोळे दिपविले होते. तेव्हां नवीन उद्योगधंद्यांकडे न्यूनगंडानें पाठ फिरविण्याचें त्यांना कारण नाहीं. आपण कच्च्या मालाची भरपूर पैदास करतों, आणि आपला देश हीच पक्क्या मालाची मोठी बाजारपेठ आहे. तेव्हां येथील कापूस, लोखंड, ताग वगैरे माल हजारों मैल लांब युरोपांत पाठवून तेथून कापड व यंत्रसामुग्री आणण्यापेक्षां येथेंच त्यांचें उत्पादन करणें हें केव्हांहि अधिक सोयीचें व किफायतशीर होईल. मध्यां यांत्रिक बाबतींत आपण मागासलेले आहोंत हें खरें, पण पाश्चिमात्यांनीं या बाबतींत जें वर्चस्व मिळविलें तें त्यांनीं गेल्या शेंदीडशें वर्षांत संपादन केलें नाहीं का? मग हिंदुस्थानला तरी उद्योगधंद्यांचें तंत्र हस्तगत करून आपली प्रगति करून घेण्यास कोणता प्रत्यवाय आहे? आस्ट्रेलियासारख्या वसाहती आयात मालावर जबर जकात बसवून आपल्या धंद्यांना संरक्षण देत आहेत. हिंदुस्थाननेंहि त्यांचा कित्ता कां गिरवूं नये? हिंदुस्थानच्या दाट लोकवस्तीमुळें ह्या देशाला अशा संरक्षक जकातींची अधिक आवश्यकता आहे. हिंदुस्थानचा शेतकरी सर्वस्वी पावसावर अवलंबून आहे. मेघराजाची अवकृपा झाली कीं हजारों लोकांवर उपासमारीचें संकट ओढवतें. कृषि, उद्योगधंदे व व्यापार यांची सर्वांगीण वाढ हा या दैवी आपत्तींवर रामबाण उपाय आहे.’ ¶ असा तेलंग व रानडे यांचा युक्तिवाद आहे. मात्र ह्या बाबतींत हिंदी लोकांचे परिश्रम आज पुरे पडणार नाहींत. म्हणून सरकारनें परकीय स्पर्धेपासून त्यांचें संरक्षण करावें; आणि स्वतः कारखाने काढून, पतपेढ्या स्थापन करून, शेतीवरील कर कमी करून हिंदी उद्योगधंद्यांना प्रोत्साहन द्यावें अशी ‘औद्योगिक परिषदे’मधून त्यांनीं सरकारला विनंती केली.

राष्ट्रीय हितसंबंधाचें संरक्षण करणें हें कोणत्याहि सरकारचें आद्य कर्तव्य

¶ *Essays*. pp. 24–26.

आहे हा रानडप्रणीत राष्ट्रवादी अर्थशास्त्राचा गाभा आहे. राष्ट्राचा उत्कर्ष हा विशेषतः औद्योगिक विकासावर अवलंबून असतो. म्हणून ज्याठिकाणीं लोकांचे वैयक्तिक अथवा सामुदायिक प्रयत्न राष्ट्राच्या औद्योगिक प्रगतीच्या दृष्टीनें तोकडे पडतात, तेथें स्वतः पुढाकार घेऊन राष्ट्राच्या गरजा भागविणें हें सरकारचें आद्य कर्तव्य आहे ही गोष्ट रानड्यांनीं आवर्जून सांगितली.

देशाच्या आर्थिक प्रगतीची रानड्यांना अतिशय तळमळ होती. इंग्लंडसारख्या उद्योगप्रधान व संपन्न राष्ट्राचा अनुभव लक्षांत घतां हिंदी कारखानदारांना उद्योगधंदे वाढविण्यास सर्व प्रकारें उत्तेजन देणें हाच हिंदुस्थानच्या आर्थिक अभ्युदयाचा त्यांना एकमेव मार्ग वाटला. म्हणूनच युरोपमध्यें सर्वत्र प्रसृत झालेलीं स्पर्धावादाचीं तत्त्वें त्यांनीं बऱ्याच प्रमाणांत ग्राह्य मानलीं. मात्र आर्थिक विनिमय किंवा करार करणारे दोन्ही पक्ष जेथें तुल्यबल नसतील त्याठिकाणीं शासनसंस्थेनें सामर्थ्यवान् प्रतिस्पर्ध्यापासून दुर्बलांचें नेहमींच संरक्षण केलें पाहिजे असें त्यांचें मत होतें. म्हणून परकीयांच्या स्पर्धेपासून हिंदी उद्योगधंद्यांना ज्या तत्त्वानुसार त्यांनीं संरक्षण मागितलें, तें दुर्बळांच्या संरक्षणाचें तत्त्व त्यांनीं हिंदुस्थानांतील अंतर्गत व्यवस्थेलाहि प्रांजलपणें लागू केलें. सावकार व शेतकरी, जमीनदार व कुळें, उद्योगपति व कामगार यांच्या परस्परसंबंधांत त्यांनीं नेहमीं शेतकरी, कुळें व कामगार यांचीच बाजू घेतली; आणि शेतकरीकर्जनिवारण कायदा, कुळकायदा व कामगार कायदा यांना पाठिंबा दिला. दुर्बळांच्या संरक्षणाचें हें तत्त्व युरोपांत समाजवादी विचारवंतांनीं प्रथम उचलून धरलें. समाजव्यवस्थेच्या सर्व अंगांना ते निरपवादपणें लागू करण्याचा त्यांनीं आग्रह धरला; आणि कामगारवर्गाच्या संघटित शक्तीच्या जोरावर राजसत्तेला तें स्वीकारण्यास भाग पाडण्याची खटपट केली. परंतु रानड्यांच्या काळांत युरोपांतील समाजवादी चळवळहि प्राथमिक अवस्थेंत होती. समाजवादाचा पाठीराखा कामगार वर्ग येथें अतिशय अल्पसंख्य होता. म्हणून श्रमजीवी वर्गाच्या हितरक्षणार्थ सारी समाजव्यवस्था आमूलाग्र बदलूं पाहणारी समाजवादी विचारसरणी रानड्यांना त्याकाळीं स्वप्नाळु वाटली तर आश्चर्य नाहीं. परंतु आत्यंतिक व्यक्तिवादाची दुंदुभि सर्वत्र वाजत असतांना रानड्यांनीं

स्थूलमानानें हितवादी राज्यसंस्थेचें ( Welfare State ) ध्येय आपल्या डोळ्यासमोर ठेवलें, व त्यानुसार आपल्या व्यक्तिवादाला समूहवादाची ( collectivism ) जोड दिली यावरून खरोखर त्यांचें द्रष्टेपणच सिद्ध होतें.

## राजकीय संस्था आणि चळवळी

राणीच्या जाहीरनाम्यामध्यें न्याय, निःपक्षपातीपणा व धार्मिक सहिष्णुता यांबद्दल जीं आश्वासनें देण्यांत आलीं होतीं, त्यामुळें हिंदी लोकांच्या मनांत आपल्या राजकीय भवितव्याबद्दल नव्या आशा उत्पन्न झाल्या. लॉर्ड कॅनिंगच्या कारकीर्दींत कायदेमंडळांत हिंदी लोकांचे प्रतिनिधि म्हणून कांहीं बिन-सरकारी सभासदांची नेमणूक होऊं लागली. इंडियन सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेस बसण्यास हिंदी उमेदवारांना परवानगी मिळाली. १८६७ मध्यें तर उदार व सहिष्णु अशा ग्लॅडस्टनसारख्या मुत्सद्याच्या हातांत इंग्लंडच्या राजकारणाचीं सूत्रें गेलीं. तेव्हां राजकीय हक्कांबद्दलच्या हिंदी लोकांच्या अपेक्षा बळावत चालल्या. राजकीय क्षेत्रांत बॉंबे असोसिएशन ही संस्था १८५२ पासून काम करीत होतीच. हिंदुस्थानविषयीं सहानुभूति असलेल्या इंग्रज मुत्सद्यांचें हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीला साहाय्य मिळविण्यासाठीं १८६६ सालीं दादाभाई नौरोजींनीं लंडनमध्यें 'ईस्ट इंडिया असोसिएशन' नांवाची संस्था स्थापन केली. तिला हिंदुस्थानांतील प्रश्नांची माहिती करून देण्यासाठीं आणि पैशाची मदत करण्यासाठीं मुंबई, कलकत्ता इत्यादि ठिकाणीं तिच्या शाखा उघडण्यांत आल्या. पुण्यामध्येंहि १८७० सालीं 'सार्वजनिक सभा' ह्या राजकीय संस्थेचा जन्म झाला होता. ह्या सर्व संस्थांच्या कार्यांतूनच महाराष्ट्रांतील राष्ट्रवादाला पहिली पालवी फुटली.

दादाभाई नौरोजी, न्या. रानडे यांच्यासारखे समाजसुधारकच त्या काळीं राजकीय क्षेत्रांतहि आघाडीवर होते. त्यांच्या सामाजिक तत्त्वज्ञानाप्रमाणें राजकीय विचारसरणीवरहि इंग्लंडमधील विचारसंप्रदायाची छाप दिसून येते. किंबहुना त्यांचा राजकीय विचार हा त्यांच्या सामाजिक तत्त्वज्ञानाचाच एक भाग आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. राजकीय सुधारणा हें त्यांचें ध्येय नसून समाजाच्या सर्वांगीण उन्नतीचें तें एक साधन होतें. म्हणून त्यांच्या सामाजिक तत्त्वज्ञानांतील बुद्धिप्रामाण्य, व्यक्तिस्वातंत्र्य, परमतसहिष्णुता

आणि सामाजिक कर्तव्यबुद्धि हींच तत्त्वें त्यांनीं राजकीय क्षेत्रांतहि ग्राह्य ठरविलीं. स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला अनुसरून जबाबदार राज्यपद्धतीचें ध्येय त्यांना मान्य होतें. पण प्रत्यक्ष कार्य करतांना मात्र लोकांची कुवत आणि पात्रता लक्षांत घेऊन त्यांनीं त्या दिशेनें क्रमाक्रमानें पाऊलें टाकण्याचें ठरविलें. स्वराज्यापेक्षां सुराज्यावर त्यांनीं अधिक भर दिला, आणि सत्तासंपादनाची हांव न बाळगतां लोकांना आपले न्याय्य हक्क सनदशीरपणें प्राप्त करून घेण्यास प्रवृत्त केलें. आदर्शांचीं भडक चित्रें रंगवीत बसण्याऐवजीं लोकांना राजकीय शिक्षण देण्याच्या दृष्टीनें दैनंदिन जीवनांतील लहानसहान पण निकडीचे प्रश्न त्यांनीं हातीं घेतले; व सरकारी कामकाजांतील न्याय, निःपक्षपातीपणा, कायदेशीरपणा आणि नागरिकस्वातंत्र्य यांच्या जोपासनेसाठीं राज्ययंत्रांत महत्त्वाच्या सुधारणा सुचविल्या. राज्यकारभारांत हिंदी लोकांना अधिकाराच्या जागा द्याव्यात, गव्हर्नरांचीं सल्लागारमंडळें आणि स्थानिक शासनसंस्था यांच्यावर जनतेचे प्रतिनिधि असावेत अशा मागण्या त्यांतूनच उद्भवल्या. याप्रमाणें राजकीय हक्क मिळविण्यासाठीं जरी त्यांनीं खटपट चालविली असली, तरी त्यांच्या मनावरील राजनिष्ठेची पकड मात्र सुटली नव्हती. म्हणून त्यांच्या भाषणांत आणि लेखनांत पुनःपुन्हा लोकहिताच्या आग्रहाबरोबर राजनिष्ठेची ग्वाही दिलेली आढळते. स्वतःच्या सामर्थ्याचा प्रत्यय येईपर्यंत साम्राज्यशाहीच्या विरोधकांना स्वसंरक्षणासाठीं तरी राजनिष्ठेचें चिलखत आवश्यक असतें हें खरें असलें, तरी रानडे-दादाभाईच्या राजनिष्ठेंत धोरणापेक्षां भावनेचा भागच अधिक होता. त्यांच्या मनावरील प्राचीन संस्कारांप्रमाणें राजद्रोह हा नुसता गुन्हाच नव्हे, तर तें एक पाप होतें. मराठी साम्राज्याच्या ऐन उमेदींतहि दिल्लीपतीबद्दलच्या राजनिष्ठेची कल्पना संपूर्णपणें नाहींशी झालेली नव्हती. मग आतां तर काय? सर्वच बाबतींत आपण मागें पडलों होतों. इंग्रजांचें राज्य पूर्वीपेक्षां प्रगतिपर असल्यानें त्यांच्या छत्राखालीं देशाची भरभराट होईल अशी आपल्या पुढाऱ्यांना आशा होती. इंग्लडांतहि राजनिष्ठेच्या चौकटींत लोकशाही नांदत असलेली त्यांना दिसत होती. कॉब्डेन, ब्राइट, फॉसेट ह्यांच्यासारखे लोकप्रिय उदारमतवादी पुढारी वसाहतींना स्वातंत्र्य देण्याची

भाषा बोलत होते. म्हणून राजनिष्ठा व लोकशाही, साम्राज्य आणि स्वराज्य यांमध्यें तत्कालीन विचारवंतांना कांहीं विरोध भासला नाहीं. राजनिष्ठेच्या मागें राज्यकर्त्यांबद्दलच्या विश्वासाची भावना होती. इंग्लंडच्या इतिहासांत ब्रिटिशांच्या स्वातंत्र्यप्रियतेचा त्यांना पदोपदीं पुरावा मिळत होता. म्हणून राज्यकर्त्यांचीं उदार व ऐसपैस अभिवचनें त्यांनीं अक्षरशः खरीं मानलीं. त्यांच्या श्रद्धाबलानें या वचनांना त्यांनीं घटनाकायद्याची योग्यता दिली. राणीचा जाहीरनामा ही हिंदी लोकांच्या मूलभूत हक्कांची पवित्र सनद मानण्यांत आली; आणि तिच्यांतील आश्वासनांची सनदशीरपणें पूर्तता करून घेणें हेंच राजकीय चळवळीचें उद्दिष्ट ठरलें.

ब्रिटिश उदारमतवाद्यांप्रमाणें रानडे-दादाभाईंचीहि मानवाच्या बुद्धि-निष्ठेवर अढळ श्रद्धा होती. बुद्धिमत्तेच्या जोरावर सामाजिक प्रश्नांचीं सर्वमान्य उत्तरें शोधून काढतां येतील अशी त्यांना खात्री वाटली. पार्लमेंटवर प्रभुत्व राखणारी ब्रिटिश प्रजा, पार्लमेंट आणि हिंदी नोकरशाही यांना येथील परि-स्थितीची यथार्थ जाणीव करून दिल्यास त्यांच्या दृष्टीनें सुराज्याच्या मार्गांत कोणतीच अडचण नव्हती. म्हणून खुला व्यापार व जकातीचें संरक्षण, करपद्धति व अर्थव्यवस्था, स्थानिक स्वराज्यसंस्था व दुष्काळनिवारण यांपैकीं प्रत्येक प्रश्नाचा शास्त्रशुद्ध अभ्यास करून आपलीं मतें सौम्य शब्दांत पण निःसंदिग्ध-पणें त्यांनीं सरकारपुढें मांडलीं. राजकारण व अर्थकारण यांचा परस्परसंबंध त्यांनीं ध्यानांत घेतला नाहीं. म्हणून इंग्रजांचे आर्थिक हितसंबंध त्यांच्या उदारमतवादाच्या आड येतील अशी त्यांना शंका आली नाहीं. त्यामुळें राजकीय चळवळींतील त्यांचा आशावाद कधीं कमी झाला नाहीं.

उदारमतवादी विचारानुसार हक्क आणि कर्तव्यें, अधिकार आणि जबाबदाऱ्या हीं परस्परावलंबी असतात. म्हणून जनतेच्या हक्कांचें वकीलपत्र घेणाऱ्यांवर तिला आपल्या कर्तव्याची जाणीव करून देण्याची जबाबदारी येऊन पडते. ही जबाबदारी ओळखून राजकीय स्वातंत्र्यास लोकांना लायक बनविण्यासाठीं रानडे-दादाभाईंनीं लोकशिक्षणाच्या कार्यांत मन घातलें. त्यांच्या सभा आणि व्याख्यानें, अर्ज आणि निवेदनें यामागें सरकारला परिस्थितीची माहिती पुरविण्याबरोबर लोकजागृतीचाहि हेतु होता. महाराष्ट्रांत

राजकीय क्षेत्रांत त्या काळीं बॉंबे असोसिएशन, ईस्ट इंडिया असोसिएशन व सार्वजनिक सभा ह्या तीन संस्था कार्य करीत होत्या. ह्यापैकीं बॉंबे असोसिएशनच्या कार्याची कल्पना पहिल्या प्रकरणांत दिली आहेच. 'ईस्ट इंडिया असोसिएशन' ही संस्था दादाभाई नौरोजींनीं लंडनमध्यें १ डिसेंबर १८६६ रोजीं स्थापन केली. इंग्रज व हिंदी लोकांना एकत्र आणून त्यांच्यामध्यें एकमेकांबद्दल असलेला गैरसमज दूर करणें व इंग्रज लोकांना भारतीयांच्या अडचणींची नीट कल्पना आणून देणें हें या सभेचें उद्दिष्ट होतें. या असोसिएशनच्या वतीनें हिंदुस्थानसंबंधीं इंग्लंडचीं कर्तव्यें, हिंदुस्थानांतील पाटबंधारे व कालवे, सिव्हिल सर्विसची परीक्षा इत्यादि विषयांसंबंधीं चर्चा, व्याख्यानें किंवा निबंध यांच्या द्वारां इंग्लंडमधील लोकांना माहिती करून देण्यांत आली. हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांकडून आपल्या कार्यास भरपूर द्रव्यसाहाय्य होईल अशी दादाभाईंची अपेक्षा होती. म्हणून १८६९ सालीं ते हिंदुस्थानांत आले; व काठेवाडांतील संस्थानांचा दौरा काढून कच्छ, जुनागड व गोंडल येथील अधिपतींकडून त्यांनीं बरीच रक्कम गोळा केली.¶ त्याच वर्षी मुंबई, कलकत्ता व मद्रास या ठिकाणीं ह्या संस्थेच्या शाखा उघडण्यांत आल्या. सर जमशेटजी जिजीभॉय, मंगळदास नथूभाई, फ्रामजी नसरवानजी पटेल, डॉ. भाऊ दाजी, फेरोजशहा मेहता, बाळ मंगेश वागळे इत्यादि कार्यकर्ते मुंबई शाखेच्या कार्यकारिणीवर होते. १८६९ चा कापूस कायदा रद्द व्हावा, हिंदुस्थानसरकारच्या जमाबंदीची चौकशी व्हावी, आय. सी. एस्. ची परीक्षा हिंदुस्थानांत घेण्यांत यावी या प्रश्नांच्या बाबतींत लोकमत तयार करण्यासाठीं मुंबई शाखेनें बरेच परिश्रम घेतले. मात्र हिंदुस्थानच्या प्रगतीबद्दल सहानुभूति नसणाऱ्या सेवानिवृत्त सरकारी नोकरांचें लंडनमधील शाखेंत हळुहळू मताधिक्य झाल्यामुळें शेवटीं दादाभाई ईस्ट इंडिया असोसिएशनमधून बाहेर पडले. पुढें १८८५ सालीं मुंबईतील सहकाऱ्यांच्या साहाय्यानें त्यांनीं 'बॉम्बे प्रेसिडेन्सी असोसिएशन' ची स्थापना केली.*

---

¶ R. P. Masani : *Dadabhai Naoroji.* p. 111

* ibid. p. 224.

मुंबईच्या ह्या दोन्ही संस्थांतील बरेच कार्यकर्ते महाराष्ट्रीय असले, तरी त्यांच्या सभासदांत पारशी व गुजराती व्यापारीच बहुसंख्य होते. म्हणून व्यापाऱ्यांना जिव्हाळा वाटणाऱ्या कापूस कायदा, आयात मालावरील जकात इत्यादि प्रश्नांना त्यांनीं विशेष महत्त्व दिलें. सर्वसामान्य महाराष्ट्रीय जनतेच्या दुःखांची त्यांनीं फारशी दखल घेतली नाहीं. १८७० मध्यें स्थापन झालेल्या पुण्याच्या 'सार्वजनिक सभे'नें मात्र महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांना अधिक सहानुभूति दाखविली. या सभेमध्यें औंध, सांगली, जत, कुरुंदवाड इत्यादि संस्थानांचे अधिपती व पुण्यांतील सुशिक्षित मध्यमवर्गीय लोक एकत्र आले होते. पर्वती संस्थानच्या कारभाराची चौकशी करण्याची मागणी करण्यासाठीं या संस्थेचा जन्म झाला. पुढें फौजदारी खटल्यांत ज्यूरीचे हक्क, रेल्वे उतारूंच्या तक्रारी, म्युनिसिपालटींत लोकनियुक्त सभासदांच्या नेमणुका, संस्थानिक व सरकार ह्यांचे परस्परसंबंध इत्यादि अनेक प्रश्नांबाबत तिनें सरकारास वेळोवेळीं महत्त्वाच्या सूचना केल्या. विशेषतः १८७५ मधील दंगे व १८७६ चा दुष्काळ या दोन्ही प्रसंगीं सार्वजनिक सभेनें जागोजाग आपले प्रतिनिधि पाठवून माहिती गोळा केली; व विस्तृत अहवाल प्रसिद्ध केले. ह्या बाबतींत सरकारलाहि आपलें धोरण ठरवितांना सार्वजनिक सभेच्या कामाचा बराच उपयोग झाला. गणेश वासुदेव जोशी ऊर्फ सार्वजनिक काका, सदाशिव बल्लाळ गोवंडे, शिवराम हरि साठे, सीताराम हरि चिपळूणकर हे कार्यकर्ते मोठ्या उत्साहानें सभेचें काम पहात. १८७७ मध्यें वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी करण्यासाठीं एक कायदा करण्याचा लॉर्ड लिटनचें सरकार विचार करीत होतें. अशा वेळीं पत्रकर्त्यांची संघटना करण्यासाठीं सार्वजनिक काकांनीं एक परिषद् भरविली; आणि देशभर दौरा काढून या बिलाला संघटित विरोध करण्यास पत्रकर्त्यांना प्रवृत्त केलें. अशा रीतीनें १८७० ते १८९७ पर्यंत महाराष्ट्रांत सार्वजनिक महत्त्वाच्या अशा अनेक प्रश्नांबाबत जनतेला जागृत व संघटित बनविण्यांत सार्वजनिक सभेनें बराच पुढाकार घेतला.

मात्र सार्वजनिक सभेच्या कार्यकर्त्यांना शेतकऱ्यांविषयीं सहानुभूति असली, तरी संस्थानिकांबद्दलहि त्यांच्यामध्यें तितकाच आदर व आपुलकी होती. म्हणून संस्थानिकांच्या अधिकारांवर सरकारनें अतिक्रमण करूं नये

याविषयीं त्यांनीं खटपट चालविली होती. मुंबईच्या ईस्ट इंडिया असोसिएशननेंहि संस्थानिकांची मदत मागितली खरी; पण हे राजेरजवाडे नव्या पिढीच्या आकांक्षा जाणूं शकणार नाहींत अशी तिच्या कार्यकर्त्यांना भीति होती. दादाभाई काठेवाडच्या दौऱ्यावर निघाले तेव्हां डॉ. भाऊ दाजी व श्री. काशिनाथ त्र्यंबक तेलंग ह्यांनीं त्यांना तशी सूचनाहि केली होती. ¶ पुण्यांतील मध्यमवर्गीयांचे हितसंबंध मात्र संस्थानिकांच्या हितसंबंधांशीं निगडित होते. म्हणूनच पदच्युत मल्हारराव गायकवाडांना मदत करण्यासाठीं सार्वजनिक सभेनें एक लाख रुपये गोळा केले. ह्याच प्रकरणीं सार्वजनिक सभेनें सरकारला केलेल्या अर्जांतील पुढील उतारा सूचक व अर्थपूर्ण आहे. "पेशव्यांची एकेकाळची राजधानी असलेल्या या पुणें शहराचे नागरिक आपले अर्जदार, हे एकाकाळीं विस्तारलेल्या मराठी साम्राज्याचे अवशेष म्हणून राहिलेल्या बडोदा, इंदूर, ग्वाल्हेर इत्यादि संस्थानांशीं अनेक नात्यांनीं व हितसंबंधांनीं बांधले गेले आहेत. त्यांच्या चाकरींतून व धर्मदायांतून ह्या संस्थानांत कायम वास्तव्य करणाऱ्या त्यांच्या अनेक बांधवांचा योगक्षेम चालत असल्यामुळें या संस्थानांची प्रगति व ऐश्वर्य याबद्दल त्यांना साहजिकच आपुलकी वाटते". * या हितसंबंधामुळेंच सर्व वर्गांना एकत्र आणून त्यांच्या सहकार्यानें प्रगति करण्याचें धोरण सार्वजनिक

---

¶ ibid. p. 111.

* " Your memorialists as the inhabitants of the late capital of the Peishwas are bound by diverse ties of interests and relationships with the outlying conquests of the once great Maratha confederacy, represented by the states of Baroda, Indore, Gwalior etc. They feel legitimate interest in the progress and wellbeing of these states which maintain in their various services and by means of their large charities a considerable number of their fellow countrymen who have settled in those parts. " रामचंद्र गणेश बोरवणकर : गणेश वासुदेव जोशी यांचें संक्षिप्त चरित्र. पृ. ७४.

सभेला आंखावें लागलें. सुरवातीच्या काळांत लोकजागृतीच्या दृष्टीनें तिनें मोठें कार्य पार पाडलें यांत शंका नाहीं. पण पुढें काळ बदलल्यावर राजकीय चळवळीला जहाल प्रतिकारवादाचा अंगीकार करण्याची जेव्हां वेळ आली तेव्हां आपले हितसंबंध सुरक्षित राखण्याच्या जुन्या वर्गाच्या धोरणामुळें सार्वजनिक सभेचीं शकलें पडल्याखेरीज राहिलीं नाहींत.

## संशोधन व समीक्षा

सार्वजनिक सभेसारख्या संस्था राजकीय क्षेत्रांत विधायक दृष्टीनें जरी महत्त्वाचें कार्य करीत होत्या, तरी त्या कार्याला अद्याप राजकीय ध्येयवादाची जोड मिळालेली नव्हती. रानड्यांनीं महाराष्ट्रांतील राष्ट्रवादी विचारांची सूत्रबद्ध व तर्कशुद्ध मांडणी केली. परंतु सर्वसामान्य लोकांत राजकीय जाणीव फैलावण्यास त्याला भावनात्मक अधिष्ठानाची गरज होती. कोणत्याहि देशांतील सामाजिक सुधारणांचा इतिहास पाहिला तर असें दिसतें कीं सुधारणेची गरज केवळ बुद्धीला पटून चालत नाहीं, तिनें मनाची पकड घ्यावी लागते. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात महाराष्ट्रांत झालेल्या सांस्कृतिक पुनरुज्जीवनांतून येथील लोकांचा स्वाभिमान उफाळून आला; आणि त्यामुळें येथील राष्ट्रवादाला भावनेचें नवें सामर्थ्य प्राप्त झालें.

अठराव्या शतकाच्या अखेरीपासून युरोपीय पंडितांनीं संस्कृत काव्यें, धर्मशास्त्रें व तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ यांचें संपादन, अध्ययन व रसग्रहण चालविलें होतें. पण पाठ्यपुस्तकांच्या रंगणांत घोटाळणाऱ्या अव्वल इंग्रजींतील सुशिक्षितांच्या पहिल्या पिढींत त्या ग्रंथांचा सूक्ष्म दृष्टीनें अभ्यास करण्याइतकी कुवत नव्हती. म्हणून मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेपर्यंत जुन्या संस्कृत ग्रंथांच्या अध्ययनाला व संशोधनाला नवी दिशा लागली नाहीं. युरोपीय पंडितांनीं केलेली येथील वाङ्मयाची व तत्त्वज्ञानाची प्रशंसा विश्वविद्यालयांतील अभ्यासक्रमांतून जेव्हां येथील सुशिक्षितांच्या नजरेस आली, तेव्हां त्यांचें अज्ञान व औदासीन्य नाहींसें होऊन आपल्या सांस्कृतिक ठेव्याबद्दल त्यांना अभिमान वाटूं लागला. " यापूर्वीं युरोपीय पंडित आम्हांस जें सांगतील तें आम्ही निमूटपणीं मान्य करावें, त्यावर आक्षेप काढण्याचीहि आम्हांस योग्यता नाहीं, मग खंडन करण्याची वार्ता तर दूरच, असा प्रकार चोंहोंकडे असे

पण आतां व पुढें उत्तरोत्तर वरील शिरजोरपणा बिलकुल चालायचा नाहीं. इंग्रेजी शिक्षणानें आमच्या बुद्धीस जी तीव्रता आली आहे ती आमच्या गुरूंच्याच गर्वखंडनास अगोदर कारण होईल. त्यांचीं मतें जेवढीं यथार्थ असतील तेवढ्यांचेंच ग्रहण करून अज्ञानास्तव, अरसिकतेमुळें किंवा दुराग्रहानें ज्या मतिभ्रमांचा प्रसार त्यांनीं आजपर्यंत केला आहे व पुढें करतील त्यांचा आमच्या लोकांकडून निरास झाल्याविना कधीं राहावयाचा नाहीं. ''† अशा दृष्टिकोनांतून संस्कृत साहित्याच्या परिशीलनाला सुरवात झाली. खिस्ती धर्माबद्दलचा अभिमान व युरोपीय संस्कृतीचा पक्षपात यामुळें रामायण, महाभारत इत्यादि ग्रंथांविषयीं वेबर लॉरेन्सर यांसारख्या पंडितांनीं जीं विधानें केलीं होतीं, तीं खोडून काढून आपल्या ग्रंथांचें प्राचीनत्व व मौलिकता सिद्ध करण्यासाठीं भांडारकर-तेलंग प्रभृति महाराष्ट्रांतील प्राच्यविद्याविशारदांनीं खूप परिश्रम घेतले. जुने शिलालेख, ताम्रपट आणि प्राचीन ग्रंथांतील संदर्भ यांच्या मदतीनें हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाचा एक आराखडा त्यांनीं प्रथमच तयार केला, व त्याच्या अनुरोधानें आपल्या अभ्युदयाच्या व अधःपतनाच्या कारणांची मीमांसा येथं सुरू झाली.

संस्कृत ग्रंथांच्या अध्ययनाचा मराठी भाषेच्या अभिवृद्धीलाहि पुष्कळच उपयोग झाला. १८५७ पासून १८७४ पर्यंतच्या काळांत परशुरामपंत गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे, गणेशशास्त्री लेले ह्या लेखकांनीं शाकुंतल, मालविकाग्निमित्र, मालतीमाधव, उत्तररामचरित्र, मृच्छकटिक, वेणीसंहार इत्यादि नाटकांचीं मराठींत भाषांतरें केलीं. मेघदूत, ऋतुसंहार, रघुवंश इत्यादि काव्येंहि लवकरच मराठींत अवतरलीं. वेद, उपनिषदें, दर्शनें, स्मृति, साहित्य व व्याकरण यांचीं भाषांतरें व चिकित्सा धडाडीनें सुरू झाली. शंकर पांडुरंग पंडित यांचें ' वेदार्थयत्न ', रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांचें ' कौमुदी महोत्साह ', महादेव मोरेश्वर कुंटे यांचें ' षड्दर्शनाचिंतनिका ' किंवा मनुस्मृति ( भाषांतर ), याज्ञवल्क्यस्मृति ( भाषांतर ), ' वाल्मिकीरामकथा महोदय ' यासारख्या नियतकालिकांनीं जुन्या संस्कृत ग्रंथांची सर्वसामान्य मराठी वाचकांना प्रथमच ओळख करून दिली.

---

† विष्णुशास्त्री चिपळूणकर : संस्कृत कविपंचक. पृ. ८

संस्कृत ग्रंथांबरोबरच मध्ययुगीन मराठी वाङ्मयाकडे व इतिहासाकडे नव्या सुशिक्षितांचें लक्ष गेलें. १८६० सालापासून माधव चंद्रोबा ह्यांनीं आपल्या ' सर्वसंग्रह ' मासिकाच्या द्वारें प्राचीन काव्यांच्या प्रकाशनाला सुरुवात केली होती. पुढील सात-आठ वर्षांत आर्याभारत, व आनंदतनय, वामनपंडित, तुकाराम, रामदास, मुक्तेश्वर इत्यादि कवींची बरीच कविता प्रसिद्ध झाली. त्याचप्रमाणें ' काव्येतिहाससंग्रह ' मासिकांतून साने आणि मोडक ह्यानीं कांहीं बखरी छापून काढल्या. शंकर तुकाराम शाळिग्राम ह्यांनीं पोवाडे जमविण्याचें काम हातीं घेतलें. ह्या माहितीच्या आधारें ऐतिहासिक कादंबऱ्या व नाटकें यांच्या लेखनाला मराठींत सुरवात झाली; व त्यांमधून स्वधर्माचा, देशाचा व परंपरेचा गौरव करण्याची प्रथा रूढ झाली.

हें सर्व संशोधन केवळ साहित्याच्या प्रांतापुरतें मर्यादित असतें तर राष्ट्रवादाच्या इतिहासांत त्याची दखल घेण्याचें कारण नव्हतें. पण या प्रकाशनाच्या व परिशीलनाच्या मागें एक नवी दृष्टि होती. आज जरी आम्ही हिंदु लोक हीन दशेला जाऊन पोहोंचलो असलों तरी बुद्धिवैभव, कल्पना-चातुर्य, प्रतिभासामर्थ्य, पराक्रम आणि मुत्सद्देगिरी इत्यादि गुणांमध्यें आम्ही इंग्रजांहून कोणत्याहि दृष्टीनें कमी नाहीं असें दाखविण्यासाठीं ती खटपट चालली होती. आमचीं महाकाव्यें इलियड व ओडिसीहून प्राचीन आहेत, प्लेटो-ॲरिस्टॉटलप्रमाणें आमच्या ऋषिमुनींनींहि ब्रह्मांडाचा वेध घेतला आहे, आमचे कालिदास-भवभूति प्रतिभासामर्थ्यांत शक्सपियर-मिल्टनहून कोणत्याहि दृष्टीनें कमी नाहींत, शौर्य व साहस यामध्यें नेपोलियनची बरोबरी करणारे शिवाजी व बाजीराव आमच्याकडेहि होऊन गेले असें सिद्ध करण्याचा त्यामागें हेतु होता. आपल्या जुन्या वारशाची ही जी नवीन मांडणी झाली, त्यामुळें महाराष्ट्रांतील सुशिक्षितांचा न्यूनगंड नाहींसा होऊन त्यांना स्वाभिमानाची, स्वार्थत्यागाची व पराक्रमाची नवी प्रेरणा मिळाली. या परंपरेपासून मिळालेल्या स्फूर्तीमधून पुनरुज्जीवनवादी भावना-प्रधान राष्ट्रवादाचा एक प्रवाह महाराष्ट्रांत उगम पावला, व पुढील तीसचाळीस वर्षांत येथील राजकीय क्षेत्रांत ह्या प्रवाहाचा जोर जाणवूं लागला.

## राजकीय ध्येयवाद

स्वाभिमानाची शिकवण देऊन महाराष्ट्रीय तरुणांत स्वातंत्र्यभावनेची ज्योत प्रज्वलित करण्याचें श्रेय विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या ओजस्वी व स्फूर्तिदायक लिखाणाला दिलें पाहिजे. स्वत्वभावनेचा पीळ हा मालाकारांच्या व्यक्तित्वाचा व वाङ्मयाचा प्राण आहे. स्वतःच्या भाषेचा, इतिहासाचा, संस्कृतीचा, देशाचा, प्रांताचा, वर्गाचा व जातीचा ज्वलंत अभिमान हेंच त्यांच्या रसवंतीचें उगमस्थान. म्हणून इंग्रजांचे सद्गुण मान्य करूनहि त्यांच्याशीं बरोबरीच्या नात्यानें वागतांना त्यांनीं कोणताहि न्यूनगंड बाळगला नाहीं. आपल्या साम्राज्यशाहीच्या समर्थनासाठीं राज्यकर्त्यांनीं हिंदी लोकांच्या राजकीय अज्ञानाची व सामाजिक मागासलेपणाची हाकाटी चालविली होती. रानडे-दादाभाईनीं राज्यकर्त्यांच्या संस्कृतीचें हें श्रेष्ठत्व प्रांजलपणें मान्य केलें. चिपळूणकरांनीं मात्र ब्रिटिशांच्या मोठेपणाला कधींच कबुली दिली नाहीं. "आम्ही आज तीनचार हजार वर्षें या देशांत नांदलों, एवढालीं राज्यें चालविलीं, कायदेकानू केले, शास्त्रें निर्माण केलीं, कला उदयास आणल्या, ऐहिक व अध्यात्म विचार केले, ते सर्व या आंग्लभौम मंडळीच्याच जिवावर काय?"§ असा त्यांचा स्पष्ट सवाल होता. आपलें मागासलेंपण आपल्या पारतंत्र्याचें कारण नसून आपली फुटीर वृत्ति व संकुचितपणा, स्वार्थ व परधार्जिणेपणा यांतच आपल्या पराभवाचें मूळ आहे. "एकंदरींत पाहतां आपल्या आंतल्या शरीरप्रकृतीस कांहीं धक्का पोहोंचलेला नाहीं"¶ असा त्यांना विश्वास होता. म्हणून आपल्या पूर्वजांचे पराक्रम व कर्तृत्व यांचें वर्णन करून त्यांनीं सुशिक्षित मध्यमवर्गीयांचा सामाजिक अहंकार जागृत केला; आणि इंग्रजांच्या मानसिक दास्यांतून त्यांना मुक्त केलें. सामाजिक जीवनाच्या हरएक क्षेत्रांत युरोपियांची बरोबरी करणारे लोक आपल्या इतिहासांतहि अनेक होऊन गेले आहेत. तेव्हां तात्कालिक पराभवानें हताश होण्याचें आपणांस कांहींच कारण नाहीं. अमेरिका-इंग्लंड यांसारख्या देशांचीं उदाहरणें डोळ्यांपुढें

---

§ विष्णुशास्त्री चिपळूणकर : आमच्या देशाची स्थिति. पृ. ३२

¶ विष्णुशास्त्री चिपळूणकर : निबंधमाला. पृ. १०६५.

ठेवून जर आपण नेटानें प्रयत्न केले, तर अजूनहि आपणास आपलें पूर्ववैभव प्राप्त करून घेतां येईल असा त्यांच्या एकंदर वाङ्मयाचा मथितार्थ आहे.

तरुणांचा स्वाभिमान आणि महत्त्वाकांक्षा जागृत करतांना त्यांच्या पराक्रमाचा देशाला फायदा व्हावा म्हणून त्याला उज्ज्वल ध्येयवादाची जोड देण्याची चिपळूणकरांनीं दक्षता घेतली. अशा ध्येयदृष्टीच्या अभावीं वास्तव-वादाचें निष्क्रियतेंत रूपांतर होण्याचा आणि तपशीलाचें स्तोम माजून तत्त्वाला हरताळ फासला जाण्याचा संभव असतो. समाजासाठीं व्यक्तिसुखाचा होम करण्याची आणि बिकट परिस्थितीवर मात करून प्रतिकारक्षमता टिकवून धरण्याची ताकद ध्येयवादाशिवाय येत नाहीं. म्हणून जगाच्या इतिहासांत मनोराज्यात्मक ( Utopian ) वाङ्मयानेंहि फार मोठी कामगिरी केली आहे. चिपळूणकरांच्या 'निबंधमाले'ला महाराष्ट्रांत अनन्यसाधारण लोकप्रियता लाभली याचें कारणहि हेंच होय. तात्कालिक प्रश्न किंवा निकडीच्या सुधारणा यांमध्यें गुंतून न पडतां प्रत्यक्ष राजसत्तेवरच त्यांनीं आपली नजर रोखली. ब्रिटिशांचें हित आणि हिंदुस्थानची उन्नति यांतील विरोध त्यांनीं उघडपणें मांडला; आणि मायावी सुधारणेच्या प्रलोभनाला किंवा दडपशाहीच्या अस्त्राला न जुमानतां खऱ्याखुऱ्या स्वातंत्र्यासाठीं धडपडण्याची त्यांनीं लोकांना शिकवण दिली.

चिपळूणकरांचें वाङ्मय स्फूर्तिनिष्ठ व भावनाप्रधान आहे. त्यांच्या शैलींत प्रसन्नता व लालित्य आहे, उत्कटता व परिणामकारकता आहे; ओज आणि अभिनिवेश आहे. त्यांच्या विचारांतील आत्मप्रत्यय आणि आक्रमण-शीलता व भाषेंतील मार्मिकता आणि डौलदारपणा यांमुळें त्यांचें लेखन वाचकाच्या हृदयाला जाऊन भिडतें, त्याच्या मनांत उत्साह निमाण करतें, आणि त्याच्या अंतःकरणांत नवचैतन्य खेळवितें. त्यांनीं आपल्या वाङ्मयांत स्वाभिमान आणि सत्तासंपादन ह्यांच्याइतकाच स्वावलंबन व स्वार्थत्याग ह्यांवरहि भर दिला आहे. राजकीय स्वातंत्र्याची चळवळ म्हणजे नोकरीधंदा सांभाळून, नेटका प्रपंच करून फावल्या वेळांत करण्यासारखी गोष्ट नव्हे. देशाला ऊर्जितावस्था आणावयाची असेल, तर स्वार्थावर पाणी सोडून खिस्ती धर्मोपदेशकांप्रमाणें एकेका कार्यास आजन्म वाहून घेणारे कार्यकर्ते आपण निर्माण

केले पाहिजेत, अशी खूणगांठ त्यांनीं मनाशीं बांधली; आणि स्वतः उदाहरण घालून देऊन टिळक–आगरकरांसारखे निःस्वार्थी ध्येयवादी तरुण आपल्या भूमिकेकडे आकर्षून घेतले. "देशस्थिति सुधारण्याचा राजमान्य मार्ग म्हटला म्हणजे लोकांस ज्ञानसंपन्न करणें हा होय. ही संपन्नता सिद्ध करण्याचीं साधनें म्हणजे रसना व लेखणी हीं होत." † अशा श्रद्धेनें 'न्यू इंग्लिश स्कूल' ही शाळा व 'केसरी', 'मराठा' हीं वृत्तपत्रें त्यांनीं स्थापन केलीं. ह्या संस्थांच्या कार्यातून महाराष्ट्रांत एक ध्येयवादी वातावरण निर्माण झालें; आणि राष्ट्रवादी विचारांना अधिकाधिक धार येऊं लागली.

## सामाजिक प्रतिगामीपणा

चिपळूणकरांच्या काळीं हिंदुस्थानांत एक मोठें सामाजिक स्थित्यंतर घडून येत होतें. ब्रिटिशांची शासनपद्धति, दळणवळणाचीं साधनें आणि पाश्चात्य विचारप्रवाह यांमुळें जन्मजात प्रतिष्ठा व परंपरागत व्यवहार यांवर आधारलेली एतद्देशीय जुनी समाजव्यवस्था कोलमडून पडत होती; आणि समता व स्वातंत्र्य यांवर आधारलेली नवी समाजरचना उभारण्यास एक नामी संधि चालून आली होती. चिपळूणकरांचें लक्ष गतेतिहासावरच केंद्रित झाल्यामुळें त्यांना ह्या सामाजिक परिवर्तनाचें रहस्य उमगलें नाहीं. म्हणून पाश्चात्य विचारवंतांचें शिष्यत्व स्वीकारणाऱ्या सुधारकांना त्यांनीं कसून विरोध केला. इंग्रज राज्यकर्त्यांनीं साम्राज्यांतील जनतेची कितीहि पिळणूक केली असली, तरी समाजरचनेचीं नवीं तत्त्वें जगासमोर मांडण्यांत इंग्लंडच आघाडीवर होतें. इंग्रजांच्या साम्राज्यशाहीला विरोध करूनहि आपल्या प्रगतीच्या दृष्टीनें या तत्त्वांचा अंगीकार करणें क्रमप्राप्त होतें. पण स्वाभिमानाच्या खोट्या कल्पनेनें चिपळूणकरांनीं सरसकट सुधारणावादाचाच उपहास केला. म्हणून त्यांची विचारसरणी सामाजिक दृष्ट्या संकुचित व प्रतिगामी बनली. ऐहिक उपयुक्ततेची कसोटी पत्करून शब्दप्रामाण्य, रूढिवाद आणि वर्णवर्चस्व यांना विरोध करणाऱ्या लोकहितवादींवर त्यांनीं अधीरतेनें व अनुदारपणें प्रहार केले. परंतु सामाजिक व्यवहाराची दुसरी कोणतीच कसोटी त्यांना सांगतां

† विष्णुशास्त्री चिपळूणकर : आमच्या देशाची स्थिति. पृ. ११८.

आली नाहीं. म्हणूनच पूर्वजांची प्रशंसा आणि नवीनांचा निषेध यापुढें चिपळूणकरांच्या विवेचनाची कधींच मजल गेली नाहीं. उलट मूलगामी प्रश्नांबद्दलच्या अनास्थेमुळें त्यांच्या विचारांत अशास्त्रीयता व स्वप्नाळूपणा मात्र आला.

भारतीय संस्कृतीचा अभिमान आणि मराठी साम्राज्याची आठवण यांच्या द्वारें त्यांनीं मध्यमवर्गीय तरुणांचीं मनें चेतवलीं हें खरें; पण गत-वैभवावर फाजील भर दिल्यानें त्यांच्या वृत्तींत कोतेपणा आला, त्यांना स्वप्नरंजनाची सवय जडली, आणि त्यांच्या विचारांचें क्षेत्र फार मर्यादित राहिलें. अनादिकालापासून ज्यांना संस्कृतीचा गंधहि लागला नाहीं, राजसत्तेंत ज्यांना कधीं भागिदारी मिळाली नाहीं, त्यांच्या भावनांना संस्कृतिनिष्ठ राष्ट्रवादाचें आवाहन होणें शक्य नव्हतें. मूठभर सुशिक्षित वगळले तर देशांतील लक्षावधि लोक उदरभरणाच्या विवंचनेंतच मग्न झालेले असतात. कल्पनानिष्ठ ध्येयवादानें त्यांचे बाहू स्फुरण पावत नाहींत, ऐतिहासिक वैभवाच्या गायनानें त्यांच्या अंगावर रोमांच उठत नाहींत. अशा असंख्य लोकांच्या सुखदुःखांशीं चिपळूणकर समरस होऊं शकले नाहींत. निबंधमालेच्या काळांत साव-कारांच्या त्रासांनीं गांजलेल्या शेतकऱ्यांनीं बंडें केलीं, दुष्काळांत अन्नान्न करीत शेंकडों माणसें मृत्युमुखीं पडलीं. परंतु मराठी भाषेच्या ह्या शिवाजीला त्या घटनांची दखल घ्यावीशी वाटली नाहीं. डॉ. जॉन्सनच्या चरित्राचें परिशीलन करण्यांत आणि मोरोपंतांच्या काव्याचें रसग्रहण करण्यांतच तो रंगून गेला होता.

दलितांच्या प्रश्नाबद्दल चिपळूणकर उदासीन होते एवढेंच नव्हे, तर स्वतःच्या वर्णाचा व जातीचा त्यांना अतिशय अभिमान होता. म्हणून सत्य-शोधकांच्या हल्ल्यांपासून ब्राम्हणांचा बचाव करण्याचें कार्य त्यांनीं आपल्या शिरावर घेतलें. वास्तविक पाहतां ज्योतिराव प्रभृतींनीं ब्राम्हणांना कितीहि शिव्या दिल्या असल्या तरी त्यांचा रोख मुख्यतः पुरोहितवर्गाच्या सामाजिक मक्तेदारीवर होता. जुन्या वर्णवर्चस्वाला विरोध करून ते शूद्रांच्या मनांत नव्या आकांक्षा रुजवीत होते, नव्या जीवनाची प्रेरणा फुलवीत होते. फुले व त्यांचे सहकारी यांनीं शेतकऱ्यांचीं दुःखें चव्हाट्यावर मांडलीं, कामगारांचे श्रम हलके करण्याचे प्रयत्न केले. व्यापक सहानुभूतीच्या अभावीं

चिपळूणकरांना मात्र त्यांच्या भूमिकेंतील खरा आशय समजला नाहीं; म्हणून त्यांतील वर्णविरोध त्यांच्या अंतःकरणाला झोंबला. "चित्पावनांनीं गेल्या शतकांत सारा हिंदुस्थान दणाणून देऊन आपल्या क्षत्रकुलांतक क्षेत्रपतीप्रमाणें दिग्विजय केला; व अद्यापहि त्यांचें बुद्धिवैभव जसेंचें तसेंच जागृत आहे, या गोष्टी सर्वजनविश्रुत आहेत. त्या ज्यास सहन होत नसतील त्यांनीं पाहिजे तर दिवाभीतांप्रमाणें गिरिकंदरांत आपलें तोंड लपवून राहावें; वरील पक्ष्यांच्या पंखांनीं दिनमणि जसा झांकला जाणार नाहीं, त्याचप्रमाणें जोती प्रभृतींनीं कितीहि कोल्हेकुई केली तरी ती सर्व व्यर्थच होय." ‡ अशा मर्मभेदक भाषत त्यांनीं फुल्यांच्या सत्यशोधकी मताचा खरपूस समाचार घेतला. शिवाय ह्या वैचारिक कलहांत अर्धशिक्षित फुल्यांप्रमाणें प्रतिभासंपन्न चिपळूणकरांनींहि जातीचीच परिभाषा वापरली. म्हणून चिपळूणकरांच्या राष्ट्रवादी संप्रदायापासून महाराष्ट्रांतील बहुसंख्य ब्राह्मणेतर समाज अलिप्त राहिला.

बहुजनसमाज सोडला, तरी प्रतिष्ठेसाठीं धडपडणारा आणि राजसत्तेची आकांक्षा बाळगणारा दुसराहि एक वर्ग या काळांत क्षितिजावर डोकावत होता. तो म्हणजे व्यापारी वर्ग. व्यापाऱ्यांना जुन्या समाजव्यवस्थेबद्दल विशेष अगत्य नव्हतें. समाजजीवनांतील त्यांचें स्थान संपत्तीवर अवलंबून असल्यामुळें उद्योगधंद्यांच्या वाढीची त्यांना उत्कंठा लागली होती. चिपळूणकरांना या वर्गाच्या आकांक्षांचा व त्यांतील सुप्त सामर्थ्याचा बोध झाला नाहीं. संपत्तीवरचे त्यांचे लेख वाचले, म्हणजे आधुनिक अर्थशास्त्राबद्दलच्या त्यांच्या उदासीनतेची स्पष्ट कल्पना येते. शेतकरी व व्यापारी या दोघांकडे पाठ फिरविल्यामुळें सरंजामदार, संस्थानिक व पांढरपेशा मध्यमवर्ग यांच्या साहाय्यावरच पुढें चिपळूणकर संप्रदायाला आपल्या चळवळीची भिस्त ठेवावी लागली.

## दुष्काळ व दडपशाही

१८५७ च्या बंडाचा उपशम झाल्यानंतर जवळ जवळ वीस वर्षें हिंदुस्थानांतील राजकीय चळवळ संथपणानें चालू होती. रानडे, चिपळूणकर

‡ विष्णुशास्त्री चिपळूणकर : निबंधमाला. पृ. १०२३.

यांच्यासारखे पुढारी लेखनभाषणांच्या द्वारें विचारजागृतीचें कार्य करून लोकांना आपल्या हक्कांची कल्पना आणून देत होते. राजकीय संस्थांमधून स्थानिक प्रश्नांची चर्चा सुरू होती, परंतु इंग्लंडमधील सत्तारूढ ‘ लिबरल ’ पक्षाचें समजूतदार धोरण व १८५७ च्या बंडामुळें नोकरशाहीला कांहीं काळ बसलेली जरब यामुळें लोकांमध्यें प्रक्षोभ होण्यासारखी एकहि गोष्ट या काळांत घडली नाहीं. १८७४ मध्यें लिबरल पक्षाचा पराभव होऊन ‘ टोरी ’ पक्ष अधिकारावर आला, आणि त्यानें राजप्रतिनिधि ( व्हाइसरॉय ) म्हणून १८७६ मध्यें लिटनसाहेबांची नेमणूक केली. लिटननें १८७८ सालीं एक कायदा करून वर्तमानपत्रांच्या स्वातंत्र्यावर निर्बंध घातले. १८७९ मध्यें आयात मालावरील जकात रद्द करून हिंदुस्थानांतील उगवत्या कापड धंद्यास अडचणींत आणलें. अफगाणिस्थानच्या मोहिमेवर लाखों रुपये खर्च करून ती तूट भरून काढण्यासाठीं नवे कर बसविले. ह्या धोरणाचा परिणाम लोकांमध्यें असंतोष फैलावण्यांत झाला, तर त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

ह्या काळांत लोकांच्या दुःखाचें व असंतोषाचें मुख्य कारण म्हणजे १८७७–७८ मध्यें पडलेला भयंकर दुष्काळ हें होय. या दुष्काळांत ६ लाखांहून अधिक लोक भुकेनें तडफडून मेले असावेत असा, दुष्काळाची चौकशी करण्याकरितां नेमलेल्या मंडळाचा अंदाज आहे. दळणवळणांच्या साधनांच्या प्रसारामुळें ह्या दुष्काळांत धान्याची तूट भासली नाहीं हें खरें; पण रोजगारीच्या अभावीं धान्य विकत घेण्याची लोकांमध्यें शक्ति नव्हती. लोकांना रोजगारी पुरविण्यासाठीं दुष्काळी कामें सरकारनें हातीं घेतलीं. पण त्यांतहि अधिकाऱ्यांनीं जें कडक व सहानुभूतिशून्य धोरण आंखलें त्यामुळें लोकांचे फार हाल झाले. काम देण्याआधीं होणारी कडक तपासणी, † व मजुरीचे

† “ To check the inflow of people who were coming on any wage, the Bombay Government adopted the plan of distance test and made it into a general rule; on the Dhond and Manmad railway it was particularly enjoined that persons who lived so near the line that they could return home at night should not be employed in that part of the work, but be sent to some other parts of the

अत्यल्प दर § यांमुळें सोलापूरसारख्या ठिकाणीं चाळीस हजार कामगारांना आजच्या सारखें ट्रेड युनियनचें किंवा राजकीय पक्षांचें पाठबळ नसतां संप करण्याची पाळी आली, यावरून सरकारच्या कार्यपद्धतींतील बेपर्वाईची चांगली कल्पना येईल.

दडपशाहीच्या जोडीला हा बेफिकीरपणा दिसून येतांच लोकांचें असमाधान वाढत गेलें. राणीच्या जाहीरनाम्यावर विसंबून राहून राजकीय सुधारणेची आशा धरणाऱ्या उदारमतवाद्यांना लिटनच्या बेमुर्वत वबेजबाबदार धोरणानें पहिला धक्का बसला; व इंग्रजविरोधावर सतत भर देणाऱ्या चिपळूणकर संप्रदायी जहाल राष्ट्रवाद्यांच्या विचारांना आयतेंच इंधन मिळालें.



work at least ten miles off their home. " : *Report of the Indian Famine Commission.* 1880. p. 174.

§ मजुरीचे दर : दरदिवशीं पुरुषांस प्रत्येकीं १ आणा व अर्धा शेर धान्य. स्त्रिया व मुलें : प्रत्येकीं अर्धा शेर धान्य व अर्धा आणा. ibid. p. 168.

: ३ :

# राष्ट्रवाद आणि व्यक्तिवाद

केसरीच्या स्थापनेपासून टिळकांवरील राजद्रोहाच्या पहिल्या खटल्या-पर्यंतचा काळ हा महाराष्ट्रांतील सामाजिक विचारमंथनाचा व राजकीय चळवळीच्या पूर्वतयारीचा काळ होय. त्यापूर्वींच रानड्यांच्या नेतृत्वाखालीं सामाजिक जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत प्राथमिक लोकजागृतीचें कार्य पद्धतशीरपणें सुरू झालें होतें. कलकत्त्याची ब्रिटिश इंडिया असोसिएशन, मुंबईची बॉंबे असोसिएशन, पुण्याची सार्वजनिक सभा इत्यादि संस्थांनीं राजकीय चळवळीला संघटनेची जोड दिली होती. इंग्रजसरकारकडून सनदशीर मार्गानें अधिकाधिक सवलती मिळविणें हें ह्या सर्व संस्थांचें समान ध्येय असल्यामुळें त्या सर्वांना एकत्र आणण्याची त्यांच्यांतील कार्यकर्त्यांना गरज भासूं लागली होती. राणीच्या जाहीरनाम्यानंतर सुशिक्षितांच्या मनांत इंग्रजी राज्याबद्दल जी एक तऱ्हेची निष्ठा निर्माण झाली होती, ती लिटनच्या दडपशाहीमुळें नामशेष होण्याची वेळ येऊन ठेपली होती. पण रिपनच्या सौम्य व लोकाभिमुख धोरणामुळें राजकीय प्रगतीच्या आशा पुन्हा पालवल्या. रिपननें वर्तमानपत्रांच्या मुस्कटदाबीचा कायदा रद्द केला, स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या बाबतींत उदार धोरण आंखलें; आणि शिक्षण-

प्रसाराची चौकशी करण्यासाठीं हंटरकमिशन नेमलें. त्यामुळें सनदशीरपणें अधिक हक्कांची मागणी करण्यास सुशिक्षित वर्गास हुरूप आला. रिपनच्या कारकिर्दींत इल्बर्ट बिलाला विरोध करणाऱ्या ॲंग्लोइंडियन व्यापाऱ्यांनीं व मळेवाल्यांनीं जीं निदर्शनें केलीं, त्यामधून संघटित प्रतिकाराचें सामर्थ्य येथील लोकांच्या दृष्टीस पडलें; आणि सरकारवर प्रभाव पाडावयाचा असल्यास जागृत व संघटित लोकमताची शक्ति आपण आपल्या पाठीशीं उभी केली पाहिजे अशी त्यांची खात्री होऊन चुकली. बंगालमधील सुरेंद्रनाथ बानर्जीसारख्या कार्यकर्त्यांनीं या कामांत पुढाकार घेतला. १८७७ व ७८ मध्यें सुरेंद्रनाथांनीं सिव्हिल सर्विस परीक्षेच्या प्रश्नावर लोकमत संघटित करण्यासाठीं सर्व हिंदुस्थानभर दौरा काढला होता. त्यांच्याच नेतृत्वाखालीं इंडियन असोसिएशन ह्या संस्थेतर्फे १८८३ व १८८५ सालीं कलकत्त्यास राष्ट्रीय परिषदा भरविण्यांत आल्या. ह्या परिषदांना इतर प्रांतांतून जरी फारच थोडे प्रतिनिधि हजर राहिले असले, तरी सर्व प्रांतांतील पुढारी राजकीय प्रश्नांची चर्चा करण्यासाठीं एकत्र आल्याचें हें पहिलेंच उदाहरण होय. त्याचप्रमाणें आपल्या ठराविक परिसरांत वावरणाऱ्या जबाबदार इंग्रज अधिकाऱ्यांनाहि खरें लोकमत जाणून घेण्याची उत्सुकता होती. म्हणून त्यावेळचे व्हाइसराय लॉर्ड डफरिन यांच्या प्रोत्साहनानें व हिंदुस्थानांतील मान्यवर पुढाऱ्यांच्या साहाय्यानें सेवानिवृत्त सरकारी अधिकारी ए. ओ. ह्यूम यांनीं १८८५ सालीं 'राष्ट्रसभेची' स्थापना केली.

राष्ट्रसभेची स्थापना होण्यापूर्वीच महाराष्ट्रांत जहाल राष्ट्रवाद्यांचा नवा पंथ उदयास आला होता. चिपळूणकरांनीं स्वतःच्या उदाहरणानें सार्वजनिक कार्यकर्त्यांना लढाऊ बाण्याची व स्वार्थत्यागाची शिकवण दिली होती. केसरी व मराठा ह्या वृत्तपत्रांनीं सरकारी अवकृपेची तमा न बाळगतां लोकमत जागृत करण्याचें कंकण बांधलें; आणि प्रत्येक प्रश्नावर लोकांची बाजू घेऊन बेजबाबदार व अरेरावी अधिकाऱ्यांवर प्रखर टीका करण्याचा पायंडा घातला. ह्या निर्भीड टीकेमुळें कोल्हापूरप्रकरणीं टिळक–आगरकरांना जो तुरुंगवास पत्करावा लागला, त्यामध्यें त्यांच्या ध्येयनिष्ठेची व मनोधैर्याची कसोटी लागली; व त्यांतून तावूनसुलाखून निघाल्यामुळें त्यांचा आत्मविश्वास आणि जनतेवरील त्यांचा प्रभाव द्विगुणित झाला.

रानड्यांच्या नेमस्तपणामुळें त्यांच्या विचारसरणींत राष्ट्रवाद आणि व्यक्तिवाद या दोन प्रवृत्तींचा समन्वय होऊं शकला. पण ह्या प्रवृत्तींचा जेव्हां विकास होऊं लागला, क्रियाशील तत्त्वनिष्ठेची जेव्हां त्यांना जोड मिळाली, आणि त्यांच्या प्रकाशांत तात्कालिक प्रश्नांची चर्चा होऊं लागली तेव्हां ह्या निरनिराळ्या प्रवृत्तींतील अंतर्विरोध हळुहळू स्पष्ट होत गेला. आगरकरांच्या प्रेरणेनें सुधारणावाद अधिकाधिक सुसंगत व आक्रमक बनूं लागला; व पुढेपुढें परंपरानिष्ठ राष्ट्रवादाशीं जुळतें घेणें त्याला कठिण होऊन बसलें. १८८८ सालीं केसरी मराठ्यांतून बाहेर पडून आगरकरांनीं सुधारक पत्र काढलें; आणि जुन्या सुधारकांची समन्वयाची भूमिका सोडून बुद्धि-वादाचा व व्यक्तिवादाचा मोठ्या आवेशानें आणि प्रखरतेनें पुरस्कार केला. तेव्हां परंपरांचें पावित्र्यरक्षण करण्याची जबाबदारी केसरीकारांवर येऊन पडली. सुधारकाच्या जन्मापासून आगरकरांच्या मृत्यूपर्यंत संमतिवय, चहा-ग्रामण्यप्रकरण इत्यादि प्रश्नांच्या निमित्तानें महाराष्ट्रांत ‘आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय’ हा जो वाद रंगला त्यामधून येथील राजकीय चळवळीची दिशा आणि व्याप्ति निश्चित झाली.

## आर्थिक परिस्थिति

पूर्वीच्या काळाशीं तुलना करतां १८८० पासून १८९५ पर्यंतचीं पंधरा वर्षें हिंदुस्थानांतील शेतकरी व कारखानदार यांना सुखाचीं व सुबत्तेचीं गेलीं. ह्या पंधरा वर्षांत देशांतील कोणत्याच भागांत म्हणण्यासारखा दुष्काळ पडला नाहीं. परदेशामध्यें हिंदी कच्च्या मालाची मागणी वाढत होती. तांदूळ, ताग इत्यादि निर्यात मालाच्या किंमती पूर्वीपेक्षां जास्त झाल्या होत्या. म्हणून भूमिहीन बेकार कामगार व अत्यंत गरीब शेतकरी हे दोन वर्ग सोडून दिले तर सर्वसाधारण शेतकऱ्याला तरी या दिवसांत पोटापाण्याची विवंचना पडली नाहीं.

कापड व ताग या दोन नव्या धंद्यांची प्रगतिहि या कालखंडांत बरीच समाधानकारक होती. कापडगिरण्यांची संख्या १८७९–८० मध्यें फक्त ५८ होती. ती १८९४–९५ मध्यें १४४ पर्यंत वाढली; आणि त्यांत काम करणाऱ्या

मजुरांची संख्या तर ३९५३७ वरून १,३९,५७८ वर गेली.† त्यामुळें हिंदुस्थानांतील कारखानदार व अर्थशास्त्रज्ञ यांना देशाच्या आर्थिक अभ्युदयाची आशा वाटूं लागली. §

हिंदुस्थानच्या ह्या आर्थिक प्रगतीच्या लँकेशायरच्या कापडकारखानदारांना हेवा वाटूं लागला तर आश्चर्य नाहीं. हिंदी कामगारांबद्दलची त्यांची सहानुभूति त्यामुळें एकदम जागृत झाली; आणि कारखानदारांच्या पिळणुकीपासून त्यांचें संरक्षण करण्यासाठीं त्यांनीं हिंदुस्थानसरकारमागें सारखें टुमणें लावलें. त्यांच्याच दडपणामुळें १८८१ सालीं पहिला कामगारकायदा करण्यांत आला. त्यानंतर १८८४ व १८९० मध्यें गिरणीकामगारांच्या परिस्थितीची चौकशी करण्यासाठीं सरकारनें जीं कमिशनें नेमलीं, त्यांच्या अहवालामधून कामगारांचे हाल प्रथम उजेडांत आले. गिरण्यांतील कामगारांच्या कामाचे तास निश्चित झालेले नव्हते, श्रमाच्या मानानें मजुरी अत्यल्प होती; आणि आरोग्यरक्षणासाठीं आणि अपघातापासून संरक्षण मिळावें म्हणून कोणत्याहि सोयी केलेल्या नव्हत्या. त्यामुळें त्यांची परिस्थिति अतिशय अनुकंपनीय होती. ‘दीनबंधू’चे संपादक नारायण मेघाजी लोखंडे ह्यांच्या प्रयत्नानें १८८४ सालीं मुंबईत २०००० कामगारांची प्रचंड सभा भरून कामगारांच्या मागण्यांचा एक अर्ज हिंदुस्थानसरकारकडे पाठविण्यांत आला. कामगारांच्या गाऱ्हाण्यांची दाद मागण्यासाठीं लोखंड्यांच्या प्रयत्नानें ‘मिल हॅन्डस् असोसिएशन’ ह्या हिंदुस्थानांतील पहिल्या कामगारसंस्थेची स्थापना झाली. अशा प्रकारें कारखानदार व कामगार हे दोन नवीन वर्ग क्षितिजावर येत होते. पण

---

† D. R. Gadgil : *The Industrial Evolution of India.* p. 76.

§ "I have placed before you what appear to me to be good grounds for the hope I entertain, that India has now fairly entered upon the path, which if pursued in the same spirit which has animated its capitalists hitherto, cannot fail to work out its industrial salvation—M. G. Ranade : *Essays on Indian Economics*. p. 111.

राजकीय व सामाजिक जीवनांत त्यांच्या हितसंबंधांचा ठसा उमटण्याचा काळ अजून खूप दूर होता.

## राष्ट्रसभा व प्रांतिक सभा

शांततेच्या व सुबत्तेच्या काळांत राष्ट्रसभाहि संथपणें पहिलीं पाउलें टाकीत होती. " निरनिराळ्या प्रांतांमध्यें देशहितासाठीं मनःपूर्वक झटणारे जे लोक आहेत त्यांना एकत्र आणून परस्परांचा परिचय व मैत्री घडवून आणण्यास त्यांना मदत करणें, ह्या परिचयामधून वर्ण, जाति, प्रांत आणि विचारसरणी यांच्या योगें अस्तित्वांत आलेले भेद नाहींसे करून एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेची जोपासना करणें आणि देशासमोर असलेल्या निकडीच्या सामाजिक प्रश्नांची चर्चा करून त्यांवर सुशिक्षित वर्गाचीं मतें प्रगट करणें " † हे उद्देश तिनें आपल्या समोर ठेवले होते. उमेशचंद्र बानर्जी, नरेंद्रनाथ सेन, सुरेंद्रनाथ बानर्जी, फेरोझशहा मेहता, बद्रुद्दिन तय्यबजी, काशिनाथ त्र्यंबक तेलंग, सुब्रह्मण्य अय्यर हे उदारमतवादी नेमस्त पुढारी तिच्यामध्यें प्रमुख होते. इंग्लंडच्या स्वातंत्र्य लढ्याचा उज्ज्वल आदर्श त्यांच्यापुढें होता. " प्रत्येक राष्ट्रांतील लोकांना स्वराज्याचे हक्क असावेत ही ईश्वराची इच्छा आहे, निसर्गाचाच तो नियम आहे " ¶ हा सिद्धान्त इंग्रजी साहित्याच्या व इतिहासाच्या अध्ययनानें त्यांच्या मनांत ठसला होता. म्हणून इंग्रजी राज्यघटनेच्या मूलतत्त्वांचा हिंदुस्थानच्या शासनपद्धतींतहि अंतर्भाव करण्यांत यावा असा त्यांनीं आग्रह धरला. लोकांच्या प्रतिनिधींनाच फक्त त्यांच्यावर कर बसविण्याचा अधिकार आहे हें इंग्रजांच्या राजकीय बायबलांतील पहिलें सूत्र आहे. हिंदुस्थानांतील लोकहि इंग्रज सरकारचेच प्रजाजन असल्यामुळें त्यांनाहि हा हक्क मिळणें अवश्य आहे. दुष्काळ, दारिद्र्य अशीं संकटें जर कायमचीं नाहींशीं व्हावयाचीं असतील तर प्रजेच्या मताला सरकारांत

---

† Annie Beasant : *How India Wrought for Freedom.* p. 7.

¶ " Self-Government is the ordering of nature, the will of Divine Providence. " (Surendranath Bannerjee.) ibid p. 26.

मान मिळाला पाहिजे, कायदे मंडळांत लोकांचे प्रतिनिधि असले पाहिजेत, असें राष्ट्रसभेचें म्हणणें होतें. म्हणून “ हिंदुस्थानांत प्रातिनिधिक संस्थांचीं स्थापना करणें ” हें तिनें आपलें ब्रीद ठरविलें. § सरकारदरबारीं त्याला मान्यता मिळावी म्हणून प्रत्येक वर्षी स्वतंत्र ठरावाच्या रूपानें तिनें त्याची पुनर्घोषणा केली; आणि कांहीं प्रमाणांत ते प्रत्यक्षांत उतरविण्यासाठीं गव्हर्नरांच्या कायदेकौन्सिलांत लोकनियुक्त सभासद असावेत, सरकारचें वार्षिक जमाखर्चाचें अंदाजपत्रक कौन्सिलपुढें ठेवून त्यावर सभासदांना चर्चा करूं द्यावी, राज्यकारभाराबद्दल वाटेल तो प्रश्न विचारण्यास सभासदांना परवानगी देण्यांत यावी अशी मागणी केली.

राष्ट्रसभा ही सुरवातीपासून केवळ राजकीय संस्था होती. दादाभाई नौरोजी किंवा सुरेंद्रनाथ यासारख्या तिच्या प्रवर्तकांना समाजसुधारणेचें वावडें होतें असें नव्हे. पण सुधारणेच्या वादापासून तिला अलिप्त ठेवण्याची त्यांनीं काळजी घेतली. सामाजिक क्षेत्रांत प्रत्येक प्रांताचे, धर्मांचे व जातींचे प्रश्न निराळे होते. ते त्या त्या प्रांतांनीं किंवा जातींनीं सोडवावेत आणि सर्वांनाच बोचणाऱ्या देशव्यापी राजकीय प्रश्नांचीच फक्त राष्ट्रसभेच्या व्यासपीठावरून चर्चा व्हावी असा त्यांनीं परिपाठ ठेवला. सनातनी व सुधारक, सुशिक्षित व अशिक्षित, श्रीमंत व गरीब अशा सर्वांनाच राष्ट्रसभेनें आवाहन केलें; आणि निरनिराळ्या प्रश्नांवरील पुढारलेल्या वर्गांचीं मतें नम्रपणें पण स्पष्ट शब्दांत सरकारपुढें मांडलीं.

इंग्रज लोक न्यायनिष्ठ व स्वातंत्र्यप्रिय होते हें खरें. परंतु राज्य चालविणें हें काम फार बिकट आहे. प्रजेच्या चालीरीतींची आणि मनःप्रवृत्तींची अजिबात कल्पना नसणाऱ्या परकीय राज्यकर्त्यांच्या बाबतींत तर तें जास्तच जोखमीचें व गुंतागुंतीचें होतें. याकरितां लोकांच्या

---

§ “ We unfurl the banner of the Congress, and upon it are written in characters of glittering gold which none may efface, the great words of this resolution–Representative Institutions for India.” (Surendranath Bannerjee.) ibid. p. 39.

भावनांची, गरजांची व आकांक्षांची ओळख करून देऊन सरकारला राज्यकारभारांत साह्य करण्याची राष्ट्रसभेची भूमिका होती. म्हणून सरकारच्या अडचणी समजून घेऊन त्याच्यावर सहानुभूतीपूर्वक टीका करण्याचें आणि आपल्या मागण्या विनयपूर्वक त्याच्यापुढें सादर करण्याचें धोरण तिनें स्वीकारलें. ¶ राज्ययंत्रणेंत हिंदी लोकांचा भाग नसणें हें तिच्या मतें हिंदुस्थानच्या शासनपद्धतींतील सर्वांत मोठें वैगुण्य होतें. जनतेच्या अडीअडचणी व सुखदुःखें यांच्याविषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या हिंदुस्थानांतील सुशिक्षित वर्गाचा राज्यकारभारांत शिरकाव झाल्याखेरीज जनतेच्या गाऱ्हाण्यांची दाद लागणें शक्य नाहीं. तेव्हां मेहेरबानी म्हणून नव्हे तर न्याय्य हक्क म्हणून, १८३३ व १८५८ मध्यें हिंदी लोकांना देण्यांत आलेल्या वचनांची पूर्ति करण्यासाठीं म्हणून, इंग्रज व हिंदी प्रजाजनांमधील विषमता नाहींशी करण्यांत यावी, आणि सनदी नोकऱ्यांत हिंदी लोकांना अधिकाधिक प्रवेश देण्यांत यावा अशी तिची मागणी होती.

अशा प्रकारें १८८५ पासून दरवर्षी मुंबई, मद्रास, कलकत्ता, अलाहाबाद, लाहोर, नागपूर इत्यादि हिंदुस्थानांतील निरनिराळ्या शहरीं राष्ट्रसभेची अधिवेशनें भरविण्यांत आलीं. हिंदु, मुसलमान, पारशी, खिस्ती अशा निरनिराळ्या जमातींचे व बंगाल, मद्रास, गुजरात, महाराष्ट्र अशा वेगवेगळ्या प्रांतांचे पुढारी एकत्र जमून सिव्हिल सर्विसची परीक्षा, आयात मालावरील जकात, राज्यकारभारावरील खर्च यांसारख्या राजकीय प्रश्नांची चर्चा करूं लागले. राजकीय हक्कांची त्यांनीं एकमुखी मागणी केली. आपआपसांतील मतभेद सलोख्यानें मिटवून हिंदुस्थानांतील लोक प्रातिनिधीक संस्थांना अपात्र आहेत हा आरोप त्यांनीं खोडून काढला; आणि एकप्रकारें भावी हिंदी पार्लमेंटची मुहूर्तमेढ रोवली. १८९२ च्या कायद्यामध्यें राष्ट्रसभेच्या कांहीं मागण्यांना मान्यता मिळाल्यामुळें सर्वत्र आशादायी वातावरण पसरलें. राष्ट्रसभेचे प्रतिनिधि निवडण्यासाठीं ठिकठिकाणीं ज्या सभा होत, त्यामधून निरनिराळ्या प्रांतांत लोकजागृतीला बरीच मदत झाली; आणि

¶ "We offer help but no menace to the Government." ibid. p. 230

देशभर चाललेल्या राजकीय प्रश्नांच्या चर्चेमधून सुशिक्षितांच्या मनांत राष्ट्रीयत्वाची भावना मूळ धरूं लागली.

सुरवातीच्या काळांत सरकारी अधिकाऱ्यांनीं राष्ट्रसभेच्या चालकांना प्रोत्साहन दिलें. पण थोड्या काळांत तिनें संपादन केलेलें यश पाहून त्यांचीं मनें साशंक बनलीं. तिच्या कार्याला पायबंद घालण्यासाठीं राजद्रोहाचें बुजगावणें पुढें करण्यांत आलें. राष्ट्रसभा ही जनतेची प्रतिनिधि नव्हे; सरकारी नोकरी न मिळाल्यानें असंतुष्ट झालेल्या अल्पसंख्य सुशिक्षित वर्गाचीच फक्त ती पाठीराखी आहे अशी टीका सुरू झाली. इंग्रज अधिकाऱ्यांची री ओढून सर सय्यद अहमद यांनीं मुसलमानांना कॉंग्रेसपासून दूर राहण्याचा उपदेश केला. इंग्रजांच्या भेदनीतीला यश येऊन १८९३ सालीं हिंदु-मुसलमान दंग्यांनाहि सुरवात झाली. पण ह्या विरोधाला हिंदुस्थानांतील राजकीय पुढाऱ्यांनीं मुळींच भीक घातली नाहीं; आणि जनतेचीं गाऱ्हाणीं सरकारला कळविण्याचें आपलें कार्य तसेंच धिम्मेपणानें व निर्धारानें चालू ठेविलें.

राष्ट्रीय सभेसारख्या मोठ्या परिषदेंत प्रत्येक प्रांतांतील खास प्रश्नांचा व अडचणींचा तपशीलवार विचार होणें शक्य नव्हतें. म्हणून त्या त्या प्रांतानें आपापल्या विशिष्ट प्रश्नांवर प्रांतिक सभेच्या द्वारें लोकमत जागृत ठेवण्याची आवश्यकता शिल्लक होती. आतांपर्यंत राजकीय चळवळ सार्वजनिक सभेसारख्या 'स्थावर' संस्थांकडून होत असे. परंतु सर्व इलाखाभर राजकीय प्रश्नांची चर्चा सुरू झाली तरच लोकांच्या म्हणण्यास जोर मिळून त्याची कांहींतरी दाद घेतली पाहिजे असें सरकारास वाटेल अशा विचारसरणीनें प्रांतिक सभेचा उपक्रम करण्यांत आला. मुंबई इलाख्यांतील पहिली प्रांतिक सभा १८८८ सालीं पुणें येथें भरली. त्यानंतरहि पुढचीं चार वर्षें तिच्या बैठकी पुण्यासच भरत असल्यानें महाराष्ट्रांतील प्रतिनिधींचाच तिच्यांत भरणा असे. ही स्थिति सुधारून प्रत्येक भागांतील लोकांस प्रांतिक सभेचें महत्त्व कळून यावें; व इलाख्यांतील निरनिराळ्या भागांतून सदर सभेस चांगली मदत व्हावी या हेतूनें अहमदाबाद, मुंबई, बेळगांव, कराची अशा निरनिराळ्या ठिकाणीं तिचीं अधिवेशनें भरविण्यांत आलीं.

ह्या प्रांतिक सभांमधून महाराष्ट्रांतील जहाल पक्षाचे पुढारी प्रथम लोकांपुढें आले. १८९० पासून टिळक प्रांतिक सभेच्या चिटणीसांपैकीं एक होते. राष्ट्रसभेच्या कामाचा गांवोगांव प्रसार करण्याची त्यांना तळमळ होती. " वर्षांतून एकदां जमणाऱ्या हजार पांचशें लोकांच्या राष्ट्रसभेनें एकादें मागणें केलें, म्हणजे सरकार लागलेंच कबूल होईल असें नाहीं. तर प्रत्येक प्रांतांतून, जिल्ह्यांतून, शहरांतून इतकेंच काय पण प्रत्येक खेड्यांतूनहि तशा प्रकारचे अर्ज गेले पाहिजेत, तरच त्या मागण्याला कांहीं वजन येणार आहे.......राष्ट्रीयसभेंत ऐकमत्य होण्यापूर्वी प्रत्येक प्रांतांत, त्यापूर्वी प्रत्येक जिल्ह्यांत व त्यापूर्वी प्रत्येक खेड्यांत तें झालें पाहिजे. ह्या नैसर्गिक क्रमानें ज्या दिवशीं आमचे प्रयत्न चालू लागतील, तेव्हांच आम्ही राजकीय हक्क भोगण्यास खरोखर पात्र होऊं व सरकारहि आमचें म्हणणें ऐकेल " § असें प्रतिपादन करून त्यांनीं लोकशाही कार्यपद्धतीवरील आपला विश्वास व्यक्त केला; आणि जनतेचें पाठबळ मिळविण्यासाठीं तिच्या जिव्हाळ्याच्या प्रश्नांची आपल्या वर्तमानपत्रांतून चर्चा सुरू केली.

## नव्या कसोट्यांचा आग्रह

राजकीय चळवळ सुरू होण्यापूर्वीच महाराष्ट्रांत स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, प्रौढविवाह इत्यादि सामाजिक सुधारणांचा खल होऊं लागला होता. परंतु लिटन आणि रिपन यांच्या कारकीर्दींत राजकीय क्षेत्रांत एका मागून एक झालेल्या खळबळजनक घटनांमुळें समाजसुधारणेचा प्रश्न कांहीं काळ बाजूस पडला. राष्ट्रसभेच्या स्थापनेनंतर राजकीय चळवळीचा प्रवाह पुन्हां संथपणें वाहूं लागला. सुधारणावादांतील अनेकविध प्रवृत्तींची मीमांसा करण्यास लोकांना उसंत मिळाली. रानड्यांसारख्या उदारमतवाद्यांनीं बुद्धिनिष्ठा आणि व्यक्तिस्वातंत्र्य हीं पाश्चात्य विचारप्रणालींतील मूलतत्त्वें राजकीय क्षेत्राप्रमाणें सामाजिक क्षेत्रांतहि लागू करण्याची मनीषा धरली; आणि सर्व प्रांतांतील सुधारणेच्या प्रयत्नांना संघटित स्वरूप देण्यासाठीं १८८७ सालीं सामाजिक परिषदेची स्थापना केली. तेव्हां समाजसुधारणेचीं मूलतत्त्वें कोणतीं ? व्यक्ति

---

§ केसरींतील लेख, भाग १ ला. पृ. १११

आणि समाज यांचे परस्परसंबंध कोणत्या प्रकारचे असावेत ? विलायती आचारविचारांचें अनुकरण करणें आपणांस कितपत इष्ट व शक्य आहे ? यांबद्दल मध्यमवर्गीय पुढाऱ्यांमध्यें चर्चा सुरू झाली. न्या. रानडे. न्या. तेलंग, बेहेरामजी मलबारी, डॉ. भांडारकर, आगरकर, टिळक, जिनसीवाले यांनीं या चर्चेंत प्रामुख्यानें भाग घेतला; आणि वृत्तपत्रें व व्याख्यानें, सभा आणि लेख यांच्यामधून समाजसुधारणेच्या अंगोपांगांचा ऊहापोह केला. या विचारमंथनांतूनच महाराष्ट्रांतील समाजजीवनाला एक विशिष्ट वळण लागलें.

१८८५ ते १८९५ या दशकांत महाराष्ट्रांत आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय या प्रश्नावर फार मोठें रण माजलें. त्यांत सुधारणावादाचा पक्ष आगरकरांनीं निर्भयतेनें व निःसंदिग्धपणें मांडला. त्यांच्या लिखाणांत बुद्धिवादाचें व व्यक्तिवादाचें आधुनिक तत्त्वज्ञान शुद्ध, सुसंबद्ध व संपूर्ण स्वरूपांत आपणांस प्रथम पाहावयास सांपडतें. त्यांच्यापूर्वी न्या. रानड्यांनीं व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिनिष्ठा, समता आणि उदारता हीं मूल्यें येथील लोक-व्यवहारांत रूढ करण्याची खटपट केली होती. पण अध्यात्मवादी संस्कार आणि तडजोडीची वृत्ति यामुळें जुन्याचा मोह त्यांना सोडवेना. म्हणून नव्या सुधारणांचा अंगीकार करतांनाहि त्यांनीं पुष्कळदां शब्दप्रामाण्याचे जुने निकष वापरले. मिळेल तेव्हां सुधारणेला स्मृतिवचनांचा आधार घेऊन त्यांनीं शास्त्रांची प्रतिष्ठा कायम ठेवली. नव्या श्रद्धांचें मोजमाप करावयास जुनीं वजनें वापरल्यावर सनातन्यांचें पारडें जड ठरलें तर त्यांत आश्चर्य काय ? परिस्थिति सारखी पालटत होती. नवे नवे प्रश्न उपस्थित होत होते. सुधारणेचें क्षेत्र साहजिकच विस्तृत होऊं लागलें. तेव्हां शास्त्रांचा काथ्याकूट करून प्रत्येक सुधारणेला त्यांचा पाठिंबा मिळविण्याचा प्रयत्न इतःपर सफल होण्याचा संभव नव्हता. पूर्व संस्कार आणि प्रत्यक्ष परिस्थिति, जुन्या श्रद्धा आणि नव्या प्रवृत्ति यांच्यांतील विरोध सोडवितां न आल्यानें रानडेपक्ष प्रत्यक्ष व्यवहारांत वारंवार कच खात होता.† आणीबाणीच्या वेळीं शास्त्रांच्या

† "Those who live in the past secure popularity. Those who bury their past obtain ease. Men like Telang and others obtain neither ease nor popularity by

वेदीवर अखेर विचारस्वातंत्र्याचा बळी देण्यावांचून त्याला गत्यंतर नव्हतें. आगरकरांनीं जुन्याचा आधार सोडून देऊन सुधारणावादांतील ही विसंगति, ही विकलता काढून टाकली. " असल्या वेडेपणाच्या समजुतींचा मोक्ष करण्यास पूर्वेतिहास आणि पूर्वाचार हे पुन्हा पुन्हा पुढें आणून त्यांचें फिरून अवलंबन करा असें सांगत न बसतां, अलीकडील न्यायाच्या भात्यांतून तीव्र बाण काढून त्यांचा त्यांवर संपात केला पाहिजे. कोणतेंहि आचार घालण्यास पूर्वींच्या ऋषींस जितका अधिकार होता तितका आम्हांसहि आहे... सबब त्यांनीं घालून दिलेल्या नियमांपैकीं जेवढे हितकारक असतील तेवढ्यांचेंच आम्ही पालन करणार, व जे अपायकारक असतील ते टाकून देऊन त्यांचे जागीं आम्हांस निर्दोष वाटतील असे नवीन घालणार अशा धर्तीवर हा वाद नेला पाहिजे, व अशा धर्तीवर तो नेल्यासच त्यापासून फायदा होणार आहे. एका ऋषीविरुद्ध दुसरा ऋषि हुडकीत बसण्यांत व साऱ्यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न करण्यांत, कांहीं अर्थ नाहीं. तसलें काम वे. झळकीकरांसारख्या शास्त्र्यांनीं जुन्या पद्धतीच्या लोकांसाठीं खुशाल करीत बसावें " § असें त्यांचें ठाम मत होतें. म्हणूनच शास्त्रांच्या किंवा रूढीच्या पाठिंब्याची पर्वा न करतां प्रत्येक आचारविचाराला स्वतःच्या विचारशक्तीची कसोटी लावून पाहाण्याचा त्यांनीं आग्रह धरला.

आगरकरांनीं शब्दप्रामाण्याला आणि रूढिवादाला विरोध केला याचा अर्थ जुना इतिहास किंवा प्राचीन संस्कृति याबद्दल त्यांना अभिमान नव्हता असा नव्हे. पण परंपरेकडे पाहाण्याची त्यांची दृष्टि ऐतिहासिक होती. रूढ संस्था आणि आचार जुन्या काळांत कदाचित आवश्यक व समाजहितास पोषकहि असतील पण काळ बदलला म्हणजे त्यांचें स्वरूपहि पालटलें पाहिजे असें त्यांचें स्पष्ट म्हणणें होतें. " विवेक पूर्ण जागृत झाला नव्हता

---

the very fact that they neither hold by the past nor forget it altogether."—( रानडे )

कर्नाटकी : न्या. काशिनाथ त्र्यंबक तेलंग यांचें चरित्र. पृ. २९३

§ आगरकर : निबंधसंग्रह, भाग १ ला (सं. मा. दा. अळतेकर) पृ. ९५

तोंपर्यंत विश्वासानें किंवा श्रद्धेनें प्रत्येक गोष्टींत आपला अंमल चालविला यांत कांहीं वावगें झालें नाहीं. जसा लोकांत तसा मनास कोणीतरी शास्ता पाहिजे; व ज्याप्रमाणें मुळींच राजा नसण्यापेक्षां कसला तरी राजा असणें बरें, त्याप्रमाणें वर्तनाचें नियमन करणारें असें कोणतेंच तत्त्व नसल्यापेक्षां विश्वासासारखें एकादें स्खलनशील तत्त्व असणें देखील इष्ट आहे." * मात्र नवीन तत्त्व आलें कीं जुनें 'प्रमादी' तत्त्व सोडून देऊन नवीन श्रेष्ठ तत्त्वाचा आपण स्वीकार केला पाहिजे. अशा वेळीं जुन्याचा नुसता जप करीत बसणें योग्य नाहीं. जुन्या पंडितांच्या नांवाचे नुसते पोवाडे गाण्यापेक्षां त्यांच्या विचारांतील दोषस्थलें काढून टाकून आणि ग्राह्यांश निवडून त्यांत नवीन भर घालण्यास आपण पुढें सरसावलें पाहिजे असें त्यांना वाटे. स्वतःची विचारशक्ति न वापरतां पूर्वजांच्या शहाणपणाचें कौतुक करीत बसणाऱ्या लोकांना त्यांनीं एकाद्या पराक्रमी पुरुषाच्या बहुभाप विधवेची उपमा दिली आहे. ‡ हा पोकळ आणि आत्मघातकी अभिमान नाहींसा करून लोकांचा विवेक जागृत करणें आणि त्यांच्यामध्यें स्वतंत्रपणें विचार करण्याची शक्ति निर्माण करणें यांसाठींच त्यांनीं आपलें कर्तृत्व खर्चीं घातलें.

शब्दप्रामाण्यावर आगरकरांनीं याप्रमाणें झोड उठविल्यामुळें जुना शास्त्रीवर्ग आपोआपच निःशस्त्र झाला. म्हणूनच त्यांच्याशीं दोन हात करण्याचा पत्कर वेदशास्त्रसंपन्न शास्त्र्यांऐवजीं टिळक-जिनसीवाले यांच्या सारख्या आंग्लविद्याविभूषितांना घ्यावा लागला. १८७० मधील सनातनी व सुधारक यांचा वाद आणि १८८८ नंतरचा सुधारक-केसरी यांमधील संग्राम यांत हीच मोठी तफावत आहे. १८७० पूर्वीं सुशिक्षित सुधारकहि सनातनी संस्कारापासून अजिबात मुक्त झालेले नव्हते. वीस वर्षांनीं ही परिस्थिति बदलली. आतां सुधारकांनीं आत्मसमर्थनाचा पवित्रा बदलून आक्रमक वृत्ति स्वीकारली; आणि जुन्या रूढींची श्रेष्ठता युक्तिवादानें सिद्ध करण्याची जबाबदारी सनातनी पंडितांवर येऊन पडली, याचें श्रेय आगरकरांनाच द्यावें

* कित्ता. पृ. ६३
‡ कित्ता. पृ. १९५

लागेल. १८९० सालीं झालेल्या संमतिवयाच्या वादांतहि शास्त्राधार शोधण्याचा हव्यास दिसून येतो हें खरें. पण तेव्हां त्यांत विशेष स्वारस्य उरलें नव्हतें. बुद्धिवादी पद्धतीनें सामाजिक समस्यांना मिळणारीं उत्तरें सनातन्यांनीं जरी कधींच मान्य केलीं नाहींत, तरी "आजकाल कोणतीहि सुधारणा करणें असल्यास ती सयुक्तिक, आवश्यक आणि सुकर आहे कीं नाहीं एवढाच खरोखर विचाराचा भाग असतो. असा विचार करण्यास आमच्याकडून कोणतीहि हरकत नाहीं."† असें म्हणून अनुभवप्रामाण्याची व बुद्धिवादाची कसोटी त्यांनीं तत्त्वतः मान्य केली. शब्दप्रामाण्य कीं बुद्धिप्रामाण्य या पातळीवरून हा वाद सामाजिक परिस्थितीमुळें बुद्धिवादाला पडलेल्या मर्यादा अशा भूमिकेवर टिळकांना न्यावा लागला हा एकप्रकारें आगरकरांच्या मतप्रणालीचा विजयच होय.

## अध्यात्मवाद आणि भौतिकवाद

तत्त्वदृष्ट्या बुद्धिवादाचा निकष मान्य करूनहि त्याच्यावर जुन्या रूढींची उपयुक्तता तपासण्याची तत्कालीन उच्चवर्णीयांची तयारी नव्हती. आगरकरांनीं मात्र शुद्ध बुद्धिवादाच्या भूमिकेवरून त्यावेळच्या समाजजीवनाचें विश्लेषण केलें; आणि प्रत्येक रूढि व आचार यांची चिकित्सा करून त्यांतील अन्याय व विसंगति त्यांनीं लोकांच्या नजरेस आणली. त्याचबरोबर व्यक्तिस्वातंत्र्य व ऐहिक सुखसंवर्धन यांवर आधारलेल्या नव्या सामाजिक आचारांचाहि त्यांनीं उदोउदो केला. युरोपीय राष्ट्रांचा उत्कर्ष पाहून आणि मिल व स्पेन्सर यांचें तत्त्वज्ञान वाचून व्यक्तिप्रेरणेला सर्व क्षेत्रांत अधिकाधिक वाव देण्यांतच समाजाचें हित आहे अशी रानड्यांप्रमाणें आगरकरांचीहि खात्री पटली होती. पण मनावरील परंपरेच्या दडपणामुळें रानड्यांना, व्यक्तिप्रेरणा संकुचित व स्वार्थलोलुप तर होणार नाहीं ना ? व्यक्तिस्वार्थ व सामाजिक उत्कर्ष यांत विरोध तर उत्पन्न होणार नाहीं ना अशी अंतर्यामीं भीति वाटत होती. तेव्हां सामाजिक स्थैर्याला बाध येऊं नये म्हणून ईश्वराबद्दलची आस्तिक्यबुद्धि, धर्मावरील श्रद्धा, आत्म्याच्या अमरत्वाविषयीं विश्वास

---

† टिळक : केसरींतील लेख, खंड ४ था. पृ. ६६

इत्यादि आध्यात्मिक मूल्यांवरहि त्यांनीं तितकाच भर दिला. ¶ भक्तिसंप्रदायांतून लाभणारी समबुद्धि, उपासनेमधून मिळणारी निष्ठा, आचारशीलतेमुळें लागणारी शिस्त हीं नाहींशीं होऊं नयेत अशी त्यांना उत्कंठा होती. म्हणून नीतिनियमांना त्यांनीं एकेश्वरवादाचा आधार दिला. त्यामुळें प्रारब्धवादाचें व परंपरेचें प्रस्थ कायमच राहिलें. तेव्हां शब्दप्रामाण्यामुळें त्यांचा उदारमतवाद जसा दुबळा ठरला, तसा ईश्वरनिष्ठेमुळें त्यांचा व्यक्तिवादहि कमजोरच राहिला. व्यवहारामध्यें रानड्यांनीं संथपणाचा व मतपरिवर्तनाचा मार्ग पत्करला. ह्या प्रवृत्तीमुळेंच तडजोडीच्या नांवाखालीं आपला कमकुवतपणा लपविणें त्यांच्या पंथांतील अनेक बोलक्या सुधारकांना सोपें गेलें. चिपळूणकरांनीं पूर्वपरंपरेच्या अभिमानाला राष्ट्रीयत्वाचें अधिष्ठान मिळवून दिलें. आणि स्वाभिमानशून्य व कचखाऊ सुधारकांचा पिच्छा पुरवून रानडेप्रणीत समन्वयवादाचा पाया उखडून टाकला. म्हणून सुधारकांना अधिक तर्कशुद्ध व खंबीर अशी भूमिका घेणें भाग पडलें. आगरकरांनीं ही जबाबदारी आपल्या शिरावर घेतली; आणि व्यक्तिवादाला बुद्धिवाद व भौतिकवाद यांची जोड देऊन वैचारिक क्षेत्रांत सनातन्यांना निरुत्तर करून सोडलें.

आगरकरांनीं व्यक्तिप्रेरणा स्वभावतःच पवित्र मानली आहे. मनुष्याच्या वासना आणि भावना, इच्छा आणि आकांक्षा त्यांना तिरस्करणीय वाटल्या नाहींत. उलट त्यांच्या परिपूर्तीसाठीं प्रत्येकाची सारखी धडपड चालू असल्यामुळें आजपर्यंत व्यक्तिविकासाला व समाजधारणेला त्या पोषकच झाल्या आहेत असें त्यांचें स्पष्ट मत होतें. शास्त्र, कला, नीति, धर्म, राज्य इत्यादिकांची रचना मुळांत इंद्रियांपासून होणाऱ्या सुखदुःखांवरच झाली आहे. हीं इंद्रियजन्य सुखदुःखें काढून घेतलीं तर सर्व भौतिक व सांस्कृतिक जीवनाचा पायाच खचून जाईल अशा तऱ्हेचा भौतिकवाद आगरकरांनीं

---

¶ Belief in the moral government of a perfect Being and in the immortality of the soul, have made civilized man what he is at present found to be, and whatever may be the case with a few great thinkers, mankind generally can only be saved by this saving faith "–M. G. Ranade : *Miscellaneous Writings.* p. 67.

जागोजाग प्रतिपादन केला आहे. न्या. रानडे यांनीं डेक्कन कॉलेजमध्यें व प्रार्थनासमाजांत केलेल्या व्याख्यानांचें खंडन करतांना आगरकरांनीं खालील उद्गार काढले आहेत त्यावरून त्या दोघांच्या विचारसरणींतील फरक स्पष्ट होईल.

"इतिहासाच्या अवलोकनानें प्रथम नजरेस गोष्ट येते ती ही कीं पृथ्वीवर निरनिराळ्या जातींच्या लोकांत जीं रणें झालीं, व अजून होत आहेत, त्यांचें मुख्य कारण भूक होय. भूक व इतर इंद्रियक्षुधा भागविण्यासाठीं मनुष्यजाती एकमेकींशीं लढतां लढतां इतका त्रास भोगतात, इतक्या थकून जातात कीं अखेरीस ज्यानें त्यानें दुसऱ्यास उपद्रव न होण्यासारखे श्रम करून स्वचरितार्थ करावा व होता होईल तों इतरांशीं सलोख्यानें वागावें अशा प्रकारचा वर्तनक्रम त्यांच्यांत सुरू होतो, व असा वर्तनक्रम सुरू झाला म्हणजे रानटी स्थिति जाऊन सुधारणेस आरंभ झाला असें समजावें. दुसऱ्यास उपद्रव न होईल अशा प्रकारचे श्रम करून चरितार्थ करण्याची हौस, व दुसऱ्यास निरपेक्षबुद्धीनें साहाय्य देण्याची आवड, या दोन गुणांचा जसजसा अधिकाधिक प्रसार होत जातो, तसतशी राष्ट्राराष्ट्रांत, व एकाच राष्ट्रांतील स्त्रीपुरुषांत, आणि निरनिराळ्या स्थितींतील लोकांत, प्रीति वाढत जाऊन, मनुष्याच्या मनाला व शरीराला सुख व समाधान होणाऱ्या साधनांची वृद्धि होते. हीं साधनें कोणतीं आहेत हें वर थोडक्यांत सांगितलेंच आहे. पण कित्येकांचें असें म्हणणें पडतें कीं मनुष्यामनुष्यांत स्नेहसंबंध राहण्यास व मनुष्यसुखाची वृद्धि होण्यास, वर सांगितलेल्या गोष्टी पुरे होत नाहींत. त्यांच्या मदतीला धर्म आला पाहिजे. या पक्षाचे लोक धर्म या शब्दाची स्पष्ट व्याख्या कधींच देत नाहींत; त्यामुळें त्यांच्याशीं वाद करण्यास मोठी पंचाईत पडते. तथापि परमेश्वरस्तुति, सद्वर्तन, परोपकार, व आत्मोन्नति इतक्या गोष्टींचा धर्माच्या व्याख्येंत समावेश बहुशः करण्यांत येतो. यांपैकीं सद्वर्तन आणि परोपकार यांना धर्माशिवाय दुसरा आधार नाहीं असें म्हणण्यापेक्षां, या दोन गोष्टी आधीं सिद्ध होऊन धर्मांत गोविल्या गेल्या, असें म्हणणें विचाराला व इतिहासाला जुळून आहे. परमेश्वराविषयीं कृतज्ञताबुद्धि असल्यानें व त्याच्या स्वरूपाचें आकलन करून त्याचा स्तव करण्यांत मन व शरीर रममाण झाल्यानें आत्मोन्नति होते, व तो अनिर्वाच्य परमानंदांत गढून जातो, तथापि

हा आनंद ज्याचा त्याजपाशीं रहात असल्यानें, व हा संपादण्यासाठीं ज्या साधनांचा उपयोग करावा लागतो, त्यांचा सांसारिक सुधारणांशीं म्हणण्यासारखा संबंध नसल्यामुळें तो त्यांच्यापासून दूर ठेवणें फार अगत्याचें आहे. सांसारिक विचार ऐहिक सुखविषयक असतात. धर्मविचारापैकीं मुख्य मुख्य तरी आत्म्याचें पारमार्थिक सुख कशानें साधेल या दिशेस लागलेले असतात. ऐहिक व पारमार्थिक सुखांचे विषय व ते संपादण्याचीं साधनें अगदीं भिन्न असल्यामुळें एकमेकांचें एकमेकांशीं बहुशः पटत नाहीं; किंवा तीं परस्पराला उपरोधक असतात असें म्हटलें तरी चालेल. तसेंच पारमार्थिक सुख साधण्याविषयींचे कित्येक विचार फार गूढ असल्यामुळें त्यांबद्दल बरेंच मतांतर असतें, व हें मतांतर ऐहिक दुष्ट वासनांचे साथी झालें म्हणजे जे कहर गुदरतात त्यांसारखें भयंकर असें दुसरें कांहीं नाहीं, हें प्रत्येक इतिहासज्ञ कबूल करील. आमच्या येथील विद्वच्छिरोमणि प्रसिद्ध राव बहादुर प्रोफेसर म. गो. रानडे हे इतिहासज्ञ आहेत. तथापि त्यांना वरील गोष्ट संमत नसावी असें त्यांच्या मुखावाटें निघणाऱ्या उद्गारां-वरून दिसतें." §

जगताच्या आदिकारणाची चिकित्सा करतांना कांहीं ठिकाणीं आगरकरांनीं अज्ञेयवादी विचार मांडले आहेत हें खरें. परंतु त्यामुळें त्यांच्या एकंदर विवेचनांतील भौतिकवादी प्रवृत्तीस मुळींच बाध येत नाहीं. आगरकरांची मूळ भूमिका सिद्धप्रज्ञ तत्त्वमीमांसकाची नसून निष्ठावंत समाजसुधारकाची आहे. एकाद्या स्वतंत्र व स्वयंपूर्ण दर्शनाची मांडणी करण्यास ते उभे राहिले नव्हते. पुढारलेल्या देशांतील आधुनिक विचारप्रवाह आत्मसात् करून व तेथील लोकव्यवहाराचें मर्म जाणून घेऊन त्यांच्या अनुषंगानें येथील आचारविचारांत आणि चालीरीतींत बुद्धिपुरःसर बदल घडवून आणण्याची त्यांना खरी तळमळ होती. तेव्हां आगरकरांच्या विचारप्रणालींतील मुख्य सूत्र शोधतांना ज्या सुधारणांचा त्यांनीं जन्मभर आवेशानें पाठपुरावा केला त्यांच्या बाबतींत त्यांची कोणती भूमिका होती हें नीट ध्यानांत घेण्याची अधिक आवश्यकता आहे. सामाजिक व्यवहाराच्या इष्टानिष्टतेची कसोटी

§ आगरकर : केसरींतील निवडक निबंध, दुसरें पुस्तक. पृ. ९३

ठरवितांना आगरकरांनीं भौतिकवादी जीवनमूल्यांचीच कास धरली आहे हें वर उद्‌धृत केलेल्या उताऱ्यावरून सहज स्पष्ट होईल.

## व्यक्ति आणि समाज

समाजजीवनांत कोणकोणत्या सुधारणा आवश्यक आहेत याबद्दल रानडे व आगरकर यांमध्यें फारसा मतभेद नव्हता. पण त्या घडवून आणण्यासाठीं दोघांनीं पत्करलेले दृष्टिकोन व मार्ग अगदीं निराळे होते. रानडे वास्तववादी असल्यामुळें त्या त्या वेळेस जें साधन उपलब्ध होईल त्याच्या आधारानें एकेक सुधारणा लोकांच्या गळीं उतरविण्याकडे त्यांचा कल होता. कधीं शास्त्राधार दाखवून, तर कधीं युक्तिवाद करून, कधीं सनातन्यांवर सौम्य टीका करून, तर कधीं कायद्याचें दडपण आणून सुधारणेचा गाडा ते पुढें ढकलीत होते. आगरकरांनीं मात्र सुधारणेच्या तपशीलापेक्षां तत्त्वावर अधिक भर दिला. एकेका पावलाचा हिशोब करीत बसण्यापेक्षां प्रगतीची दिशा निश्चित करणें त्यांना जास्त महत्त्वाचें वाटलें. "आज ज्या कित्येक सामाजिक गोष्टींविषयीं आमच्या लोकांत विशेष मतांतर दिसत आहे, तें अस्तित्वांत यण्यास पुष्कळ अंशीं सामाजिक सुधारणेच्या मूल तत्त्वांचें अपूर्ण आकलन कारण होत आहे. कोणत्याहि प्रयत्नानें जर त्यांस त्यांचें पूर्ण आकलन होईल तर सामाजिक सुधारणा अडथळा न होतां मोठ्या झपाट्यानें होऊं लागेल."¶ अशी त्यांची समजूत होती. म्हणून लोकांच्या नापसंतीला, रागाला किंवा उपहास्यतेला यत्किंचितहि न भितां जें समाजहितकारक आहे तें समाजाला समजून देण्यासाठीं त्यांनीं सतत आपली लेखणी झिजविली.

आगरकरांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें व्यक्ति हें एक स्वतंत्र मूल्य आहे. व्यक्तीसाठीं समाज आहे; समाजासाठीं व्यक्ति नाहीं. व्यक्ति ही समाजाचा एक घटक असली तरी ती जिवंत व स्वयंपूर्ण आहे. समाजाला मात्र व्यक्तीशिवाय स्वतंत्र अस्तित्व नाहीं. "समाज हा एक काल्पनिक पुरुष आहे. समाजाचें कल्याण म्हणजे या काल्पनिक पुरुषाचें कल्याण नव्हे; तर त्याच्या अवयवांचें कल्याण होय. व्यक्तीची तशी गोष्ट नाहीं. व्यक्तीच्या अवयवास

---

¶ आगरकर : निबंधसंग्रह, भाग १ ला, पृ. १०.

स्वतंत्र मन नसल्यामुळें व्यक्तीचें जें कल्याण तेंच त्यांचें कल्याण होय. व्यक्तिशरीर आणि समाजशरीर यांतील या महत्त्वाच्या भेदामुळें त्याविषयीं विचार करतांना व लिहितांना ही गोष्ट नेहमीं डोळ्यासमोर पुढें ठेवावी लागते कीं, व्यक्तीच्या अवयवांच्या हितासाठीं जे नियम घालावयाचे ते वास्तविक पाहतां ते ज्या व्यक्तीचे अवयव असतील त्या व्यक्तीच्या हितासाठीं असतात; व समाजाच्या हितासाठीं जे नियम करावयाचे ते वास्तविक पाहतां, समाजाच्या अवयवांच्या हितासाठीं असतात." † व्यक्तीच्या हितासाठीं सामाजिक नियम असल्यामुळें अर्थात् व्यक्तिविकास हेंच त्यांचें एकमेव उद्दिष्ट असलें पाहिजे, समाजांतील निरनिराळ्या व्यक्तींचे संबंधहि संमतीच्या तत्त्वावर अधिष्ठित असले पाहिजेत हें ओघानेंच आलें. इतरांच्या स्वातंत्र्याला बाध न येतां सामाजिक व्यवहार सुरळीत चालावा म्हणून व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर कांहीं मर्यादा घालणें आवश्यक आहे. परंतु "व्यक्तीच्या ज्या आचरणापासून समाजाचें प्रत्यक्ष अपरिमित नुकसान होत नसेल तें आचरण त्या व्यक्तीस कितीहि घातक असलें, तथापि त्यानें तें करूं नये अशी समाजानें सक्ती करण्याचा समाजास अधिकार नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्य व समाजबंधन ह्या दोहोंसहि मर्यादा आहेत. त्या मर्यादांचा अतिक्रम होईल तर त्यापासून एकंदर समाजाचेंच नुकसान होणारें आहे."§ असें बजावून रूढीचा गुलाम बनलेल्या समाजांत आगरकरांनीं व्यक्तिस्वातंत्र्याची तरफदारी केली. मनुष्याला एवढें स्वातंत्र्य दिल्यास तो सुखासीन, स्वार्थलोलुप व सहानुभूतिशून्य बनेल हें त्यांना मान्य नव्हतें. "ज्यांना नेहमीं दुसऱ्यावर जुलूम करण्याची किंवा सत्तीचा अंमल बजावण्याची संवय असते, ते असें म्हणतात कीं मनुष्य हा अप्पलपोटा प्राणी आहे; स्वहितासारखी त्याला दुसरी प्रिय वस्तु नाहीं; व कोणतीहि गोष्ट करण्यांत स्वहितसाधनाहून त्याचा दुसरा हेतु असत नाहीं... परंतु स्वातंत्र्याचा उपभोग प्राप्त होत असलेल्या मनुष्यांचें वर्तन ज्यांनीं थोड्या काळजीनें पाहिलें असेल, त्यांना असें दिसून आलें असेल कीं, स्वातंत्र्याचा नित्य अनुभव घेणारा मनुष्य स्वहितपरायण असत नाहीं इतकेंच

† कित्ता, पृ. ३६.

§ आगरकर : निबंधसंग्रह, भाग २ रा, पूर्वार्ध पृ. ७४.

नाहीं तर बराच परोपकारी निदान परहितचिंतक तरी असतो. आपल्या श्रमाचें सारें फल आपणांसच उपभोगावयास सांपडावें, ही मनुष्याच्या अंतःकरणाची पूर्णावस्था नव्हे. त्या फलाची हवी तशी व्यवस्था लावण्याची मोकळीक आपणांस असावी, ही त्याची आकांक्षा असते; व ही जशी परिपूर्ण होत जाते, तसतशी त्याची स्वार्थबुद्धि क्षीण होत जाऊन तो पराकाष्ठेचा परहितैषी होत जातो." † व्यक्तिस्वातंत्र्य हें वस्तुतः सामाजिक हिताला याप्रमाणें पोषक असल्यामुळेंच सामाजिक संबंधांत व्यक्तीच्या मताला अधिक मान देण्याची गरज आहे, असें आगरकरांचें मत होतें. राजा व प्रजा; कुलेश व कुलावयव, पति आणि पत्नी; मातापितरें व अपत्यें; स्वामी आणि सेवक; गुरु आणि शिष्य; विक्रेता आणि ग्राहक ह्यांच्यामधील व्यवहार आणि संबंध उत्तरोत्तर बलात्कारानें न होतां संमतिपूर्वक होत जाणें हाच त्यांनीं सुधारणेचा मानदंड ठरविला होता.

स्पेन्सरचें शिष्यत्व पत्करणारे आणि संमतीच्या तत्त्वावर सर्व व्यवहार चालावे असें प्रतिपादणारे आगरकर सुधारणेच्या बाबतींत सरकारकडे कायद्याची मागणी करण्यास कसे पुढें सरसावतात याचें पुष्कळांना आश्चर्य वाटण्याचा संभव आहे. परंतु ह्याहि प्रश्नाचें त्यांनीं उत्तर दिलेलें आहे. "ज्याप्रमाणें एकाद्या व्यक्तीच्या आचारविचारांपासून समाजाचें नुकसान नसतां तो आचार-विचार बदलण्याची समाजास सक्ती करतां येत नाहीं त्याप्रमाणें आधींच जर समाजानें सक्ती केली असेल तर ती नाहींशी करणें हें ही समाजाचें कर्तव्य होय व तें बजावण्यास समाज तयार नसेल तर समाजाचा विशेष जोरदार प्रतिनिधि जो सरकार त्यानें पुढें आलें पाहिजे." § अशा भूमिकेवरून असंमत वैधव्य व संमतिवय इत्यादि बाबतींत त्यांनीं सरकारकडे कायद्याची मागणी केली. बालविवाहाच्या बाबतींत "सामान्य दृष्टीनें पाहतां कायद्याची मदत घेणें जरी सर्वांशीं ग्राह्य नाहीं तथापि आमच्या समाजाचा पूर्व इतिहास व सांप्रतची स्थिति हीं मनांत आणतां हें आमचें निगरगट्ट तट्टू कायद्याच्या फोंकावांचून हालणार नाहीं." ¶ असें त्यांचें

† आगरकर : निबंधसंग्रह, भाग १ ला, पृ. ३४.

§ आगरकर : निबंधसंग्रह, भाग २ रा, पूर्वार्ध, पृ. ७५.

¶ कित्ता. पृ. ८१.

म्हणणें होतें. स्पेन्सरचें शिष्यत्व अंधपणानें न पत्करतां येथील परिस्थितीला अनुसरून त्यांनीं आपल्या विचारांत योग्य ते फेरफार केले. म्हणूनच ते इतके जिवंत, धारदार व मर्मग्राही वाटतात.

आगरकरांची विचारसरणी तत्कालीन समाजाला मुळींच पटण्यासारखी नव्हती. त्यांनाहि याची यथार्थ कल्पना होती. पण समाजाची सुधारणा व्हावयाची असेल तर कोणीतरी अप्रिय परंतु पथ्यकारक विचार लोकांपुढें मांडलेच पाहिजेत. ज्या समाजांत लोकमताच्या धाकानें सत्य असेल तें बोलण्यास समाजाग्रणी कचरतात त्या समाजाचा उत्कर्ष होणें कदापि शक्य नाहीं या जाणिवेनेंच त्यांनीं सामाजिक व्यवहाराच्या मूलतत्त्वांची इतक्या निर्भीडपणें छाननी केली. म्हणूनच आगरकरांचा व्यक्तिवाद निधडा, जोरकस व आक्रमक बनला आहे. मानवाच्या स्वातंत्र्यावर बंधनें घालणाऱ्या, त्याचें जीवन ठराविक चाकोरींत अडकावून ठेवणाऱ्या रूढि व लोकाचार यांचा त्यांनीं 'सुधारकां'तून तीव्र निषेध केला आहे. सोवळ्याओवळ्यासारख्या मामुली गोष्टीपासून तों जातिभेद व अस्पृश्यता यांसारख्या गंभीर प्रश्नांपर्यंत सर्वच विषयांचा त्यांनीं तत्परतेनें परामर्श घेतला; आणि लोकांच्या वेडगळपणावर फटकारे ओढले. टिळकांसारखा सामर्थ्यवान् व संघटनाचतुर प्रतिस्पर्धी समोर असताना लोकमताला एकाकी विरोध करून समाजाची जुनी चौकट खिळखिळी करण्याचें हें कार्य शिरावर घेण्यांत आगरकरांनीं जी तत्त्वनिष्ठा व नीतिधैर्य दाखविलें त्याला महाराष्ट्राच्या अर्वाचीन इतिहासांत तोड नाहीं.

## आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय ?

सुधारणाविरोधकांचें धुरीणत्व टिळकांकडे होतें. सामाजिक सुधारणेच्या मूलतत्त्वांना त्यांचा विरोध नव्हता.* विवाद्य प्रश्न काय तो त्यांच्या मतें धोरणांतील तपशीलाचा व पूर्वापरभावाचा होता. सामाजिक सुधारणांचा केवळ

* "आम्हांस तरी सुधारणा कोठें नको आहे? सुधारणा दोघांसही हवी असली तरी तिचें स्वरूप व मार्ग दोघांच्या मतें निरनिराळे आहेत." टिळक : केसरींतील लेख, भाग ४ था, पृ. १८३.

तर्कदृष्ट्या विचार करणें त्यांना पसंत नव्हतें. " राजकीय बाबतींत राजसत्तेच्या अस्तित्वामुळें केवळ तर्कवश होऊन लिहितां येत नाहीं असा आगरकरांसहि अनुभव आलेला होता; पण हिंदु समाज अधिकारहीन आणि पंगु असल्यामुळें तशा प्रकारचा अनुभव सामाजिक बाबतींत सध्यां आमचेकडे येत नाहीं. तथापि तेवढ्यामुळें प्राचीन परंपरा, देशकाल आणि सद्यःकालीन सामाजिक परिस्थिति यांस सोडून केवळ तार्किकरीत्या सामाजिक सुधारणेचा विचार करणें युक्त आहे असें सिद्ध होत नाहीं. समाजावर तार्किक हल्ले करणें म्हणजे केवळ पाडापाडीचें काम करणें होय. त्यानें समाजाचीं बंधनें शिथिल होतात, पण नवीं मात्र उत्पन्न होत नाहींत." § असें म्हणून कल्पनानिष्ठ बुद्धिवादाच्या मर्यादा त्यांनीं स्पष्ट केल्या. " काल्पनिक स्वमताभिमानानें ऊर्ध्वदृष्टि न होतां लोकाग्रणींनीं आत्मकालीन देशस्थितीस व लोकमतास अनुसरून सुधारणेचा मार्ग क्रमिला पाहिजे. "* असें त्यांचें म्हणणें होतें. म्हणून " लोकमत मागें पडलें असल्यास तें सुधारून घेण्याचा उद्योग करा, पण त्यास सोडून जाऊं नका." ‡ असा वास्तववादी भूमिकेवरून त्यांनीं सुधारकांना उपदेश केला आहे.

टिळकांचें लक्ष लोकांच्या जिव्हाळ्याच्या पण तात्कालिक प्रश्नांवर केंद्रित झालें होतें. इंग्रज सरकार हीच हिंदुस्थानच्या अभ्युदयाच्या मार्गातील सर्वांत मोठी धोंड असल्यामुळें अवांतर गोष्टींवर शक्ति वेंचण्यापेक्षां लोकांची प्रतिकार-बुद्धि जागृत करणें त्यांना अधिक निकडीचें वाटलें. म्हणून राजकारणाला समाजजीवनांत त्यांनीं अग्रस्थान दिलें, आणि राजकीय उपयुक्ततेची कसोटी लावून सुधारणांची इष्टानिष्टता ठरविली. तरुणांमध्यें स्वाभिमान निर्माण करणारें राष्ट्रीय शिक्षण, त्यांना स्वावलंबनाची दीक्षा देणारे स्वतंत्र उद्योगधंदे आणि त्यांना लोकसेवेस प्रवृत्त करणारे राष्ट्रीय महोत्सव यांच्या प्रसारास त्यांनीं सहानुभूतिपूर्वक उत्तेजन दिलें. परंतु 'गृहस्थिति व राजकीय सुधारणा यांचा सार्वत्रिक व सार्वकालिक समवायसंबंध' असतो असें मानण्यास ते तयार

§ कित्ता, पृ. ५३५.

* कित्ता, पृ. ७१.

‡ कित्ता, पृ. ७१.

नव्हते. रानडे आदि करून सुधारकांनीं राजकीय सुधारणेचीं तत्त्वेंच सामाजिक क्षेत्राला लागू करण्याची अपेक्षा धरली होती. आपल्या जातिबांधवांस जोंपर्यंत आपण समान हक्क देण्यास तयार नाहीं, आपल्या घरांतील गुलामगिरीला आपण जोंपर्यंत आळा घालीत नाहीं, तोंपर्यंत इंग्रज लोकांनीं आपणांस बरोबरीच्या नात्यानें वागवावें, इंग्लंडच्या प्रजेस असणारे राजकीय हक्क त्यांनीं हिंदी प्रजाजनांस बहाल करावेत अशी मागणी करण्याचा आपणांस बिलकूल हक्क नाहीं असें सुधारकांचें मत होतें. म्हणून सामाजिक सुधारणांनीं लोकांची पात्रता वाढवून त्यांना स्वराज्यास लायक करणें हें राजकीय हक्कांची एकतर्फी मागणी करण्यापेक्षां त्यांना अधिक हितकारक वाटलें. टिळकांना मात्र सामाजिक व राजकीय सुधारणांची अशी सांगड घालणें हें मुळांतच नापसंत होतें. आपलें म्हणणें सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं आयर्लंडचा दाखला दिला. " आमचे सुधारक ज्या कांहीं सुधारणा हल्लीं करूं इच्छित आहेत त्या सर्व आयर्लंडांत झालेल्या आहेत. विधवाविवाह आहे, प्रौढविवाह आहे, जातिभेद नाहीं, मांसमद्यसेवन यथेच्छ सुरू आहे, पण बिचारें आयर्लंड सात-आठशें वर्षें धडपडत असतांहि अद्याप परवशतेच्या निरयस्थितींतून बाहेर पडत नाहीं, यामुळें सामाजिक सुधारणा नको असें आम्हीं म्हणतों असें कोणीहि समजूं नये. आमचें एवढेंच म्हणणें कीं, डॉ. भांडारकर यांनीं सामाजिक सुधारणेचा व राजकीय हक्कांचा जो हा संबंध जोडला आहे तो अगदीं भ्रांतिमूलक व निराधार आहे. " † पेशव्यांच्या काळांत प्रौढविवाह, पुनर्विवाह, स्त्रीशिक्षण, जातिभेदनिर्मूलन इत्यादि सुधारणा अंमलांत आल्याशिवायहि मराठ्यांचें साम्राज्य सारा हिंदुस्थान व्यापूं शकलें. त्यावरून राजकीय सत्ता संपादण्याच्या दृष्टीनें तरी असल्या सुधारणांचा कांहीं उपयोग नाहीं असा टिळकांच्या म्हणण्याचा मथितार्थ आहे.

एका दृष्टीनें टिळक सनातन्यांमध्येंहि पूर्णपणें मिसळूं शकले नाहींत. जुनीं शास्त्रें किंवा परंपरा यांच्याकडे पाहाण्याची त्यांची दृष्टि श्रद्धावंताची नसून चिकित्सकाची होती. बदलत्या काळांत जुन्या संस्था तशाच कायम राहणें अशक्य आहे हें ते जाणून होते. " पाश्चात्य राष्ट्रांची व आमची

† किता, पृ. १८५.

कर्मधर्मसंयोगामुळें जी सांगड पडली आहे, तिचा सांखळीच्या दोन्ही दुव्यांवर परिणाम झाल्याखेरीज रहावयाचा नाहीं." § ह्या संबंधांमुळेंच प्रचलित समाजरचनेंतील कांहीं दोष लोकांच्या नजरेस आले आणि ते दूर करण्याची खटपट सुरू झाली. परंतु "सुधारणा हा वर्षशतकांचा किंवा सहस्रांचा प्रश्न आहे." * त्यासाठीं समाजामध्यें बखेडा माजविण्याची कांहीं गरज नाहीं. राजकीय सत्ता एकदां आपल्या हातांत आली कीं त्या सत्तेच्या जोरावर आपणांस हव्या त्या सुधारणा सहज घडवून आणतां येतील. म्हणून राजकीय हक्क संपादन करण्यासाठीं आपण प्रथम हालचाल केली पाहिजे. लोकांना न पटणाऱ्या सुधारणा त्यांच्यावर लादण्याचा प्रयत्न करून त्यांच्यामध्य प्रक्षोभ निर्माण करणें आज इष्ट नाहीं अशी टिळकांची भूमिका होती.

राजकीय चळवळीच्या धकाधकींत शिरल्यावर पुढें टिळकांनीं हळुहळू आपला पवित्रा बदलला. १८८५ सालीं सुधारणेचीं तत्त्वें त्यांना मान्य होतीं. १८९५–९६ मध्यें मात्र पाश्चात्य समाजरचनेच्या मूलतत्त्वांबद्दलच संशय व्यक्त करून आपली जुनी समाजव्यवस्था सदोष असली तरी कमी प्रतीची खास नाहीं असा पक्ष त्यांनीं मांडला. युरोपांतील राष्ट्राच्या समाजाची घटना जरी निराळ्या तत्त्वावर झाली असली तरी त्या राष्ट्रांतील समाजपद्धतीपासून वाईट परिणाम होत नाहींत असें नाहीं. "गांव आहे तेथें म्हारवडा आहेच या म्हणीप्रमाणें युरोपांतील राष्ट्रांतहि समाजसुधारणा होण्यास अद्याप पुष्कळ जागा आहे. चढाओढीच्या तत्त्वावर रचलेल्या समाजांत संपत्तीची सारखी वाटणी न होतां कांहीं अतिशय श्रीमंत व कांहीं अतिशय दरिद्री अशी स्थिति प्राप्त होते; आणि विवाहसंस्कारासहि कराराचें स्वरूप आल्यामुळें विधवांच्या ऐवजीं कुमारिकांची संख्या वाढून गृहस्थाश्रमाच्या सुखास पुष्कळ स्त्रिया अंतरतात."¶ असें म्हणून युरोपीय समाजरचनेंतील दोषांकडे त्यांनीं बोट दाखविलें. इतकेंच नव्हे तर "वर्णव्यवस्थेमुळेंच हजारों वर्षें आम्हीं आपला

§ किता, पृ. १८९.

* किता, पृ. ७७.

¶ किता, पृ. १८८.

आपलेपणा कायम राखून एकसारखे स्वतंत्र नाहीं तरी जिवंत तरी राहिलों आहों. हा आपलेपणा एकदां सोडून द्या म्हणजे आमचेजवळ आहे तें आम्हीं गमावून बसूं; इतकेंच नाहीं तर 'इदं च नास्ति' आणि 'परं च न लभ्यते' अशी आमची स्थिति होऊन इसापनीतींतील भाकरीचा तुकडा तोंडांत धरून जाणाऱ्या कुत्र्याप्रमाणें आम्हीं अन्नासहि मोताद होऊन जाऊं."§ ह्या शब्दांत आपल्या वर्णव्यवस्थेचें त्यांनीं समर्थन केलें. युरोप व हिंदुस्थान ह्या दोन्ही ठिकाणच्या समाजरचनेंत गुणदोष आहेत असें म्हणतांना त्यांच्यामध्यें जो मूलभूत फरक आहे त्याकडे टिळकांनीं दुर्लक्ष केलें. हिंदु समाजाची घडण साचेबंद व स्थितिशील झालेली असल्यामुळें येथें प्रगतीला कोणत्याच दृष्टीनें वाव उरला नव्हता. उलट युरोपीय समाजरचनेंत कांहीं दोष असले तरी तिचें स्वरूप प्रवाही व प्रगतिशील होतें. समाजरचनेंत लोकांना हवा असलेला बदल त्यांच्या संमतीनें घडवून आणण्याचें साधन इंग्लंडमध्यें पार्लमेंटच्या रूपानें त्यांनीं तयार केलें होतें; तथील सामाजिक संबंध प्रत्यहीं बदलत होत. हिंदुस्थानांतहि प्रत्यक्ष सुधारणा होण्यापूर्वी समाजजीवनांतील जुनाट संस्थांचा आणि कल्पनांचा गाळ उपसून बहुसंख्य व्यक्तींच्या प्रेरणांना विकासाची संधि प्राप्त करून देणें आवश्यक होतें. परंतु या मूलभूत प्रश्नाची टिळकांनीं केवळ वरवर तपासणी करून प्रचारकी बाण्यानेंच विल्हेवाट लावली. ऐतिहासिक दृष्ट्या दोन्ही समाजव्यवस्थांची सोपपत्तिक मीमांसा करून त्यांची इष्टानिष्टता त्यांनीं ठरविली नाहीं, तर बुद्धिभेदाचें बुजगावणें उभें करून त्यांचें पृथक्करण करण्याचेंच त्यांनीं टाळलें. म्हणूनच टिळकांच्या लेखांत तत्त्व-चर्चेपेक्षां सुधारकांचा उपहास किंवा अवहेलना यांचाच वादाचा फड जिंकण्यासाठीं अनेकदां उपयोग केलेला आढळतो. त्यामुळें सुधारणांच्या बाबतींतील त्यांचे विचार कित्येकदां एकांगी व पूर्वग्रहदूषित वाटतात.

सामाजिक सुधारणेला जरी टिळकांनीं विरोध केला, तरी राष्ट्राच्या उन्नतीची त्यांना अहोरात्र तळमळ लागली होती. त्यासाठीं लोकांमध्यें स्वाभिमान व लढाऊ बाणा निर्माण करण्याची ते खटपट करीत होते. " स्वतंत्रतेचा किंवा राष्ट्रीयत्वाचा अभिमान म्हणून जो कांहीं जोम आहे, तो जोंपर्यंत जागृत

---

§ कित्ता, पृ. १९०.

असतो तोंपर्यंत समाजरचना कशीहि असली तरी त्यांतील दोष राष्ट्राच्या उन्नतीस अथवा भरभराटीस आड येत नाहींत. पण एकदां तो जोम नाहींसा झाला म्हणजे तेच दोष रावणाच्या धनुष्याप्रमाणें छातीवर बसून जगांत त्या लोकांची उपहास्यता होण्यास कारण होतात. सारांश, समाजरचनेपेक्षां लोकांमध्यें एकप्रकारचा आपल्या संस्थांबद्दल व देशाबद्दल अभिमान जागृत ठेवण्याची प्रत्येक देशकल्याणाकरितां झटणाऱ्या माणसानें आधीं तजवीज ठेविली पाहिजे." ‡ असेंच त्यांचें मत होतें. पण हा स्वाभिमान, ही स्वातंत्र्यप्रीति येथें कशी निर्माण होणार हाच तर समाजधुरीणांपुढें मुख्य प्रश्न होता. केवळ राजकीय प्रचारांतून किंवा चळवळीमधून तो उत्पन्न होऊं शकेल अशी टिळकांची समजूत होती. म्हणून आर्थिक व राजकीय क्षेत्रांत सरकारनें अवलंबिलेलें धोरण व उपाय यांची सारखी छाननी करून त्यांनीं त्यांतील दोषांवर बोट ठेवलें; आणि इंग्रज विरोधाच्या द्वारें जनतेमध्यें प्रतिकारबुद्धि जागृत करण्याची शिकस्त केली. परंतु केवळ परकीयांचा निषेध केल्यानें रूढीच्या दास्यांत हजारों वर्षें खितपत पडलेल्या बहुजनसमाजाच्या शक्ति उफाळून येणें शक्य नव्हतें. कोणत्याहि देशांतील लोकांचा राष्ट्राभिमान हा गतेतिहासाच्या अभिमानावर आणि भविष्याविषयीं त्यांना वाटणाऱ्या आशा–आकांक्षांवर नेहमीं अवलंबून असतो. सामाजिक गुलामगिरीचीच ज्यांना परंपरा आहे अशा वर्गांना गतेतिहासापासून स्फूर्ति मिळणें शक्य नसल्यानें त्यांच्या बाबतींत तर भविष्यकालांत संपन्न व सुसंस्कृत जीवन जगण्याची आशा हाच राष्ट्राभिमानाचा एकमेव आधार असतो. म्हणून जीर्ण रुढींचे पाश तोडून दलित वर्गांतील लोकांना विकासाची संधि देणें हाच त्यांच्यामध्यें स्वदेशप्रीति उत्पन्न करण्याचा खात्रीचा उपाय होय. राष्ट्राभिमान आणि सामाजिक सुधारणा यांचा ह्याप्रमाणें अगदीं निकटचा संबंध असल्यामुळें परकीयांचा प्रतिकार करण्यासाठीं जनतेच्या शक्तीवर अवलंबून असणाऱ्या राजकीय नेत्यांना सामाजिक सुधारणेकडे पाठ फिरवून चालत नाहीं. पण तात्कालिक प्रश्नांवर लक्ष केंद्रित केल्यामुळें राजकारण व समाजकारण यांच्या परस्परावलंबित्वाकडे टिळकांनीं पुरेसें लक्ष दिलें नाहीं.

‡ कित्ता, पृ. १८८.

आगरकरांची दृष्टि अधिक मूलगामी होती. म्हणून समाजजीवनाच्या निरनिराळ्या अंगांतील परस्परसंबंध त्यांना नीट ओळखतां आला " धर्मसुधारणा, आचारसुधारणा, राजकीय सुधारणा वगैरे वर्ग केवळ व्यवस्थेकरितां केलेले आहेत. त्यापैकीं अमुकास पहिला नंबर, अमुकास दुसरा नंबर, असें कांहीं ठरवितां येणार नाहीं. ते सर्व मनुष्यांच्या वेगळाल्या व्यवहाराचे व्यंजक होत व त्या सर्वांची एकसमयावच्छेदेंकरून सुधारणा होत जाणें, म्हणजेच मनुष्यांची किंवा त्यांनीं वसविलेल्या राष्ट्रांची सुधारणा झाली असें म्हणतां येईल §" हें त्यांना कळून आलें. म्हणूनच पेशवेकालीन धार्मिक व सामाजिक व्यवहारांतील दोष उघड करून मराठेशाहीच्या ऱ्हासाची त्यांनीं कारणमीमांसा केली. त्याचप्रमाणें नव्या राजकीय आंदोलनांतील अंतर्विरोधाचीहि त्यांना कल्पना आली होती. " कोणत्याहि देशाचे कोणत्याहि बाबतींत पुढें पाऊल पडण्यास त्या देशांतील लोकांमध्यें परस्पर प्रेमभाव असला पाहिजे व ते एकमतानें व एकदिलानें वागण्यास तयार असले पाहिजेत याबद्दल कोणाचा मतभेद नाहीं. परंतु हा स्नेहभाव राहण्यास व एकमत उत्पन्न होण्यास जातिभेद आड येतो ही गोष्ट मात्र कबूल करण्याचें कित्येकांच्या जिवावर येतें. " * असें म्हणून जातिभेदनिर्मूलनाचा राष्ट्रीय चळवळीशीं असलेला संबंध त्यांनीं दाखवून दिला; आणि राजकीय चळवळीचें कार्यक्षेत्र व सामर्थ्य वाढविण्याच्या बुद्धीनें ब्राह्मणशूद्रांतील वैषम्य कमी करण्याचा उच्चवर्णीयांना उपदेश केला. ¶ याप्रमाणें आगरकरांचा व्यक्तिवाद

---

§ आगरकर : निबंधसंग्रह, भाग २ रा, पूर्वार्ध, पृ. १७४.

* आगरकर : निबंधसंग्रह, भाग ३ रा, ( प्रकाशक : बाळकृष्ण मल्हार फडतरे ), १९१८. पृ. १८१.

¶ इंग्रजी अंमलानें शूद्रांस ज्ञानाचीं द्वारें खुलीं होऊन त्यांचे डोळे उघडले असल्यामुळें ब्राह्मणांस भूदेव मानून त्यांची सेवा करणें हाच तुमचा धर्म आहे, हा उपदेश यापुढें अर्थातच त्यांस मानवणार नाहीं; व ते ब्राह्मणांच्या भूदेवत्वाविरुद्ध बंड केल्यावांचून कधींहि राहणार नाहींत. या बंडास यापूर्वींच सुरवात झालेली आहे. परंतु या वर्गांत अद्याप विद्येचा विशेष प्रसार झाला नसल्यामुळें त्यांचें पूर्ण स्वरूप अजून भासूं लागलें नाहीं. विद्येचा

राष्ट्रवादाला पोषक होता. आगरकरांच्या विरोधकांना मात्र त्यांच्या या दृष्टिकोनाचें यथायोग्य आकलन झालें नाहीं. म्हणून आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय ह्या लढ्यांत आगरकरांवर त्यांनीं विजय मिळविला, तरी प्रत्यक्ष कृतीच्या दृष्टीनें राजकीय क्षेत्रांतहि त्यांचा पक्ष कमकुवतच राहिला.

## मध्यमवर्गाची परिस्थिति

आगरकरांच्या अपयशाचें रहस्य तत्कालीन सामाजिक परिस्थितींत आहे. व्यक्तिवादाचें व बुद्धिवादाचें हें तत्त्वज्ञान आगरकरांनीं युरोपीय विचारवंतांकडून उचललें. इंग्लंड व फ्रान्स यासारख्या देशांत राज्यक्रान्त्या घडवून आणण्यांत आणि समाजाची जुनी घडी बदलून नवी घडी बसविण्यांत ही व्यक्तिवादी विचारप्रणाली अतिशय प्रभावी ठरली होती. तत्त्वनिष्ठा, मनोधैर्य व स्वार्थत्याग ह्या बाबतींत पाश्चात्य विचारवंतांच्या तुलनेनें आगरकर रेसभरहि कमी नव्हते. म्हणूनच त्यांच्या पराभवाला त्यांच्या व्यक्तिमत्त्वांतील वैगुण्यापेक्षां महाराष्ट्रांतील प्रतिकूल परिस्थितिच अधिक कारणीभूत होती असें म्हणावें लागतें. आगरकर ज्या समाजाला हें तत्त्वज्ञान शिकवीत होते त्याच्यामध्यें तें पचविण्याची ताकद नव्हती. युरोपमध्यें रूसो, व्हॉल्टेर ह्यांच्या काळांत सर्व समाज तळापासून घुसळला जात होता. सरंजामदार व पुरोहित यांच्या वर्चस्वाला विरोध करून आर्थिक व राजकीय सत्ता काबीज करण्यासाठीं

---

जसजसा अधिक प्रसार होत जाईल तसतसें शूद्रादि वर्गास हल्लींचें वैषम्य अधिकाधिक टोंचूं लागून तें नाहींसें करण्यास ते जारीनें प्रयत्न केल्यावांचून राहाणार नाहींत. हौदावरून ब्राह्मणादिकांची जी आज अवहेलना होते आहे ती या भावी बंडाचीच सूचक होय. राष्ट्रसभेसारख्या हितकारी संस्थेविषयींहि या लोकांच्या मनांत द्वैतभाव उत्पन्न होऊं लागला आहे, व ते कदाचित् कांहीं मुसलमान, पारशी वगैरे लोकांप्रमाणें विघ्नसंतोषीपणा करतात कीं काय अशीही भीति वाटूं लागली आहे. म्हणून देशकालवर्तमानाकडे नजर देऊन परदेशस्थ म्लेंच्छांशीं व्यवहार करण्यास जसे आमचे लोक नाखुषीनें का होईना हळुहळू कबूल होत आहेत त्याप्रमाणें त्याच कारणाकरितां येथेंही ब्राह्मणशूद्रांतील वैषम्य होईल तितकें कमी करण्यास त्यांनीं मनाचा हिय्या केला पाहिजे." कित्ता पृ. १८२

व्यापारी वर्गाचा झगडा चालू होता. परंपरा, कायदा आणि पूर्वसंस्कार या सर्वांचाच जुन्या वर्गाला पाठिंबा होता. अशा काळांत आपल्या मागण्यांचें समर्थन करण्यासाठीं व्यापारीवर्गाला बुद्धिवादाचें व व्यक्तिवादाचें हें तत्त्वज्ञान श्रेयस्कर वाटलें. विज्ञानशक्तीच्या साहाय्यानें त्यांनीं धर्मसत्तेचें आसन डळमळीत केलें. बुद्धिवादाच्या जोरावर परंपरेची तटबंदी त्यांनीं जमीनदोस्त केली; व्यक्तिस्वातंत्र्याचा पुकारा करून व्यापार, सावकारी, रोजगारी यांच्या-वरील निर्बंध त्यांनीं उठविले; आणि लोकशाहीच्या झेंड्याखालीं राजकीय सत्तेंत भागीदारी मिळविली. जुने वर्ग बांडगुळाप्रमाणें समाजवृक्षाचें शोषण करीत होते. नवे वर्ग औद्योगिक विकासाचीं नवीं रोपटीं लावीत होते. म्हणून बहुजनसमाजाच्या शक्ति त्यांच्या पाठीशीं उभ्या राहिल्या आणि त्यांच्या विजयाबरोबर युरोपमध्यें वरील तत्त्वज्ञानाचा प्रसार झाला. महाराष्ट्रांतील परिस्थिति याहून वेगळी होती. महाराष्ट्रांत स्वतंत्र व्यापारी किंवा कारखानदार असा वर्ग नव्हताच. इंग्रजी अमदानीच्या सुरवातीपासून पश्चिम किनाऱ्यावरील व्यापाराची मक्तेदारी पारशी व गुजराती व्यापाऱ्यांनीं मिळविली होती. महाराष्ट्राच्या आधीं दोन शतकें त्यांनीं या क्षेत्रांत प्राविण्य मिळविलें. अनेक शतकांपासून गुजराती लोक व्यापारांत अग्रेसर होते. जैन धर्माच्या प्राबल्यामुळें शेती आणि मुलुखगिरी ह्या दोन्ही हिंसाप्रधान धंद्यांपासून ते परावृत्त झाले; आणि निरुपद्रवी व्यापाराची त्यांनीं कास धरली. सतराव्या शतकांत तर ईस्ट इंडिया कंपनीची गंगा आपण होऊन त्यांच्याकडे चालून आली. ह्या वाहत्या गंगेंत हात धुवून घेण्यास कां कूं करण्याचें त्यांना कारण नव्हतें. कंपनीचा बहुतेक सर्व व्यापार मोंगलांशीं होता. मोंगलांकडे संपत्तीला तोटा नव्हता; विलासी वृत्तीची वाण नव्हती. म्हणून त्यांच्याशीं व्यापार करणें इंग्रजांच्या फायद्याचें होतें; आणि या व्यापाराला गुजरातेंतील बंदरेंच सर्वांत अधिक सोयीचीं होतीं. महाराष्ट्रांतील डोंगराळ मुलूख आणि नापीक जमीन यामुळें येथें व्यापाराला फारसा वाव नव्हता. सतराव्या शतकांत तर मराठ्यांच्या उदयाला नुकतीच सुरवात झाली होती. महाराष्ट्राचीं खडकाळ बंदरें, अनिश्चित मार्ग, प्रचंड कडे आणि खोल दऱ्या यांतून पार पडण्याचा उत्साह व्यापाऱ्यांना देण्याइतकें

प्रलोभन महाराष्ट्रांतील कोणत्याच शहरांत नव्हतें. म्हणून सुरत, भडोच इत्यादि ठिकाणीं इंग्रजांनीं प्रथम वखारी घातल्या. इंग्रजी व्यापाऱ्यांच्या सावलींत गुजराती रोपटीं वाढूं लागलीं. म्हणून लक्षावधि रुपये जवळ बाळगून असणारे धनाढ्य व्यापारी सतराव्या शतकांतहि आपणांस गुजरातेंत आढळून येतात.‡ इंग्रजांच्या पाठोपाठ त्यांनींहि आपलें बस्तान बसविलें आणि मुंबईचा व्यापारहि काबीज केला. महाराष्ट्राची बुद्धि यावेळीं उत्तरेचें राजकारण खेळण्यांत गुंतली होती. म्हणून हें शांततामय व संथ आक्रमग बराच काळपर्यंत त्याच्या ध्यानांत आलें नाहीं. भांडवलाच्या अभावीं गुजरात्यांशीं स्पर्धा करणें नंतरहि महाराष्ट्रियांना कधीं जमलें नाहीं. म्हणून उत्पादनाचीं साधनें हातीं असलेला स्वतंत्र व्यापाऱ्यांचा व कारखानदारांचा वर्ग महाराष्ट्रांत निर्माण होऊं शकला नाहीं. महाराष्ट्रांतील मध्यमवर्ग हा शेवटपर्यंत बुद्धिजीवी नोकरपेशा मध्यमवर्गच राहिला.

गुजरातमधील धनाढ्य वर्गहि बराच काळ व्यापारावरच संतुष्ट राहिला. नवीन नवीन उद्योगधंदे उभारण्याची जबाबदारी त्यानें अंगावर न घेतल्यामुळें आर्थिक संबंधांत बदल घडवून आणण्याची त्याला गरज वाटली नाहीं. म्हणून जुन्या समाजव्यवस्थेविरुद्ध त्याला झगडा करावा लागला नाहीं. महाराष्ट्रप्रमाणें साहित्याची व तत्त्वज्ञानाची जोरदार परंपरा नसणाऱ्या आणि सरकारी नोकरीची अपेक्षा न बाळगणाऱ्या व्यापारी पेशाच्या या वर्गानें इंग्रजी शिक्षणाकडेहि विशेष लक्ष दिलें नाहीं. म्हणून महाराष्ट्रांतील सुशिक्षित वर्गाप्रमाणें नव्या विचारांचें त्याच्या बुद्धीलाहि आकर्षण वाटलें नाहीं. त्यामुळें नव्या परिस्थितीशीं जरी त्यानें जरूर त्या प्रमाणांत जुळतें घेतलें, तरी त्याच्या विचारांत मूलगामी फरक कधींच होऊं शकला नाहीं.

### आगरकरांच्या पराभवाची मीमांसा

महाराष्ट्रांत व्यापारी वर्ग अस्तित्वांत नसल्यानें आगरकरांचे बंडखोरीचे विचार येथील बुद्धिजीवी वर्गाच्या कानावर पडले. पण ते त्याच्या परिस्थितीशीं व मनोवृत्तीशीं सुसंगत नसल्यामुळें त्याला आत्मसात् करतां आले

‡ Moreland : *From Akbar to Aurangzeb*, p. 153.

नाहींत. इंग्लंडमधील व्यक्तिवादाचा पाया मुख्यतः आर्थिक होता. ॲडम स्मिथ, रिकार्डो, मिल यासारखे अर्थशास्त्रज्ञ त्याचे मुख्य प्रवर्तक होते. शास्त्रीय शोध, उत्पादनाचीं व वहातुकीचीं नवीं साधनें यांच्या जोरावर संपत्तीचा विपुल संचय करण्याची संधि इंग्रज व्यापाऱ्यांना समोर दिसत होती. तिचा उपयोग करून घेण्यासाठीं व्यक्तीच्या सुसंस्कृत स्वार्थप्रेरणेला व स्वतंत्र कर्तृत्वशक्तीला वाव करून देण्यास इंग्रज अर्थशास्त्रज्ञ उत्सुक होते. महाराष्ट्रांत अशा संधीचा अभाव असल्यामुळें व्यक्तीच्या स्वतंत्र कर्तृत्वाला उत्तेजन देण्याऐवजीं जाचक परंपरेंतून तिची मुक्तता करणें एवढ्यापुरतेंच व्यक्तिवादाचें कार्य येथें मर्यादित राहिलें. स्पेन्सरचें शिष्यत्व पत्करूनहि जीवनकलहाच्या कल्पनेवर आगरकरांनीं विशेष भर दिला नाहीं ह्याचें कारणहि येथील मध्यमवर्गातील कर्तृत्वशक्तीचा अभाव हेंच होय. आर्थिक क्षेत्रांत इंग्रज कारखानदार हाच येथील सर्व वर्गांचा मुख्य शत्रु होता. त्यामुळें हिंदुस्थानांतील अर्थशास्त्राचा पाया व्यक्तिवादापेक्षां राष्ट्रवादीच राहिला. इंग्रजी अमदानींत उदयास आलेल्या सुशिक्षित मध्यमवर्गाचे हितसंबंध कांहीं प्रमाणांत येथील सरंजामदारांहून निराळे होते हें खरें. पण नवी अर्थसंस्था आणि शासनपद्धति रूढ करून आणि सरंजामदारांची सत्ता संपुष्टांत आणून इंग्रज सरकारनें मध्यमवर्गाच्या प्रगतीचा मार्ग आधींच मोकळा केलेला होता. म्हणून त्याला स्वतःच्या हितासाठीं जुन्या वर्गांना दुखवावें लागलें नाहीं; आणि उत्पादन कार्याशीं तसा त्याचा प्रत्यक्ष संबंध नसल्यानें स्वतंत्र धोरण आंखण्याचें त्याला कधीं कारण पडलें नाहीं. त्यामुळें एकोणिसाव्या शतकांतील महाराष्ट्राच्या समाजजीवनांत अर्थकारणाला विशेष महत्त्व आलें नाहीं.

आर्थिक क्षेत्रानंतर युरोपांतील व्यक्तिवादाच्या अभिव्यक्तीचें दुसरें क्षेत्र राजकारण हें होय. जुन्या वर्गांच्या हातांत सर्व सत्ता केंद्रित झाल्यामुळें आर्थिक विकासाला जेथें वाव नसतो तेथें राजा व प्रजा यांच्यामधील विरोधांतून व्यक्तिवादाचा आविष्कार होतो. म्हणूनच रूसोसारख्या फ्रान्समधील राज्यक्रांतीच्या प्रणेत्यांनीं व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार करतांना राजसत्तेवर आघात केले होते. परंतु हिंदुस्थानांतील राजसत्ता सर्वस्वी परकीय सरकारच्या हातांत होती. राजकीय चळवळ अगदीं प्राथमिक अवस्थेंत असल्यामुळें

सत्तेच्या वांटपासाठीं निरनिराळ्या जातींत व वर्गांत रस्सीखेच होण्याचा येथें संभव नव्हता. म्हणून राजकीय हक्कांच्या प्राप्तीसाठीं नव्या वर्गांना जुन्या समाजसंस्थांवर हल्ला करावा लागला नाहीं. परकीय सरकारशीं झगडण्याच्या निमित्तानें समाजाच्या सर्व थरांतील लोक येथें एकत्र आले; आणि प्रातिनिधिकतेच्या तत्त्वाला सर्वांनींच मान्यता दिली. म्हणून राजकीय चळवळीचें तत्त्वज्ञान सर्वसंग्राहक राष्ट्रवाद हेंच राहिलें; आणि राजकीय क्षेत्रांतून व्यक्तिवादाच्या तत्त्वज्ञानाचा पुरेसा आविष्कार होऊं शकला नाहीं.

वरील कारणांमुळें या कालखंडांत व्यक्तिवादाचा झगडा हा आर्थिक व राजकीय क्षेत्रांत न होतां सामाजिक सुधारणेच्या प्रांतांत झाला. पण तेथेंहि मध्यम वर्गाकडून त्यास विशेष पाठिंबा मिळाला नाहीं. महाराष्ट्रांतील मध्यमवर्ग बव्हंशीं प्रतिष्ठित व उच्चवर्णीय होता. विद्येची मिरासदारी व सत्तेची परंपरा यामुळें समाजांतील पुढारीपण शतकानुशतक त्याच्याकडे चालत आलें होतें. इंग्रजी अमदानींत नव्या शिक्षणाचें महत्त्व त्यानेंच प्रथम ओळखलें. म्हणून नव्या युगांतहि समाजाचें धुरीणत्व बराच काळ त्याच्याकडेच राहिलें. संपत्तीच्या अभावीं नव्या जमान्यांत हें मोठेंपण कायम राहाण्याची शक्यता नसल्यामुळें जुन्या परंपरेच्या आधारानें आपलें आसन टिकवून धरण्याची त्याची प्रवृत्ति होती. म्हणून परंपरेवर निष्ठुरतेनें प्रहार करणारा आगरकरांचा बुद्धिवाद मध्यमवर्गीयांना झोंबला; व त्याच्यावर त्यांनीं एवढें वादळ उठविलें. उच्चवर्णीयांतील गतभर्तृका जर कुणबी स्त्रियांसारख्या पाट लावूं लागल्या आणि वरिष्ठ जातीचीं मुलें जर अस्पृश्यांबरोबर सहभोजन करूं लागलीं तर ते व इतर वर्ग यांत फरक कोणता राहिला असा त्यांना प्रश्न पडला. तेव्हां आपलें वैशिष्ट्य आणि वर्चस्व नाहींसें होऊं नये म्हणून जुन्या रूढि व लोकाचार यांना ते चिकटून राहिले. चिपळूणकर–टिळकांसारख्या आंग्लविद्याविभूषित पुढाऱ्यांमध्येंहि ब्राह्मण्याचा हा अभिमान वारंवार उफाळून येतो. मग त्यांची विद्वत्ता, धडाडी आणि कर्तृत्व ह्यांचा लवलेशहि नसणारे त्यांचे अनुयायी आपलें महत्त्व टिकविण्यासाठीं रूढीला शरण गेले तर त्यांत आश्चर्य काय? हा वर्ग नाराज होऊं नये म्हणूनच टिळकांनीं सुधारणेला विरोध केला; व परंपरेचीं स्तुतिस्तोत्रें गाइलीं.

आगरकर निष्ठावंत सुधारक खरे. पण सुधारणांच्या आड येणाऱ्या या मध्यमवर्गीय हितसंबंधांची त्यांनाहि नीट कल्पना आली नाहीं. म्हणून प्रतिष्ठित वर्गांवरच त्यांनीं सुधारणेसाठीं शेवटपर्यंत भिस्त ठेवली. सोवळेंओवळें, पेहराव, प्रियाराधन, केशवपन आणि पुनर्विवाह असल्या गोष्टींना त्यांनीं अवास्तव महत्त्व दिलें; आणि समाजसुधारणेपेक्षां कुटुंबसुधारणेचाच पाठपुरावा केला. समाजांतील कोणत्याच वर्गाचे हितसंबंध त्यांच्या विचारास पोषक नव्हते. वरिष्ठ वर्गांना सुधारणेची गरज नव्हती. इतर वर्गांमध्यें हें तत्त्वज्ञान आकलन करण्याइतकी अजून जागृति झाली नव्हती. त्याच सुमारास जोतिबा फुल्यांनींहि आपल्या ओबडधोबड भाषेंत बहुजनसमाजाला बुद्धिवादी विचार सांगितले. पण धार्मिक व सामाजिक 'गुलामगिरी'चे संस्कार नाहींसे करण्याच्या त्यांच्या भूमिकेचें कुणी स्वागत केलें नाहीं. त्यांच्या विचारांतील ब्राह्मणविरोध तेवढा त्यांच्या अनुयायांनीं आत्मसात् केला. जोतिरावांच्या संप्रदायास याप्रमाणें विकृत वळण लागलें, आणि आगरकरांना तर वारसदारच मिळाले नाहींत. मात्र एवढ्यावरून त्यांच्या कार्याची मौलिकता तिळमात्र कमी होत नाहीं. नव्या विचारांची स्पष्ट व असंदिग्ध स्वरूपांत मांडणी करणें हेंच सुधारणेच्या मार्गावरील प्राथमिक कार्य आहे. अपयशाची निश्चिति असतांनाहि आगरकरांनीं हें काम डोळसपणें व निःस्वार्थी वृत्तीनें पार पाडलें. म्हणूनच रानड्यांचा समन्वयवाद तरी महाराष्ट्राच्या पचनीं पडला याचें श्रेय आगरकरांच्या क्रांतिवादालाच दिलें पाहिजे. मात्र परिस्थितीच्या दडपणाखालीं आगरकरप्रणीत बहुतेक सुधारणांचा सुशिक्षितांनीं जरी अंगीकार केला, तरी त्यांच्या मागील बुद्धिवादाच्या तत्त्वांना त्यांनीं कधींच मान्यता दिली नाहीं.

## टिळकांचा जहाल राष्ट्रवाद

सुधारकांना विरोध करण्यांत राष्ट्रवादाची जोपासना करणें हाच टिळकांचा हेतु असल्यामुळें एकीकडे सुधारणेचा वाद रंगवीत असतांना दुसरीकडे राष्ट्रीय चळवळीला बळकटी आणण्याचें कार्य टिळकांनीं आरंभिलें होतें. टिळकांनीं चिपळूणकरांचीच आक्रमक, भावनाप्रधान, संस्कृतिनिष्ठ राष्ट्रवादाची परंपरा पुढें चालविली. मात्र त्यांनीं या विचारप्रवृत्तीला वास्तववादी वळण देण्याची शर्थ केली. चिपळूणकरांप्रमाणें केवळ ध्येयवादाच्या

कल्पनासृष्टींत टिळकांचें मन रमलें नाहीं. दुष्काळ, प्लेग, सरकारी जमाखर्च, चलनाची किंमत अशा प्रासंगिक गोष्टींचाच त्यांनीं आस्थेनें व तपशीलवार परामर्श घेतला. उदारमतवाद्यांप्रमाणें टिळकांचीहि प्रथम इंग्रज लोकांच्या औदार्यावर व न्यायबुद्धीवर श्रद्धा होती. इंग्रज जनतेमधील हिंदुस्थान-विषयींचें औदासीन्य व अज्ञान दूर केल्यास आपणांस हवे असलेले राजकीय हक्क तिच्याकडून मिळवितां येतील अशी त्यांची अपेक्षा होती. म्हणूनच आरंभींच्या काळांत ध्येय व धोरण या बाबतींत राष्ट्रसभेंतील अधिकारारूढ पक्षाशीं त्यांचा कोणताच मतभेद नव्हता. मात्र गुलामांची मुक्तता, अनिर्बंध व्यापार इत्यादिकांसंबंधीं विलायतेंत ज्या अनेक चळवळी झाल्या, त्यांचा इतिहास पाहतां सतत ओरड केल्याखेरीज ब्रिटिश पार्लमेंटकडून कोणतेहि हक्क मिळत नाहींत हें त्यांच्या प्रत्ययास आलें होतें. म्हणूनच 'चळवळ सतत चालू ठेवणें आणि तिचा विस्तार उत्तरोत्तर वाढवीत नेणें' या गोष्टीकडे त्यांनीं विशेष लक्ष दिलें.

कोणत्याहि राजकीय चळवळीचें यश हें मूठभर सुशिक्षितांऐवजीं सर्व-सामान्य जनतेच्या पाठिंब्यावर व प्रतिकारशक्तीवर अवलंबून असतें. म्हणूनच राष्ट्रीय चळवळीचें सामर्थ्य वाढविण्यासाठीं शेतकरी समाजाला तिच्यामध्यें सामील करून घेणें अवश्य होतें. "रयतेच्या गरजा इंग्रजलोकांपेक्षां आम्हांस अधिक चांगल्या रीतीनें कळतात हें खरें असलें, तरी तें तोंडानें सांगितल्यानें कांहीं उपयोग होत नाहीं. रयतेचीं दुःखें रयतेनेंच येऊन सभेंत सांगितलीं पाहिजेत; किंवा निदान ज्यांच्या दुःखाबद्दल सरकारशीं आम्ही दाद मागतों ते लोक असल्या सभेस हजर तरी असले पाहिजेत."‡ अशा विचारानें त्यांनीं प्रांतिक सभेंत शेतकऱ्यांना आणण्याचे, किंवा सारातहकुबीसाठीं त्यांच्या खास सभा भरविण्याचे प्रयत्न केले. उदारमतवाद्यांच्या नेतृत्वाखालीं बहुतेक सर्व चळवळी सुशिक्षित वर्गापुरत्याच मर्यादित राहिल्या होत्या. परंतु "शिकलेले लोक समाजाचे व समाजांतलेच आहेत. समाज तरला तरच ते तरणार. समाजाला सोडून त्यांचें काडीचेंहि चालावयाचें नाहीं."* हें

‡ टिळक : केसरींतील लेख, भाग १ ला, पृ. ५३६.

* कित्ता, पृ. ५७०.

टिळकांनींच प्रथम ओळखलें. म्हणून उदारमतवादी सुधारकांप्रमाणें ते सामान्य लोकांपासून फटकून राहिले नाहींत. त्यांच्या जत्रेंत व उत्सवांत त्यांनीं आपुलकीनें भाग घेतला. त्यांच्या मागासलेपणाचा व अज्ञानाचा उपहास न करतां त्यांच्याशीं खेळीमेळीनें वागण्याचा त्यांनीं अनुयायांना उपदेश केला. लोकसंग्रहाच्या दृष्टीनें राष्ट्रीय महोत्सवांचें महत्त्व टिळकांच्याच प्रथम ध्यानांत आलें. म्हणून शिवाजीचें स्मारक, सार्वजनिक गणपतिउत्सव इत्यादि उपक्रम सुरू करून अनेक जातींच्या लोकांना त्यांनीं एकत्र आणलें; आणि कीर्तन, पुराण, पोवाडा, व्याख्यान इत्यादि लोकांच्या परिचयाच्या असलेल्या सर्व साधनांचा राजकीय चळवळीच्या प्रसारासाठीं उपयोग करून घेतला. उदारमतवादी सुधारक विचारानें पुरोगामी होते. पण पोषाख, भाषा, व्यवसाय व संस्कार यांमुळें सुशिक्षित व अशिक्षित ह्यांच्यांत निर्माण झालेलें अंतर ते कापूं शकले नाहींत. वृत्तीनें आणि विचारानें टिळक लोकांच्या अधिक जवळ होते. म्हणून हें अंतर कमी करण्यावर त्यांचा कटाक्ष होता. याच अर्थानें तेल्यातांबोळ्यांचे पुढारी म्हणवून घेण्यांत त्यांना अभिमान वाटे. इनामदार, वकील आणि शिक्षक यांच्याबरोबरच व्यापारी, कारागीर आणि शेतकरी यांना राष्ट्रीय चळवळींत सामील करून घेऊन त्यांनीं तिची व्याप्ति व सामर्थ्य वाढविलें.

टिळकांची दृष्टि जरी याप्रमाणें वास्तववादी व लोकाभिमुख होती, तरी चिपळूणकरांचा भावनाप्रधान व परंपरानिष्ठ राष्ट्रवाद हाच त्यांच्या विचारसरणीचा पाया होता. हिंदु धर्माचें व्यापक तत्त्वज्ञान, भारतीय आर्यांची प्राचीन संस्कृति, रामदासांचा महाराष्ट्रधर्म आणि पेशवेकालीन मराठी साम्राज्य यांच्याबद्दलचा अभिमान जागृत करून त्यांनीं लोकांना ध्येयनिष्ठेची व लढाऊ बाण्याची शिकवण दिली. म्हणून भविष्यापेक्षां भूतकालांतून स्फूर्ति घेतल्यामुळें चिपळूणकरांच्या विचारसरणीला ज्या मर्यादा पडल्या, त्यांतून टिळकांचा राष्ट्रवादहि पूर्णपणें सुटूं शकला नाहीं. जुन्या संस्कृतीचा ज्याला अभिमान होता आणि मध्ययुगांतील सत्तेच्या उपभोगाची ज्याची स्मृति अगदी ताजी होती, अशा उच्चवर्णीय मध्यमवर्गाचेंच त्यांना पाठबळ मिळालें. हिंदु धर्म व मराठ्यांचा इतिहास यांवर वारंवार भर दिल्यामुळें मुसलमान त्यांच्या चळवळीपासून अलिप्त राहिले; आणि त्यांच्या धर्मश्रद्धेचा,

अज्ञानाचा व कडवेपणाचा गैरफायदा घेऊन जातीय दंग्यांस त्यांना प्रवृत्त करण्यास परकीय सरकार व सत्तालोलुप पुढारी यांना सवड सांपडली. दंग्याच्या उद्भवामागील सरकारची भेदनीति टिळकांनीं अचूक ओळखली. पण तिला शह देण्यासाठीं मुसलमान जनतेला राष्ट्रीय चळवळीकडे खेंचून आणणारा कोणताच कार्यक्रम त्यांनीं आंखला नाहीं. गणपति उत्सवांत किंवा शिवाजी उत्सवांत मुसलमान आपुलकीनें सामील होणें शक्य नव्हतें. म्हणून टिळकांचें आवाहन मुख्यतः हिंदूंनाच राहिलें. टिळकांची लढाऊ प्रेरणा टिळकांबरोबर नाहींशी झाली; आणि मागें उरलेल्या धर्माभिमानाच्या ह्याच वृत्तीचें अखेर जातिनिष्ठेंत पर्यवसान झालें.

हिंदूंच्या सामाजिक ऐक्याची टिळकांना खरीखुरी तळमळ होती. निरनिराळ्या जातींच्या लोकांना एकत्र आणून त्यांना सहकार्यास प्रवृत्त करणें हाच त्यांच्या महोत्सवांमागील हेतु होता. पण जातीयतेचें विष समाजाच्या रोमरोमांत भिनलें होतें. नव्या अर्थपद्धतींत निर्माण झालेल्या हितसंबंधांनीं जातीच्या या पाशांना अधिकच दृढता आली. वर्षातून चारदोन समारंभांच्या वेळीं अनेक जाती एकत्र आल्यानें त्यांच्यांतील ह्या फुटीरपणाला आळा बसणें शक्य नव्हतें. त्यासाठीं देशव्यापी आंदोलनाची व मूलगामी विचारक्रांतीची आवश्यकता होती. पण ज्या मध्यमवर्गाची नवीं मूल्यें पत्करण्याची बिलकूल तयारी नव्हती त्याच्यावर विसंबून राहून टिळकांनीं सुधारणांना विरोध केला. दुष्काळ, प्लेग यासारख्या तात्कालिक प्रश्नांवर त्यांनीं इलाज शोधले; पण मूलगामी सामाजिक दोषांची उपेक्षा केली. वर्तमानकालाचें त्यांनीं अनुसंधान राखलें; पण भविष्यकाळ त्यांच्या हातांतून निसटला. धर्मग्रंथांचें व परंपरेचें प्रस्थ त्यांनीं कायम ठेवल्यामुळें संकुचित जातीय दृष्टींतून विचार करण्याची लोकांची प्रवृत्ति अधिकच दृढमूल झाली.

## सरंजामदारी अर्थशास्त्र

राजकीय व सामाजिक घडामोडींप्रमाणें आर्थिक प्रश्नाकडेहि टिळकांचें लक्ष होतें. म्हणून 'केसरीं' तील अनेक लेखांतून शेतकऱ्यांची स्थिति, दुष्काळाचें स्वरूप, हुंडणावळीचे दर असल्या विषयांची त्यांनीं चर्चा केली

आहे. दख्खनमधील दंग्यांमुळें शेतकऱ्यांच्या प्रश्नाची निकड व गांभीर्य त्यांना जाणवलें. यासारखे प्रक्षोभक प्रकार पुढें होऊं नयेत अशी इच्छा असेल तर वेळींच सावध होऊन शेतकऱ्यांची विपन्नावस्था दूर केली पाहिजे असा त्यांनीं सरकारला व मध्यमवर्गाला इशारा दिला. हिंदी लोकांच्या आर्थिक अवनतीला मुख्यतः ब्रिटिशांची साम्राज्यशाही जबाबदार असल्यामुळें टिळकांनीं सर्व दोषांचें खापर सरकारच्या माथ्यावर फोडलें तर त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. सरकारच्या रागलोभाची पर्वा न करतां त्यांनीं नोकरशाहीच्या जुलुमी राज्यकारभारावर कडक टीका केली; आणि महाराष्ट्रांतील लोकांना आपल्या राजकीय हक्कांची जाणीव करून दिली. मात्र लोकांचीं दुःखें हलकीं करण्यासाठीं सरकारनें जेव्हां प्रयत्न केले तेव्हां टिळकांनीं विधायक दृष्टीनें सरकारशीं सहकार्य केलें. त्याचप्रमाणें आपत्तीच्या काळांत केवळ सरकारवर विसंबून न राहतां आपली सामाजिक जबाबदारी ओळखून लोकांनीं स्वतः कार्यप्रवृत्त व्हावें म्हणून त्यांनीं पुण्यामध्यें स्वस्त धान्याचीं दुकानें उघडण्यासाठीं व सोलापुरांतील विणकरांना वांचविण्यासाठीं अतोनात श्रम घेतले.

टिळकांच्या काळांत देशांत एक आर्थिक संक्रमण सुरू होतें. सन १८५० नंतर हिंदुस्थानांत कारखानदारीला नुकतीच सुरवात झाली होती. दळणवळणाच्या साधनांची वाढ होत होती. या नव्या उत्पादनसाधनांनीं देशाच्या संपत्तींत भर पडत असल्यामुळें सामाजिक सुधारणांना विरोध असूनहि व्यक्तिस्वातंत्र्य व स्पर्धा यावर आधारलेल्या या उत्पादनपद्धतीचें टिळकांनीं स्वागत केलें; आणि महाराष्ट्रांत छोटेमोठे कारखाने काढणारांस प्रोत्साहन दिलें. तरीदेखील जुन्या अर्थसंस्थेबद्दल त्यांच्या मनांत जिव्हाळा होता. ही अर्थव्यवस्था विषमतेवर आधारलेली होती. सरकारप्रमाणें येथील धनिक व वतनदार वर्गहि सामान्य लोकांच्या पिळवणुकींत सामील होते. राजकीय चळवळींत एकजूट असावी म्हणून टिळकांनीं या बाबतींत वर्गसमन्वयाची भूमिका घेतली. ज्याप्रमाणें सामाजिक क्षेत्रांत त्यांनीं सनातन्यांची वकिली केली त्याप्रमाणें आर्थिक जीवनांतहि त्यांनीं प्रायः वरिष्ठ वर्गाची कड घेतली. "रयतेच्या सर्व अरिष्टाला कारण सावकार अशी पुष्कळांची समजूत असल्यामुळें त्याची कोणाला कींव येत नाहीं; पण ही चूक

आहे. वस्तुतः सावकारावांचून रयतेचें चालावयाचेंच नाहीं. शेतीस लागणारें भांडवल तो पुरवितो; पण कर्जदार बुडाला कीं तो बुडालाच. इतकेंच नाहीं तर तें भांडवलहि पुष्कळदां त्याचें नसून त्यानें दुसऱ्या मोठ्या पेढीवरून आणलेलें असतें. शेतकरी एकादे वेळेस सुटून जातो पण तो मात्र मध्येंच बुडतो......हल्लीं सरकारच्या आचरणानें रयत व सावकार ह्यांच्यामध्यें विनाकारण द्वैतभाव उत्पन्न झाला आहे, तसा तो राहण्याचें कारण नाहीं." † असें म्हणून शेतकरी आणि सावकार यांच्यांतील तंट्याबद्दल सरकारला जबाबदार धरून सावकाराला दोषमुक्त करण्याकडे त्यांचा कल आहे. मात्र सरकारच्या भेदनीतीमुळें वर्गसमन्वयाचें हें धोरण सांभाळणें जेव्हां अशक्य झालें तेव्हां मालकी हक्कांचें समर्थन करून त्यांनीं निःशंकपणें वरिष्ठ वर्गाचीच बाजू घेतली. 'पुण्यांतील पहिल्या चिमणी'चें अभिनंदन करून कारखानदारीच्या उपक्रमास त्यांनीं आशीर्वाद दिला. पण त्याचवेळीं १८९१ च्या कामगार कायद्याबद्दल मात्र नापसंती व्यक्त केली. ¶ वास्तविक पाहतां या कायद्यानें आठवड्यांतून एक दिवसाची रजा आणि स्त्रिया व नऊ वर्षांखालील मुलें यांचें अतिश्रमापासून संरक्षण या व्यतिरिक्त कोणत्याहि सवलती मजुरांना मिळाल्या नव्हत्या. तरीदेखील टिळकांनीं कारखानदारांचा पक्ष उचलून धरला; कामगारांच्या हिताची व हक्कांची फिकीर केली नाहीं.

१८९७ मधील खोती कायद्याच्या वेळीं टिळकांनीं केसरींत सहा लेख लिहिले; आणि मोठ्या आवेशानें खोतांच्या हक्कांची तरफदारी केली. "खोत आणि कुळ यांच्या दरम्यानचे संबंध जर सनदापत्रांवरून पूर्वापार

---

† टिळक : केसरींतील लेख, भाग १ ला, पृ. ४०, ४१.

¶ "गिरण्यांतील मजुरांनीं अमुक तास काम करावें वगैरे इयत्ता ठरविण्यासाठीं जो कायदा गेल्या सालीं पास झाला आहे तोहि याच प्रकारचा आहे. या कायद्याचें तत्त्व संमति कायद्याप्रमाणेंच अगदीं थेट विलायतेहून आलें होतें. परंतु तें कोठूनहि आलें असलें तरी त्यापासून आमचें झालेलें व होणारें नुकसान कमी होत नाहीं." कित्ता, पृ. ३३.

कायम झालेले आहेत, तर त्यांत ढवळाढवळ करण्याचा सरकारास कसा अधिकार येतो हेंच आम्हांस आधीं समजत नाहीं. सरकारास सारा भरल्यानंतर खोत सरकारचें खातेदार कूळ झालें; व ज्याप्रमाणें कॉफीची लागवड करणारे लोक आपल्या हाताखालीं वाटेल तितके लोक ठेवून आपणांस पाहिजे तितकी मजुरी देतात, तसाच कायद्याचे दृष्टीनें खोताचा अधिकार आहे. कुळांकडून अर्धेल तिर्धेल घेण्याचा खोताचा जो हक्क आहे तो सरकारास कधींहि कमी करतां यावयाचा नाहीं. निदान त्या हक्काचा पूर्ण मोबदला तरी खोतास दिला पाहिजे. कुळांची स्थिति चांगली आहे कीं नाहीं हें पाहाण्याचें सरकारचें किंवा दुसऱ्या कोणाचेंहि काम नाहीं. पुण्यांत भिकार पुष्कळ आहे. म्हणून येथील सावकाराच्या घरांतील पैसे त्यांस वांटण्याचा ज्याप्रमाणें सरकारास हक्क नाहीं, त्याप्रमाणें खोती गांवांतील कुळांची स्थिति चांगली नसल्यास खोतास बुचाडून त्याच्या वसुलाची खैरात करण्याचा सरकारास अधिकार नाहीं. हा प्रश्न हक्काचा आहे; भूतदयेचा नाहीं....अर्धेलाची किंमत ठरवावयाची असल्यास ती साऱ्याच्या निदान दुप्पट तरी ठरविली पाहिजे; व कोणत्याहि कारणानें सारा वाढविल्यास त्या मानानें सदर किंमतहि वाढविण्याबद्दल त्यास शर्त असली पाहिजे ". §

मालकी हक्कांचें पावित्र्य याप्रमाणें स्वतःसिद्ध मानून परकीय सरकारच्या हल्ल्यांपासून त्यांचा बचाव करण्याची खटपट टिळकांनीं आरंभिली होती. पण या प्रश्नाच्या दुसऱ्या बाजूकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं. रत्नागिरी जिल्ह्यांतील शेतकरी म्हणजे शतकानुशतकें दारिद्र्यानें भरडून निघालेला. नापीक जमीन आणि वाढती लोकसंख्या यामुळें तेथें शेतीवर श्रमाच्या मजुरीइतकेंहि उत्पन्न मिळणें कठीण. अशा स्थितींत साऱ्याबरोबर अर्धेलीची किंमतहि वाढविलीच पाहिजे असें प्रतिपादन करतांना टिळकांना शेतकऱ्याच्या भवितव्याचा विचार देखील करावासा वाटला नाहीं ही मोठी खेदाची आणि आश्चर्याची गोष्ट आहे. भांडवलदारवर्ग त्याकाळीं उत्पादनाचीं नवीं साधनें योजून देशाच्या संपत्तींत भर घालीत होता. म्हणून विचारवंतांनीं त्याची बाजू घेतली तर तें एक वेळ क्षम्य मानतां येईल. पण संस्थानिक, सावकार, खोत

§ टिळक : केसरींतील लेख, भाग २ रा, पृ. ६१९, ६२२.

हे सर्व जुने सरंजामदारी वर्ग होते. राष्ट्राच्या भावी उत्कर्षांत त्यांना कोणताहि कार्यभाग नव्हता. उलट श्रमिकांच्या घामांतून निर्माण झालेल्या संपत्तीचा मोठा हिस्सा शोषून घेत असल्यामुळें लोकांच्या दारिद्र्यांत ते भर घालीत होते. कूळकायदा, कर्जनिवारण कायदा यांचीं बंधनें त्यांच्यावर घालण्यास रानड्यांनीं आपली संमति दिली. पण रानड्यांपेक्षां लोकमताची अधिक मातब्बरी वाटत असूनहि टिळकांना व्यापक भूमिका घेतां आली नाहीं. म्हणून त्यांच्या देशभक्तीबद्दल व स्वार्थत्यागाबद्दल लोकांच्या मनांत जरी नितांत आदर होता, तरी सर्वसामान्य जनतेचा पाठिंबा मिळवून देशव्यापी चळवळ उभारण्यास लागणारें सामर्थ्य त्यांच्या पक्षास कधींच प्राप्त झालें नाहीं.

## राष्ट्रवाद आणि व्यक्तिवाद

टिळकांच्या विचारसरणींतील लोकाभिमुखता आणि सुधारणाविरोध यांमधील ही विसंगति तत्कालीन परिस्थितींतून निर्माण झाली आहे. युरोपमध्यें राष्ट्रवाद आणि व्यक्तिवाद या दोन्ही विचारसरणी एकदमच जन्मास आल्या आणि त्या एकमेकांस पोषक ठरल्या. सामाजिक विषमतेवर प्रहार करून व्यक्तिवादानें राष्ट्रीय ऐक्याची पार्श्वभूमि तयार केली; आणि लोकांना सामाजिक हक्कांची जाणीव करून देऊन त्यासाठीं झगडण्यास प्रवृत्त केलें. लहान लहान सरंजामदारांच्या फुटीरपणाला पायबंद घालून केंद्रीभूत शासनसंस्था निर्माण करण्याचा राष्ट्रवाद्यांचा प्रयत्न चालला होता. त्यामुळें व्यक्तीच्या कर्तृत्वाला व्यापक क्षेत्र मिळालें. म्हणूनच व्यक्तीचें स्वातंत्र्य आणि हक्क व राष्ट्राचें सार्वभौमत्व व स्वयंनिर्णय यांजवर युरोपीय विचारवंतांनीं एकदमच भर दिलेला आपणांस आढळून येतो. आर्थिक भरभराटीच्या ह्या काळांत व्यक्तीचा स्वार्थ आणि राष्ट्राचें हित यामध्यें त्यांना विरोध भासला नाहीं. उलट राष्ट्राला आर्थिक दृष्ट्या संपन्न करण्यासाठीं व्यक्तीच्या सुसंस्कृत स्वार्थप्रवृत्तीला वाव देणें जरूर आहे अशीच विचारसरणी तेथें सर्वत्र प्रसृत झाली. इंग्रज तत्त्वज्ञांच्या प्रभावामुळें हिंदुस्थानांतील विचारवंतांनींहि राष्ट्र व व्यक्ति हीं दोन्हीं मूल्यें एकदमच उचललीं. पण सामाजिक बाबतींत इंग्रजांचें अनुकरण करतांना राजकीय स्वातंत्र्यासाठीं त्यांच्याशीं झगडण्याची येथें आवश्यकता होती. हिंदुस्थानच्या लोकांना सुधारणेचे पाठ देण्यासाठींच फक्त

आपण साम्राज्याचें हें ओझें वहात आहोंत असा आव आणून इंग्रज आपल्या साम्राज्यवादाचे गोडवे गात होते. त्यामुळें त्यांचें सांस्कृतिक श्रेष्ठत्व मान्य केल्यास येथील जनतेंत न्यूनगंड निर्माण होण्याची भीति होती. इंग्रजांच्या सामाजिक संस्थांचें अनुकरण आणि त्यांच्या आर्थिक पिळणुकीला व राजकीय वर्चस्वाला विरोध या दोहोंचीहि मध्यमवर्गाला सारखीच आवश्यकता भासत होती. पण व्यक्तिवाद व राष्ट्रवाद यांचा त्यांना मेळ घालतां आला नाहीं. रानडे-गोखले यांच्यासारख्या ज्या विचारवंतांनीं सुधारणावादी मूल्यें निःसंकोचपणें पत्करलीं त्यांचा इंग्रजविरोध पुष्कळदां मिळमिळीत ठरला. उदारमतवादी इंग्रज तत्त्वज्ञांच्या लिखाणावर भिस्त ठेवून राजकीय बाबतींतहि इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या हितसंबंधांत विरोध नाहीं अशी त्यांनीं आपली समजूत करून घेतली. उलट इंग्रजांच्या पिळवणुकीवर ज्यांनीं सतत बोट ठेवलें त्यांनीं लोकांचा स्वाभिमान जागृत करण्यासाठीं हिंदुस्थानांतील सामाजिक संस्थांचा अवास्तव गौरव केला; व त्यांच्यामध्यें मूलगामी बदल करण्याच्या चळवळीवर मुळांतच घाव घातला. मात्र राष्ट्रवाद व व्यक्तिवाद हे सकृद्दर्शनीं परस्परविरोधी भासले तरी वस्तुतः परस्परावलंबीच होते. राजकीय चळवळींतूनच जनतेला आपल्या सामाजिक हक्कांची जाणीव होत होती. आणि तिच्या आकांक्षांना वाव दिल्याशिवाय स्वातंत्र्यचळवळीला तिचा पाठिंबा मिळणें शक्य नव्हतें. म्हणून लोकशाही, स्पर्धा इत्यादि मूल्यें राष्ट्रवाद्यांनाहि शेवटीं पत्करावीं लागलीं. रानड्यांनीं आपल्या स्वभावानुसार हळुहळू व सावकाश बदलाचा मार्ग दाखवून परंपरावादाशीं व्यक्तिवादाची सांगड घातली. टिळकांनीं वर्णव्यवस्थेला श्रमविभागणीच्या तत्त्वाचा आधार होता, खोतीच्या पाठीशीं मालकी हक्कांची आधुनिक कल्पना होती असें प्रतिपादन करून जुन्या संस्थांचें पुनरुज्जीवन करण्याच्या निमित्तानें नव्या तत्त्वांचा स्वीकार केला. सामाजिक प्रगतीची ज्यांना इच्छा होती त्यापैकीं कोणालाहि व्यक्तिवादी मूल्यें सर्वस्वी नाकारतां आलीं नाहींत. मात्र आपल्या मनोवृत्तीस व हितसंबंधास मानवेल इतक्याच प्रमाणांत मध्यमवर्गानें त्यांचा स्वीकार केला. महायुद्धानंतर नवे वर्ग ज्यावेळीं राजकीय चळवळींत आघाडीवर आले तेव्हांच सुधारणावाद आणि राष्ट्रवाद यांच्यांतील हा विरोध पुष्कळसा निवळला.

१८९६ व १८९७ सालीं दुष्काळ व प्लेग या दोन संकटांनीं महाराष्ट्रीयांना पुन्हां बेजार केलें. दुष्काळाच्या काळांत सारातहकुबी, दुष्काळी कामें, सरकारी बंगलांचा वापर याविषयींचे नियम दुष्काळकायद्याच्या रूपानें सरकारनें प्रसिद्ध केले होते. टिळकांच्या प्रेरणेनें 'सार्वजनिक सभे' नें ह्या दिवसांत ठिकठिकाणीं आपले प्रतिनिधि पाठवून हे नियम लोकांना समजावून सांगितले; आणि आपल्या गाऱ्हाण्यांची कायदेशीर रीतीनें दाद मागण्यास त्यांना प्रवृत्त केलें. पण या विधायक कार्यामध्येंहि सरकारी अधिकाऱ्यांचें टिळकांना सहकार्य मिळालें नाहीं. प्लेगच्या साथीचा प्रसार होऊं नये म्हणून मुंबई सरकारनें बरेच कडक उपाय योजले होते. पण ते अंमलांत आणतांना लोकांच्या भावनेची व सोयीगैरसोयीची यत्किंचितहि पर्वा केली नाहीं. प्लेगच्या निमित्तानें झालेल्या या अत्याचारांनीं कांहीं धाडसी तरुणांचें पित्त खवळलें. जुलुमी अधिकाऱ्यांना शासन करण्यास सरकार कबूल नाहीं असें दिसून येतांच जनतेच्या वतीनें त्यांना धडा देण्यासाठीं चाफेकर बंधूंनीं रँड व आयर्स्ट यांचा वध केला. या खुनानें सरकारी अधिकाऱ्यांचीं माथीं भडकून गेलीं; व गुन्ह्याचा तपास लावण्यासाठीं त्यांनीं पुण्यावर जादा पोलीस बसविले. या सर्व प्रकाराचा टिळकांनीं 'केसरी'तून तीव्र निषेध केला आणि सरकारी अधिकाऱ्यांची कानउघाडणी केली. पण त्याचा अगदीं विपरीत परिणाम होऊन सरकारनें त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरला. या खटल्याच्या वेळीं सारा हिंदुस्थान टिळकांच्या पाठीशीं उभा राहिला. सरकार व प्रजा यांच्यांतील अंतर अशा रीतीनें वाढत गेल्यामुळें मवाळ पक्ष हळुहळू निस्तेज होऊं लागला; आणि टिळकांनीं दाखविलेला स्वाभिमान व बाणेदारपणा ह्यांच्यामुळें त्यांच्या जहाल संप्रदायाचें वजन वाढूं लागलें.



: ४ :

# स्वातंत्र्य आणि लोकशाही

**आ**गरकर आणि रानडे यांच्या मृत्यूनंतर साहजिकच समाजसुधारकांची बाजू कमजोर झाली. उलट बदलत्या परिस्थितीबरोबर राजकीय सुधारणावाद्यांचा पक्ष उत्तरोत्तर वरचढ होत गेला. पुढारलेल्या वर्गांची सार्वत्रिक कुचंबणा आणि बहुजनसमाजाचें वाढतें दारिद्र्य दूर करण्याच्या दृष्टीनें राजकीय चळवळीवर सर्व लक्ष केंद्रित करण्याखेरीज गत्यंतर नाहीं, याबद्दल नेमस्त व जहाल अशा दोन्ही पक्षांची खात्री पटली. त्यामुळें गोखल्यांसारख्या रानडे संप्रदायांतील प्रमुख कार्यकर्त्यानें राजकारणांतच आपलें शक्तिसर्वस्व वेंचलें. आगरकरांची मूलगामी व क्रांतिकारक विचारसरणी तर महाराष्ट्राला पटली नाहींच; पण रानड्यांच्या सर्वंकष उदारमतवादाचेंहि त्याला यथार्थत्वानें आकलन झालें नाहीं. लोकांचे विचार बदलोत वा न बदलोत, काल कांहीं त्यासाठीं कधीं अडून रहात नाहीं. म्हणून पुराणमताभिमान्यांनाहि दैनंदिन व्यवहारांत अनेक नव्या गोष्टींचा स्वीकार करावा लागला. केव्हां आपद्धर्म म्हणून या वागणुकीचें त्यांनीं समर्थन केलें; केव्हां प्राचीन ग्रंथांतील आधार देऊन जुन्या परंपरेचेंच आपण पुनरुज्जीवन करीत आहोंत असें समाधान मानून घेतलें. पण मूलतत्त्वांची चिकित्सा

करण्याचें मात्र त्यांनीं कटाक्षानें टाळलें. त्यामुळें विसाव्या शतकाच्या प्रारंभीं सुधारक व दुर्धारक यांचीं भांडणें मागें पडून राष्ट्रीय आणि प्रागतिक, जहाल आणि मवाळ यांच्यांतील झगड्यास प्रारंभ झाला. रानड्यांच्या काळांत सुशिक्षितांतील प्राथमिक लोकजागृतीचें कार्य संपलें होतें. राष्ट्रसभेच्या पंधरा वर्षांच्या प्रयत्नानें पुढारलेल्या वर्गांत एकराष्ट्रीयत्वाची जाणीव निमाण होऊं लागली होती. दुष्काळ, प्लेग वगैरे आपत्तींमुळें हैराण झालेल्या लोकांना ब्रिटीश राजवटींतील जुलूम व बेजबाबदारपणा तीव्रतेनें जाणवला. चाफेकरबंधूंना झालेली फांशीची शिक्षा व टिळकांवरील राजद्रोहाचा खटला यांमुळें प्रस्थापित सरकारकडून न्याय व औदार्य यांची अपेक्षा करणें यापुढें व्यर्थ आहे अशी त्यांची भावना झाली. बंगालच्या फाळणीनें या असंतोषांत अधिकच भर पडली, आणि देशांतील राजकारणाचा ओघ स्वाभाविकपणेंच चर्चेची सरहद्द ओलांडून चळवळीच्या दिशेनें वाहूं लागला. या चळवळीचें ध्येय आणि धोरण, तंत्र आणि साधना, आशय आणि मर्यादा इत्यादि प्रश्नांना आतां विशेष महत्त्व प्राप्त झालें. ह्या बाबतींतील मतभेदांतून महाराष्ट्रांत टिळक आणि गोखले यांचे दोन भिन्न संप्रदाय अस्तित्वांत आले. सुट्यासुट्या हक्कांची फुटकळ मागणी करीत न बसतां सबंध राज्यकारभारांतील भागीदारीचाच दोघांनीं आग्रह धरला, व न्याय्य आणि कायदेशीर मार्गांनीं ती हस्तगत करण्यास लोकांस प्रवृत्त केलें. कर्झनशाहींतील अत्याचारांनीं ही स्वातंत्र्यलालसा अधिकच बळावली; आणि बंगाल व महाराष्ट्र या प्रांतांत स्वदेशी व बहिष्कार यांच्या चळवळीला जोर चढला. या चळवळीचें विश्लेषण, पुरस्कार आणि प्रचार करीत असतांनाच टिळकांना लोकमताच्या सामर्थ्याचा साक्षात्कार झाला. म्हणून राजकीय चळवळीचें तोंड सरकारकडून जनतेकडे वळविण्याचा त्यांनीं चंग बांधला; आणि नेमस्तांना नामोहरम करून स्वातंत्र्य व लोकशाही या तत्त्वांचे ते हिंदुस्थानांतील आद्य प्रणेते बनले.

## साम्राज्यवादाचा उदय

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस आंतरराष्ट्रीय परिस्थितींतहि झपाट्यानें फरक पडूं लागला. जर्मनी, फ्रान्स, अमेरिका, जपान इत्यादि नवोदित राष्ट्रांनीं औद्योगिक क्षेत्रांत वेगानें प्रगति केली; आणि जागतिक बाजारपेठा

काबीज करण्यासाठीं त्यांच्यामध्यें चढाओढ सुरू झाली. आर्थिक हित-संबंधांसाठीं लष्करी सत्तेचा उपयोग करण्याच्या साम्राज्यवादी धोरणाचा अवलंब करून त्यांनीं आफ्रिका खंडाचे तुकडे पाडले, आग्नेय आशियांतील लहानमोठीं राष्ट्रें गिळंकृत केलीं; चीनमध्यें व्यापाराला सवलती मिळविण्यासाठीं तेथील सरकारवर दडपण आणलें; इतकेंच नव्हे तर पश्चिम आशियांतील ओसाड देशहि युरोपीय राष्ट्रांच्या आशाळभूत नजरेंतून निसटले नाहींत. जुन्या वसाहती सुरक्षित राखण्याच्या आणि नव्या काबीज करण्याच्या या चढाओढींतूनच पहिल्या महायुद्धाचीं बीजें पेरलीं गेलीं.

साम्राज्यवादाच्या उत्कर्षाबरोबर इंग्लंडमधील लिबरल पक्षाचा अस्त होऊन कॉंझरवेटिव्ह पक्षाचा करडा अंमल ब्रिटिश साम्राज्यावर सुरू झाला. युरोपांतील स्वातंत्र्यलढ्यांपासून स्फूर्ति घेऊन हिंदुस्थानहि आपल्या कचाट्यांतून बाहेर पडेल कीं काय अशी धास्ती वाटून साम्राज्यवाद्यांनीं हिंदुस्थानांत अतिशय प्रतिगामी धोरण अंगिकारलें. कर्झननें आपल्या सुलतानी कारकीर्दींत वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी केली, युनिव्हर्सिट्यांवर दडपण आणलें, रिपननें दिलेले स्थानिक स्वराज्याचे हक्क हिरावून घेतले; आणि बंगालची फाळणी करून राष्ट्रवाद्यांची शक्ति खची करण्याचें कारस्थान रचलें. परंतु या दडपशाहीनें स्वदेशाभिमानाची ऊर्मि अधिकच उफाळून आली; आणि लोकांतील असंतोष परमावधीला जाऊन पोहोंचला.

तत्कालीन आर्थिक परिस्थितिहि या असंतोषास पोषकच होती. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं लागोपाठ पडलेल्या दोन दुष्काळांनीं हिंदी जनतेला ग्रासून टाकलें; आणि आधींच संथपणें पडणारें शेतींतील प्रगतीचें पाऊल कायमचें कुंठित झालें. † विशेषतः १९०० सालीं पडलेल्या दुष्काळांत गुराढोरांची जी हानि झाली त्यामुळें लागवडीखालीं असलेली जमीन कमी करणें बऱ्याच शेतकऱ्यांना भाग पडलें. लहान शेतकरी व शेतमजूर यांच्यावर शेतींतील या मंदीचा फार परिणाम झाला; आणि खेड्यांकडून शहराकडे वळणाऱ्या लोकसंख्येंत अतोनात वाढ झाली.

---

† D. R. Gadgil : *The Industrial Evolution of India*, p. 95.

पण १९०३ सालानंतर वस्तूंच्या किंमती वाढूं लागल्यामुळें शहरांत येऊनहि ह्या लोकांची परिस्थिति सुधारली नाहीं.

शहरांत राहणाऱ्या नोकरपेशा मध्यमवर्गीयांनाहि या भाववाढीचा बराचसा जाच सहन करावा लागला. महागाईच्या काळांत आवश्यक गरजा भागविण्यास त्यांचें उत्पन्न कमी पडूं लागलें. ही आर्थिक झळ लागतांच त्यांच्या राजनिष्ठेला हादरा बसला व स्वराज्याच्या चळवळीबद्दल त्यांना आपुलकी वाटूं लागली. समाजाच्या त्या अवस्थेंत हिंदुस्थानांत विशेषतः बंगाल व महाराष्ट्र ह्या दोन प्रांतांत हा वर्गच तेवढा सुसंघटित होता. विद्यालयें, व्याख्यानें व वर्तमानपत्रें हीं त्याच्या राजकीय प्रचाराचीं साधनें होतीं. म्हणून सरकारनें प्रथम त्याच्याविरुद्ध शस्त्र उचललें. त्या दडपशाहींतून टिकून राहण्यासाठीं मध्यमवर्गानें जो प्रयत्न व प्रतिकार केला, त्यांतून राष्ट्रीय चळवळीला नवें तेज चढलें.

भांडवलदार व व्यापारी ह्यांना नवें शतक लाभदायक होतें. रशिया व जपान यांच्यांतील युद्धामुळें आंतरराष्ट्रीय बाजारांत तेजी येत होती. हिंदुस्थानांतहि कापडाचें उत्पादन वाढूं लागलें. पोलादाचे कारखाने सुरू करण्यांत आले. त्याबरोबरच सरकारवर दडपण आणण्यासाठीं अधिक संघटित प्रयत्नांची आवश्यकता आहे हें भांडवलदारांना कळून चुकलें. १९०७ सालीं मुंबईत ‘ हिंदी व्यापारी संघाची ’ स्थापना झाली. औद्योगिक परिषदांना आतां महत्त्व येऊं लागलें. तत्कालीन स्वदेशी चळवळ म्हणजे आर्थिक वर्चस्वामुळें भावी राजकारणावर पडणाऱ्या भांडवलदार वर्गाच्या प्रभावाची पूर्वसूचना होय. विगाव्या शतकाच्या आधीं सार्वजनिक काकांसारख्या कांहीं लोकांनीं स्वदेशीचें व्रत पत्करलें असलें, तरी त्याचें स्वरूप केवळ वैयक्तिक व भावनात्मकच होतें. १९०५ च्या सुमारास उद्योगधंद्याच्या प्रश्नाकडे राष्ट्रवाद्यांचें अधिकाधिक लक्ष जाऊं लागलें; आणि तेव्हांपासून आतांपर्यंत स्वदेशी हें राष्ट्रवादी चळवळीचें प्रमुख अंग होऊन राहिलें आहे. रशिया व जपान यांच्यांतील तहानंतर आर्थिक मंदीचा काळ आला. त्यावेळीं बहिष्काराच्या चळवळीचा भांडवलदारांनीं स्वतःच्या फायद्यासाठीं उपयोग करून घेतला. तरीहि आपल्या सामर्थ्याबद्दल हा वर्ग अजून साशंक होता.

त्यामुळें प्रतिकारवादाला उघड सहानुभूति दाखविण्याची त्याची तयारी नव्हती. १९०८ नंतर युद्धाचे वारे वाहूं लागले; आणि १९१४ मध्यें महायुद्धाची आग भडकली. सरकारची मदत नसूनहि भांडवलदारांनीं युद्धकालीन परिस्थितीचा भरपूर फायदा उठविला; आणि महायुद्धानंतर तर हा वर्ग इतका प्रबल व संघटित झाला, कीं राष्ट्रवादी चळवळीचें नेतृत्व आपोआप त्याच्याकडे चालत आलें. युद्धाच्या अखेरपर्यंत मात्र हिंदी राजकारणाचीं सूत्रें मध्यमवर्गाच्याच हातांत होतीं.

## पूर्व आणि पश्चिम

युरोपीय राष्ट्रांच्या आक्रमणाखालीं चिरडल्या जाणाऱ्या लोकांच्या मनांत प्रतिकाराची भावना निर्माण होणें स्वाभाविक होतें. पण त्यांच्या साम्राज्यवादाचें वास्तविक स्वरूप ध्यानांत न आल्यानें या हितविरोधाला काळ्यागोऱ्यांच्या व पूर्वपश्चिमेच्या विरोधाचें विपर्यस्त स्वरूप प्राप्त झालें. इटलीच्या ॲबिसिनियांतील पराभवानें काळ्या लोकांच्या मनाला पहिल्यानेंच स्वाभिमानाचे अंकुर फुटले. रशियाला युद्धांत नामोहरम करून जपाननें जणूं काय आशियांतील लोकांच्या पराभवाचा सूड घेतला; आणि पौरस्त्यांवरील जन्मजात नामर्दपणाचा आरोप खोडून काढला अशी त्यांची भावना झाली. प्रत्यक्ष रणांगणावर देखील आपण पाश्चिमात्यांचा पराभव करूं शकूं असा विश्वास या विजयामधून येथील राष्ट्रवाद्यांच्या मनांत निर्माण झाला. साहजिकच त्यांचें लक्ष इतर देशांच्या स्वातंत्र्यचळवळींकडे गेलें. इटली व आयर्लंड यांच्या स्वातंत्र्यलढ्याचें त्यांनीं गौरवपूर्वक परिशीलन केलें; तेव्हां सशस्त्र क्रांतीचें एक नवें तंत्र त्यांना तेथें आढळून आलें. येथील ध्येयवादी तरुणांना या क्रांतितंत्राचें विलक्षण आकर्षण वाटलें; आणि त्याच्या अनुकरणांतून भारतीय दहशतवादाचा जन्म झाला. तसेंच युरोपांतील जनतेनें समाजवाद्यांच्या नेतृत्वाखालीं जुलुमी राज्यकर्त्यांविरुद्ध वेळोवेळीं जे उठाव केले, त्यांवरूनहि सामान्य जनतेच्या संघटित प्रतिकाराची अद्भुत किमया हिंदी राष्ट्रवाद्यांना दिसून आली; आणि अजविनवण्यांचा मार्ग सोडून देऊन जनतेंतील प्रतिकारशक्ति जागृत करण्यासाठीं त्यांनीं कंबर कसली.

## ‘ अभिनव भारत ’

सरकारची बेजबाबदार राज्यपद्धति आणि हिंदी लोकमताला कस्पटासमान लेखण्याची अधिकाऱ्यांची अरेरावी वृत्ति यांची प्रतिक्रिया म्हणून हिंदुस्थानांत दहशतवादी क्रांतिकारक राजकारणाचा फैलाव झाला. कर्झनच्या कारकीर्दीतील दडपशाहीनें लोकांचीं मनें प्रक्षुब्ध झालीं होतीं. दादाभाई-गोखल्यांसारखे सनदशीर प्रवृत्तीचे विवेकशील पुढारीहि सरकारचा निषेध करीत होते. मग भावनाप्रधान तरुणांचीं मनें सूडाच्या भावनेनें संतप्त झाल्यास काय नवल ? राजकीय हक्क मिळविण्याचा राष्ट्रसभेचा मार्ग त्यांना निष्फळ, मिळमिळीत व मानहानीकारक वाटला. सशस्त्र प्रतिकाराशिवाय कोणतीच राज्यक्रांति सफल होत नाहीं अशी युरोपीय इतिहासाच्या अध्ययनानें त्यांची खात्री झाली होती. म्हणून परकीय राजसत्तेचें जोखड झुगारून देण्यासाठीं सशस्त्र उठावणीचा मार्ग न्याय्य व क्रमप्राप्त आहे असें त्यांच्या मनानें घेतलें. १८५७ सालीं राणी लक्ष्मीबाई, नानासाहेब पेशवे इत्यादिकांनीं समरांगणावर इंग्रजांशीं निकराचा सामना दिला. त्यानंतर वासुदेव बळवंतानें रामोशांच्या साहाय्यानें इंग्रजांच्या सत्तेला महाराष्ट्रीयांच्या प्रतिकारबुद्धीची थोडी चुणूक दाखविली. प्लेग काळांतील जुलुमी अधिकाऱ्यांना जनतेच्या वतीनें दहशत बसविण्यासाठीं चाफेकरबंधूंनीं रँड व आयर्स्टचा वध केला. हे सर्व अलीकडील प्रयत्न आणि त्यापेक्षांहि अभिमानास्पद असा मराठ्यांचा पूर्वेतिहास यांपासून स्फूर्ति घेऊन सशस्त्र क्रांतीच्या प्रेरणेनें सावरकरांनीं नाशिक येथें १९०४ सालीं ‘ अभिनव भारत ’ या संस्थेची स्थापना केली. पांचदहा वर्षांतच पुणें, मुंबई, सातारा, नगर, सोलापूर, धुळें, कोल्हापूर, इंदूर, ग्वाल्हेर इत्यादि ठिकाणीं या संस्थेच्या शाखा निघाल्या; आणि महाराष्ट्रांतील अनेक ध्येयवादी तरुण त्यांत सामील झाले. सावरकरबंधू, म्हसकर, पागे, गोविंदकवि, भट, बापट, कर्वे, पाटणकर इत्यादि कार्यकर्ते सावरकरांच्या मूळ कल्पनेला साथ देण्यास पुढें आले. संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय त्यांनीं आपल्या डोळ्यांसमोर ठेवलें होतें; व त्याच्या सिद्धीसाठीं ‘ तरुण इटली ’च्या धर्तीवर महाराष्ट्रांत गुप्त मंडळ्यांचें जाळें विणण्याची त्यांची मनीषा होती. त्यांच्यापैकीं कांहींजणांनीं परदेशांत जाऊन नेमबाजीचें शिक्षण

घेतलें; व पिस्तुल मिळविण्याची तजवीज केली. शिवाय युरोपांतील क्रांतिकारकांशीं संधान बांधून बाँब तयार करण्याची विद्या त्यांनीं अवगत करून घेतली; आणि जरूर तें साहित्य जमा करून त्यांनीं येथें कांहीं ठिकाणीं बाँब तयार करण्याचे प्रयोग केले. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाच्या धर्तीवर पण युरोपमध्यें प्रसृत झालेल्या नव्या क्रांतितंत्राप्रमाणें सर्व देशभर सशस्त्र बंडाची आकस्मिक व एकदम उठावणी करून ब्रिटिशांना हांकून लावण्याची व आपलें गेलेलें स्वातंत्र्य परत मिळविण्याची त्यांची धडपड होती.

या क्रांतिकारकांचें ध्येय उज्ज्वल होतें; त्यांची स्वातंत्र्यलालसा उत्कट होती. कांहींतरी 'अचाट पुरुषार्थ' ¶ करून देशहित साधण्याची त्यांना महत्त्वाकांक्षा होती. त्यांचें हें शौर्य आणि साहस, धैर्य आणि धडाडी, आत्मप्रत्यय आणि प्रतिकारक्षमता हीं शंभर वर्षांच्या इंग्रजी अमदानीमुळें मृतकल्प झालेल्या भारतांत अपूर्व होतीं यांत शंका नाहीं. जुलमी अधिकाऱ्यांना वचक बसवून त्यांनीं समाजाच्या स्वाभिमानाचें संरक्षण केलें; आणि परतंत्र भारतांतील तेजस्विता अजूनहि साफ लोपलेली नाहीं याची जगाला साक्ष पटविली. म्हणूनच खुनी म्हणून फांसावर लटकलेल्या ह्या क्रांतिवीरांना हुतात्मे म्हणून जनतेच्या हृदयांत मानाचें स्थान मिळालें.

मात्र इतके कष्ट व हाल सोसून आणि अनेक होतकरू व कर्तबगार व्यक्तींचें बलिदान करूनहि ध्येयाच्या मार्गावर त्यांची फारशी प्रगति झाली नाहीं; आणि ब्रिटिश राज्ययंत्र खिळखिळें करण्यांत त्यांना यत्किंचितहि यश आलें नाहीं. याचें कारण क्रांतीचें जें तंत्र त्यांनीं युरोपीय क्रांतिकारकांपासून उचललें, तें तेथील परिस्थितीला स्वतंत्रपणें लागू करणें त्यांना जमलें नाहीं. युरोपांतील देश लहान; त्यांचीं आपापसांत भांडणें फार. त्यामुळें एका देशांतील क्रांतिकारक चळवळीला दुसऱ्या देशांकडून सहज मदत मिळे, व पुरेसा शस्त्रपुरवठा होई. हिंदुस्थानची परिस्थितिच निराळी. देश विस्तारलेला, जनता अज्ञानी व निःशस्त्र, सभोंवतीं पहाडांचा व सागराचा

¶ " निजराष्ट्राच्या स्वहितार्थ । जो अचाट करि पुरुषार्थ । पुरुष तो ।" स्वातंत्र्यकवि गोविंद यांची कविता, पृ. १७.

खडा पहारा; आजुबाजूचे देश मागासलले व ब्रिटिशांचे अंकित. अशा स्थितींत इतर देशांतून आणलेल्या पांचपन्नास पिस्तुलांच्या जोरावर येथें सशस्त्र क्रांति यशस्वी होणें शक्य नव्हतें. पण क्रांतिकारकांनीं ही भाबडी आशा धरली. शस्त्रसामुग्री जमा करण्याच्या उद्देशानें ते परदेशांत जाऊन बसले; आणि परिणामीं येथील अंतर्गत चळवळीपासून दूर राहिले. त्यामुळें तिच्यावर त्यांचा मुळींच प्रभाव पडूं शकला नाहीं.

## देश आणि धर्म

सावरकरांनीं आपल्या क्रांतिकारक राजकारणाची बांधणी करतांना इटालींतील प्रसिद्ध क्रांतिकारक जोसेफ मॅझिनी ह्यांचा आदर्श प्रमाण मानला होता. पण "मोठाल्या राज्यक्रान्त्या ह्या तत्त्वांनींच घडवून आणलेल्या असतात" § ह्या मॅझिनीप्रणीत विचारसूत्राचा समग्र आशय त्यांनीं आत्मसात् केला नाहीं. सशस्त्र बंडाच्या मार्गानें परकीयांना इटालींतून हांकून लावण्याचा मॅझिनींचा प्रयत्न चालला होता खरा; पण "क्रांति ही जनपदांकडून जनपदांसाठींच केली गेली पाहिजे" ‡ या लोकशाहीच्या मूलतत्त्वांवर त्यांची मनोमय श्रद्धा होती. "क्रांतीची उठावणी बहुजनसमाजानेंच केली पाहिजे. थोर लोक व शिपाई मागाहून मिळतात." ¶ क्रांतिकारकांना सुरवातीपासून त्यांच्यावर अवलंबून राहातां येणार नाहीं याची त्यांना जाणीव होती. म्हणून बंडाची हांक देण्यापूर्वी त्यांनीं लोकशिक्षणाचें कार्य हातीं घतलें. त्यांच्या कार्यपद्धतींत "प्रथम मनःप्रवर्तन व नंतर उठावणी" † हाच क्रम अनुस्यूत होता. क्रांति म्हणजे एकाद्या विशिष्ट वर्गानें केवळ सत्तासंपादनासाठीं केलेला उठाव नव्हे; तर सबंध जनतेच्या नैतिक, बौद्धिक व भौतिक प्रगतीस पोषक होणाऱ्या एकाद्या नव्या तत्त्वज्ञानाचा तो आविष्कार होय अशा समजुतीनें त्यांनीं आधीं आपल्या

---

§ वि. दा. सावरकर : जोसेफ मॅझिनी : आत्मचरित्र नि राजकारण, पृ. ८४.

‡ कित्ता, पृ. ९१. ¶ कित्ता, पृ. ६३. † कित्ता, पृ. ७९.

देशांतील क्रांतिकारक प्रवृत्तीला व्यापक व खंबीर तत्त्वज्ञानाची जोड दिली. ¶ त्यांचा जीवनविषयक दृष्टिकोन मानवतावादी व जनताभिमुख होता. त्यांच्या लेखांतून नेहमींच त्यांनीं धार्मिक, सामाजिक व राजकीय समतेचा पुरस्कार केला आहे. धर्म आणि राजकारण ह्यांच्या ऐक्याची जरी त्यांनीं पुनःपुन्हा घोषणा केली असली, तरी मध्ययुगांतील जीर्ण व प्रतिगामी मूल्यांवर ताशेरे ओढण्यास त्यांनीं कधींच कमी केलें नाहीं. औद्योगिक क्रांतीनंतर युरोपमध्यें दिसून येणारी द्रव्यलालसा आणि सुखासीनता पाहून ते जडवादाकडून अध्यात्मवादाकडे वळले. तरी देखील स्वातंत्र्य, समता, लोकशाही इत्यादि आधुनिक मूल्यांचा पाठपुरावा करून त्यांनीं सामाजिक जीवनांतील विशिष्टाधिकारांना कसून विरोध केला. पोप आणि राजा, संस्थानिक आणि पुरोहित या वर्गांकडे त्यांनीं पाठ फिरविली; आणि नव्या परिस्थितींत नवीं माणसें निर्माण करण्याचें धोरण ठेवलें. §

आपल्याकडील क्रांतिकारक मात्र मध्ययुगीन विचारसरणींतून कधींच बाहेर पडले नाहींत. मॅझिनींचें संघटनाचातुर्य व गुप्तकार्यपद्धति ह्यांची त्यांना मोहिनी पडली. पण त्यांच्या तत्त्वज्ञानाची मात्र त्यांनीं उपेक्षा केली. येथील क्रांतिकारकांच्या विचारांत राष्ट्र आणि धर्म या दोन कल्पना प्रमुख आहेत.

---

¶ "Revolution is only sacred and legitimate when undertaken in the name of a new aim upon the path of progress, capable of ameliorating the moral, intellectual, and material condition of the whole people : revolutions undertaken in order to substitute the systematic supremacy of any single fraction of the people for the rest, are naught other than rebellious, as dangerous as unfruitful." : *Essays : Selected from the writings literary, political and religious, of Joseph Mazzini :* The Walter Scott Publishing Co. Ltd., p. 306.

§ वि. दा. सावरकर : जोसेफ मॅझिनी : आत्मचरित्र नि राजकारण, पृ. ८७.

यांपैकीं राष्ट्र ही कल्पना आधुनिक असून ती एकाद्या विवक्षित लोकसमूहाच्या प्रादेशिक, आर्थिक व सांस्कृतिक पृथगात्मतेची द्योतक आहे. कोणतीहि विशिष्ट समाजव्यवस्था तींत अभिप्रेत नाहीं. म्हणून राष्ट्रवाद्यांना आपल्या विचारांत कोणत्याना कोणत्या तरी स्वयंपूर्ण सामाजिक तत्त्वज्ञानाचा आशय भरावा लागतो. आपल्याकडे धर्म व राष्ट्र ह्या भिन्न कल्पनांची गल्लत करण्यांत आली; आणि आपल्या धर्मजीवनांत मध्ययुगीन मूल्यांचें प्राबल्य असल्यामुळें राष्ट्रकल्पनेंतहि जुना आशय ओतला गेला. म्हणून मॅझिनींची धर्मनिष्ठा व अध्यात्मवाद आणि भारतीय राष्ट्रवाद्यांची धर्मनिष्ठा व अध्यात्मवाद यांत सकृद्दर्शनीं जरी साम्य दिसलें, तरी वस्तुतः त्यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. युरोपच्या साम्राज्यवादाचा प्रतिकार करतांना तेथील सामाजिक प्रगतिशील विचारसरणींचा निषेध करण्याची, आणि राष्ट्रप्रेमाच्या नांवाखालीं जुन्या मूल्यांचा उदोउदो करण्याची वृत्ति येथें बळावत गेली. युरोपमध्येंहि एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं भांडवलशाही संस्कृतीच्या विनाशाला सुरवात झाली होती. तेथील स्वातंत्र्यवादाचें साम्राज्यवादांत, भौतिकवादाचें सुखवादांत पर्यवसान होत होतें. अशा वेळीं आपला त्यागप्रवण अध्यात्मवाद युरोपांतील भोगप्रधान भौतिकवादापेक्षां श्रेष्ठ आहे अशी येथील लोकांनीं आपली समजूत करून घेतली. विवेकानंदांनीं भारतीय तत्त्वज्ञानाची नव्या परिस्थितीच्या संदर्भात पुनर्रचना करून त्याला व्यवहार्य स्वरूप दिलें. टिळकांनींहि आधुनिक चिकित्सापद्धतीचा अवलंब करून ‘गीतारहस्या’ च्या द्वारें निष्काम कर्मयोगाच्या सिद्धान्ताला अद्ययावत्पणा आणला. त्यामुळें जुन्या मूल्यांचें प्रस्थ कायम राहिलें; आणि बदलत्या सामाजिक परिस्थितींत समाजहिताच्या दृष्टीनें त्यांचें वस्तुनिष्ठ पृथक्करण करण्याची कोणालाच जरूरी वाटली नाहीं.

वास्तविक पाहतां फ्रेंच राज्यक्रांतीनंतर युरोपीय विचारसरणींत सामान्य जनतेच्या प्रश्नांना अधिक महत्त्व येत होतें. विशिष्ट वर्गाऐवजीं बहुसंख्य लोकांचें सुख हेंच समाजव्यवस्थेचें उद्दिष्ट आहे हें तत्त्व तेथें सर्वत्र प्रसृत झालें होतें. पण धर्माच्या जुन्या कल्पनेंत गुंतून पडल्यामुळें साध्य व साधन या दोन्ही दृष्टींनीं लोकांचें महत्त्व काय आहे हें येथील क्रांतिकारकांना मात्र

कधींच उमगलें नाहीं. म्हणून 'अभिनव भारता' सारख्या संस्थांनीं क्रांति शब्दाचा अर्थ राजकीय उठावणीपुरताच मर्यादित केला. त्यांच्या सभासदांनीं युरोपच्या शस्त्रविद्येचें अध्ययन केलें, रशियन क्रांतिकारकांपासून ते बाँबविद्या शिकले; पण त्यांच्याप्रमाणें जनतेशीं समरस होऊन निरनिराळ्या वर्गसंघटना उभारण्याकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं. १९१७ मध्यें रशियांत कम्युनिस्टांनीं क्रांतीचा जो महान् प्रयोग केला, त्याच्या मागें अनेक वर्षांच्या संघटनेची तपस्या होती. लेनिनच्या पाठीशीं कणखर व ध्येयनिष्ठ अशा निवडक लोकांचा कम्युनिस्ट पक्ष तर होताच, पण त्यांचें खरें सामर्थ्य वर्गवादी पायावर उभारलेल्या शेतकरी–कामगारांच्या खंबीर संघटनांवर अवलंबून होतें. तरीहि अनुकूल परिस्थिति प्राप्त होईपर्यंत या क्रांतिकारकांना वाट पाहावी लागली. १९१७ मध्यें युद्धांतील पराभव, महागाई व उपासमार यांच्या योगानें लोकमत प्रक्षुब्ध होऊन जेव्हां झारशाही खिळखिळी झाली, तेव्हांच तिच्यावर निकराचा आघात करण्याची क्रांतिकारकांना संधि मिळाली. हिंदुस्थानांतील क्रांतिकारकांना परिस्थिति कोणत्याच दृष्टीनें अनुकूल नव्हती. परकीयांशीं लढून जय मिळविणें १८५७ मध्यें एका दृष्टीनें सोपें होतें. ब्रिटिशांचें राज्य त्यावेळीं स्थिरस्थावर झालें नव्हतें. आर्थिक, राजकीय व लष्करी सत्ता कांहीं प्रमाणांत तरी जुन्या संस्थानिकांच्या हातीं होती. इतकेंच नव्हे तर जनतेमध्येंहि त्यांच्याविषयीं स्वामिनिष्ठेची भावना अद्याप शिल्लक होती. असें असूनहि ब्रिटिश लष्कराचा पराभव करणें बंडवाल्यांना जमलें नाहीं. त्यानंतरच्या पन्नास वर्षांत परिस्थिति खूपच बदलली. इंग्रजांच्या हातीं राज्य-कारभार येतांच येथील प्रजेला त्यांनीं निःशस्त्र केलें. दळणवळणाच्या साधनांची वाढ करून राजकीय सत्तेचें केंद्रीकरण केलें; आणि नोकरशाहीचें शिस्तबद्ध व कार्यक्षम राज्ययंत्र निर्माण केलें. इंग्रजांच्या या सुनियंत्रित सत्तेला यशस्वी विरोध करण्याइतकी प्रतिस्पर्धी शक्ति आपण पैदा केली पाहिजे याची क्रांतिकारकांना जाणीव झाली नाहीं. त्यांचीं मनें मध्ययुगांतील अद्भुतरम्य वातावरणांत वावरत होतीं. तोफांच्या सलाम्या, खड्गांचा खणखणाट, सुवर्णाचीं सिंहासनें यांचींच त्यांना स्वप्नें पडत होतीं. म्हणून आर्थिक व सामाजिक क्षेत्रांतील केंद्रीभूत सत्तेकडे त्यांचें लक्ष गेलें नाहीं. त्यांची

दृष्टि केवळ राजकीय होती. समाजव्यवस्थेच्या आर्थिक पायाचें त्यांना नीट आकलन झालें नाहीं. म्हणून त्यांना युरोपांतील नव्या शस्त्रांची महती कळली, पण नव्या मंत्रांची ओळख पटली नाहीं. बहुजनसमाजाबद्दल उदासीनता, नव्या तत्त्वज्ञानाचा अभाव, विनाशक कार्यक्रमावरच सर्व मदार आणि गुप्ततेचें फाजील स्तोम इत्यादि जे आक्षेप मॅझिनींनीं 'कार्बोनारी' या इटालींतील गुप्त संस्थेवर घेतले आहेत, तेच येथील क्रांतिकारक चळवळीला बहुतांशीं लागू पडतात. त्यामुळें या चळवळीला पुरेसें बळ लाभलें नाहीं; आणि पांचदहा पराक्रमाचीं कृत्यें करून लोकांना व सरकारला स्तिमित करण्यापलीकडे तिनें मजल गांठली नाहीं.

## सनदशीर चळवळ–व्याप्ति आणि मर्यादा

राष्ट्रसभेंतील नेत्यांचा सनदशीर मार्गावर जो विश्वास होता त्याला कर्झनच्या दंडुकेशाहीमुळें जबर धक्का बसला. अर्जविनवण्या करून इंग्रज अधिकाऱ्यांचीं मनें वळविण्याच्या प्रयत्नांत एक तप घालविल्यावर त्याची निष्फळता त्यांच्या प्रत्ययाला आली; आणि नेमस्तांच्या भाषणांतहि वारंवार निराशेचे सूर उमटूं लागले.* प्रार्थनेच्या ऐवजीं प्रतिकाराची भूमिका पत्करून सरकारवर लोकमताचें कायदेशीर दडपण आणूं पाहणारा एक नवा जहाल पक्ष राष्ट्रसभेंत उदयास आला होता. 'केसरी' व 'काळ' हीं त्या पक्षाचीं मुखपत्रें होतीं. त्यांनीं लोकांमधील असंतोषास राजकीय वळण देण्याची व त्याला धार आणण्याची पराकाष्ठा केली. बहिष्कारावरील ठरावांच्या निमित्तानें राष्ट्रसभेंतील जुना नेमस्त पक्ष व नवा राष्ट्रवादी पक्ष यांच्यांतील विरोध वाढीस लागला; आणि १९०७ च्या सुरत काँग्रेसमध्यें त्याला अधिक उग्र स्वरूप प्राप्त होऊन राष्ट्रसभेचीं दोन शकलें झालीं. मात्र टिळकांच्या तुरुंगवासाच्या काळांत जहाल

* "In many of our papers, in the utterances of many of our leading men, in the discussions that take place in the freedom of private conversation, you find everywhere that the predominant note in regard to political agitation is one of dispair" : G. K. Gokhale : *Speeches*, (Second Edition) p. 1061 : G. A. Natesan & Co., Madras.

गट मागें पडल्यामुळें १९१७ पर्यंत तरी जुन्या पुढाऱ्यांचें काँग्रेसवरील वर्चस्व कायम होतें.

राष्ट्रसभेंतील नेमस्त पुढारी सुरेंद्रनाथ बानर्जी, फेरोजशहा मेहता व गोपाळ कृष्ण गोखले यांना पाश्चात्य समाजसंस्था आणि विचारप्रवाह यांच्या अध्ययनानें आधुनिक जीवनमूल्यांचें महत्त्व कळून आलें होतें. त्यामुळें व्यक्तिस्वातंत्र्य, प्रातिनिधिकता, लोकशाही, सनदशीरपणा इत्यादि ब्रिटिश राज्यपद्धतींतील मूलतत्त्वांवर त्यांची दृढ श्रद्धा जडली. या तत्त्वांच्या अनुरोधानें प्राप्त होणारे नागरिक हक्क ज्यामध्यें हिंदी लोकांना निर्वेधपणें उपभोगतां येतील असें वसाहतीचें स्वराज्य मिळविणें हें त्यांनीं आपल्या राजकीय चळवळीचें उद्दिष्ट ठरविलें. कॅनडा, ऑस्ट्रेलिया वगैरे वसाहतींच्या उदाहरणां-वरून हिंदुस्थानलाहि ब्रिटिश साम्राज्यांत राहून हें ध्येय गांठतां येईल अशी त्यांना आशा वाटूं लागली. इंग्रजी राजवटीखालीं झालेली हिंदुस्थानची प्रगति त्यांना दिसत होती. हिंदुस्थानांतील लोकांमध्यें असलेले धर्म, भाषा, जाति, वर्ण आणि प्रांत यांचे भेद नाहींसे होऊन या ठिकाणीं खऱ्या राष्ट्रीयत्वाची वाढ होण्यास इंग्रजांची सत्ता कांहीं काळ तरी आवश्यक आहे असें त्यांचें मत होतें. सरकारची खुशामत करण्यासाठीं किंवा अधिकाऱ्यांची मेहेरबानी संपादण्यासाठीं नव्हे तर खऱ्याखुऱ्या देशहिताच्या दृष्टीनें वैयक्तिक स्वाभिमान बाजूला सारून व भावनावश न होतां राजनिष्ठेचें निःसंकोचपणें परिपालन करणें हें आपलें कर्तव्य आहे अशी त्यांची भावना होती. शिवाय इंग्रजांची न्यायबुद्धि व स्वातंत्र्यप्रियता यांवर त्यांचा विश्वास होता. वर्ण, जाति किंवा धर्म याबद्दलचा भेदभाव न धरतां सर्व प्रजाजनांना समानतेनें वागविण्याचीं अभिवचनें इंग्लंडच्या राज्यकर्त्यांनीं १८३३ व १८५८ मध्यें हिंदी प्रजाजनांना आपण होऊन दिलीं होतीं. त्या आश्वासनांच्या आधारावर आपणांस इंग्रजांकडून घटनात्मक राजकीय हक्क मिळवितां येतील अशी त्यांनीं उमेद बाळगली. राज्यकर्ते आणि प्रजा यांचा परस्परांबद्दलचा अविश्वास आणि दोन्ही देशांतील वास्तविक परिस्थितीचें अज्ञान हींच त्यांच्या मतें हिंदुस्थानच्या प्रगतिपथांतील एकमेव धोंड होती. म्हणून राज्यकर्त्यांचे हेतु प्रजेला समजावून सांगणाऱ्या आणि जनतेचीं गाऱ्हाणीं सरकारपुढें मांडणाऱ्या दुभाष्याची

भूमिका त्यांनीं पत्करली. गोखले हे या नेमस्त संप्रदायाचे महाराष्ट्रांतील अध्वर्यु होते. त्यांची दृष्टि रानड्यांप्रमाणेंच अंतर्मुख आणि विधायक होती. म्हणून इंग्रजांना येथील परिस्थितीचें ज्ञान करून दिलें कीं संपलें असें त्यांना कधींच वाटलें नाहीं; तर लोकसत्ताक राज्यपद्धतींतील व्यक्तिगत जबाबदारी सांभाळण्याची पात्रता आपल्या लोकांत आली पाहिजे अशी त्यांना तळमळ लागून राहिली होती. मात्र पात्रतेची सबब पुढें करून राज्यकर्त्यांना हक्कदानाच्या बाबतींत चालढकल करतां येऊं नये म्हणून 'स्वातंत्र्याचे हक्क दिल्यानेंच लोक स्वातंत्र्याला लायक होतात' या ग्लॅडस्टनच्या शब्दांची त्यांनीं सरकारला आठवण करून दिली. लोकांची लायकी वाढविण्यासाठीं व त्यांना त्या प्रमाणांत अधिकार मिळवून देण्यासाठीं प्रचलित राज्यपद्धतींत शांततेनें व क्रमाक्रमानें बदल घडवून आणणारा सनदशीर मार्गच त्यांना सर्वांत श्रेयस्कर वाटला. 'न्याय्य व कायदेशीर मार्गांनीं राज्यकर्त्यांवर लोकमताचें दडपण आणून सुधारणा घडवून आणणें' अशी गोखल्यांनीं सनदशीरपणाची व्याख्या केली होती. सशस्त्र बंड, परकीय आक्रमणाला मदत व गुन्हेगारी हे तीन प्रकार सोडून, अर्जविनंत्यांपासून करबंदीपर्यंत प्रत्येक चळवळीचा या सनदशीरपणांत समावेश करण्यास त्यांची तत्त्वतः तयारी होती. § प्रत्यक्षांत मात्र लोकांच्या हुल्लडबाजीचें भय वाटून सरकारचें मन वळविण्याचा मिळमिळीत मार्गच त्यांनीं स्वीकारला. नेमस्त संप्रदायांतील अनुभवी लोक प्रांतिक व वरिष्ठ

§ "Constitutional agitation was agitation by methods which they were entitled to adopt to bring about the changes they desired through the action of constituted authorities....Three things were excluded : rebellion, aiding or abetting a foreign invasion, and resort to crime. Roughly speaking, barring these three things all else was constitutional..... prayers and appeals to justice lay at one end. Passive resistance, including even its extreme form of non-payment of taxes till redress was obtained lay at the other end". ibid, pp. 1105–1106.

सल्लागार मंडळांत प्रतिनिधि म्हणून निवडून गेले; आणि तेथें प्रत्येक प्रश्नावर हिंदी लोकांची बाजू त्यांनीं अभ्यासपूर्वक सरकारपुढें मांडली. येथील नोकरशाही प्रतिगामी असली तरी तिच्यावर हुकमत गाजविणारी इंग्रज जनता स्वातंत्र्यप्रिय आहे या श्रद्धेनें तिला जागृत करण्यासाठीं त्यांनीं इंग्लंडमध्यें लिबरल पक्षाच्या मदतीनें सभा घेतल्या, वर्तमानपत्रांतून प्रचार केला, आणि ब्रिटिश मुत्सद्यांची प्रत्यक्ष भेट घेऊन त्यांचें मतपरिवर्तन करण्याची खटपट केली. §

## लिबरल पक्षाचें सामर्थ्य व कमकुवतपणा.

नेमस्तांच्या सनदशीरपणाच्या आग्रहामागें ब्रिटिश लिबरल पक्षाबद्दल वाटणारी विश्वासाची भावना होती. मिल्, ग्लॅडस्टन् ह्या उदारमतवादी तत्त्वज्ञांचे विचार त्यांनीं उचलले होते. म्हणून त्यांच्या नेतृत्वाखालीं असणाऱ्या पक्षावर त्यांनीं साहजिकच विश्वास ठेवला.* हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या मागणींतील न्याय्यता इंग्लंडमधील अनेक लिबरल मुत्सद्यांनीं मान्य केली होती. आयर्लंडला 'होमरूल" देण्याचें बिल खुद्द ग्लडस्टननीं पार्लमेंटसभेंत मांडलें होतें. त्यावरून उदारमतवादी पक्ष पुन्हा अधिकारारूढ झाल्यास त्याजकडून आपल्या देशास कांहीं विशेष राजकीय

---

§ "Despite occasional lapses–and some of them most lamentable lapses–despite prolonged reactions inevitable in human affairs, the genius of the British people as revealed in history, on the whole made for political freedom, for constitutionl liberty".

ibid pp. 1104—1105

* "The great change that has taken place in England during the last year in the position of parties, the revived fervour for freedom and sympathy for national aspirations which is so marked a feature of the new House of Commons is a strong influence in our favour, though how much we will benefit from it depends largely upon ourselves." ibid, p. 1107.

हक्क मिळतील अशी नेमस्तांची अपेक्षा असल्यास आश्चर्य नाहीं. पण एकोणिसाव्या शतकांच्या शेवटीं ब्रिटिश लिबरल पक्षाच्या सामर्थ्यांत व धोरणांत फार मोठा फरक घडून येत होता. अंतर्गत बाबतींत तटस्थता व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत खुला व्यापार ( laissez-faire and free trade ) हीं लिबरल पक्षाच्या धोरणाचीं मुख्य तत्त्वें होतीं. ब्रिटनमधील कारखानदार वर्गाला तीं फायदेशीर असल्यामुळें त्याच्या पाठिंब्यावर १८४० नंतर लिबरल पक्ष सत्तारूढ झाला होता. औद्योगिक क्रांतीच्या काळांत इंग्लंडमधील कारखानदार वर्ग सर्व जगांत अग्रेसर होता. म्हणून शांतता व सुरक्षितता यांशिवाय सरकारकडून त्याला कोणत्याच मदतीची आवश्यकता नव्हती. आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत त्याला दुसरा प्रतिस्पर्धी नसल्यामुळें खुल्या व्यापाराच्या नांवाखालीं सर्व जगाचा व्यापार काबीज करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. म्हणून संपूर्ण स्पर्धा व खुला व्यापार यांवर विश्वास ठेवणाऱ्या लिबरल पक्षाला त्यानें साहाय्य केलें; व ग्लॅडस्टनसारख्या उदार, शांतताप्रेमी व स्वातंत्र्यवादी गृहस्थाच्या हातांत राष्ट्राच्या राजकारणाचीं सूत्रें दिलीं. तसेंच कॉंझर्वेटिव्ह पक्षाच्या संकुचित धोरणापेक्षां लिबरल पक्षाच्या व्यापक दृष्टिकोनामुळेंच आपणांस राजकीय हक्क मिळण्याची अधिक शक्यता आहे असें वाटल्यावरून इंग्लंडमधील कामगारवर्गानेंहि लिबरल पक्षाला आपला पाठिंबा दिला. औद्योगिक संपन्नतेच्या या काळांतच वसाहतींना स्वराज्य देण्याची भाषा बोलली जात होती. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं ही परिस्थिति बदलली. आंतरराष्ट्रीय बाजारपेठा काबीज करण्यासाठीं युरोपीय राष्ट्रांत चढाओढ लागल्यावर ग्लॅडस्टनच्या शांततावादापेक्षां डिझरेलीचा साम्राज्यवाद इंग्रज कारखानदारांना अधिक सोयीचा वाटूं लागला. साम्राज्यांतील बाजारपेठांचीं राखीव कुरणें हातचीं जाऊं नयेत म्हणून व्यापारी संरक्षणाच्या मागणीला जोर चढला. या संरक्षणाच्या प्रश्नावर लिबरल पक्षाचे दोन तुकडे होऊन लिबरल युनियनिस्ट ह्या त्यांतील एका गटानें कॉंझर्वेटिव्ह पक्षाला मंत्रिमंडळ बनविण्यास हातभार लावला. अंतर्गत क्षेत्रांत मक्तेदारीच्या उदयाबरोबर वर्गविरोधाची धार वाढत गेली. तेव्हां आर्थिक व सामाजिक क्षेत्रांतील विषमता नाहींशी करण्यासाठीं कामगारवर्गाला सरकारी हस्तक्षेपाची गरज वाटूं लागली.

तटस्थतेच्या रूढ धोरणानें कामगारांचें समाधान होईना. म्हणून त्यांच्या मागण्या बोलून दाखविणाऱ्या मजूर पक्षाची स्थापना झाली. तरीहि ग्लॅडस्टन यांच्या मृत्यूपर्यंत लिबरल पक्ष कसा तरी तग धरून होता. १८९४ मध्यें ग्लॅडस्टन कार्यनिवृत्त झाले, व लिबरला पक्षाला उतरती कळा लागली. १९०५ मध्यें एकदां त्याचें मंत्रिमंडळ बनलें हें खरें; पण तें शेवटचेंच. त्यांत खरा जोम व जिवंतपणा नव्हता. एका बाजूला साम्राज्यवादी कॉंझर्वेटिव्ह पक्ष व दुसऱ्या बाजूला समाजवादी मजूर पक्ष यांचें वजन वाढत होतें. युरोपांत महायुद्धाचे ढग जमूं लागले होते. म्हणून लिबरल पक्षाला राजकारणांतील आपलें आसन टिकविण्यासाठीं अधिकाधिक अनुदार व प्रतिगामी धोरण आंखावें लागलें.

## रानडे–गोखले–फेरोजशहा

सत्तारूढ लिबरल पक्षाच्या या संधिसाधु धोरणानें मवाळांच्या आशा कायमच्या मावळल्या. १८५८ च्या जाहीरनाम्याचें 'अशक्य सनद' असें वर्णन करून सरकारनें प्रत्यक्षांत त्याला यत्किंचितहि महत्त्व देण्याचें नाकारल्यावर सनदशीरपणाचा आधारच ढांसळला. अशा वेळीं उन्मत्त व बेजबाबदार राज्यकर्त्यांना वठणीवर आणण्यास जागृत व संघटित लोकमता-खेरीज दुसरा उपाय उरत नाहीं. पण अशा तऱ्हेचें प्रभावी लोकमत तयार करण्याचें कार्य मवाळांनीं कुठें हातीं घेतलें होतें? तसें म्हटलें तर प्रातिनिधिक राज्यपद्धति, लोकशाही यांच्यावर त्यांचा विश्वास होता. लोकमताचें पावित्र्य व प्रामाण्य त्यांना तत्त्वतः मान्य होतें. पण येथील जनतेविषयीं मात्र त्यांच्या मनांत एक प्रकारचा दुजाभाव, संशय व भीति होती. दारिद्र्य, अज्ञान आणि फुटीरपणा यांनीं पीडलेली ही जनता संघटित व शिस्तबद्ध राज्यकर्त्यांना विरोध करण्याइतकें सामर्थ्य दाखवूं शकेल अशी कल्पनाहि त्यांच्या मनाला शिवली नाहीं. म्हणूनच इंग्रजांच्या उदारतेवर व सद्भावनेवर त्यांनीं आपली सारी भिस्त ठेवली.

सार्वजनिक जीवनांत गोखल्यांनीं रानड्यांचें शिष्यत्व पत्करलें. पण रानड्यांनीं सरकारच्या आर्जवाइतकेंच लोकांच्या संघटनेकडे लक्ष दिलें होतें. सार्वजनिक सभेनें केलेल्या अर्जविनवण्यांच्या मागें ब्रिटिशांच्या मनधरणी-

प्रमाणें लोकशिक्षणाचाहि हेतु होता. गोखल्यांच्या काळांत व्हाइसरॉय व गव्हर्नर यांच्या सल्लागार मंडळांत येथील लोकनियुक्त प्रतिनिधींना अधिकाधिक वाव मिळाला. म्हणून राजमंदिराचे उंबरठे झिजविण्यांतच ते गढून गेले; आणि लोकमतास आवाहन करण्याची त्यांनीं दक्षता घेतली नाहीं. सर्व प्रांतांतील लोकांना एकत्र आणून त्यांनीं अखिल भारतीय आघाडी उघडली; व 'भारत सेवक समाजा' ची स्थापना करून उदयोन्मुख कार्यकर्त्यांच्या स्वार्थत्यागाला व सेवावृत्तीला एक कार्यक्षेत्र निर्माण करून दिलें. पण प्रादेशिक प्रश्न, प्रवाह व परंपरा यांच्याशीं ते समरस होऊं शकले नाहींत. सामाजिक बाबतींत पाश्चात्य मूल्यें स्वीकारल्यामुळें मध्यमवर्गानें त्यांच्यावर इंग्रजधार्जिणेपणाचा आरोप केला. त्यामुळें त्यांच्या नेमस्त व प्रागतिक मतांचा अधिकच विपर्यास झाला. शिवाय त्यांचें लेखन आणि त्यांचीं भाषणें इंग्रजींत असल्यामुळें त्यांचे विचार सहजगत्या समजावून घेणें लोकांना कठिण होऊन बसलें. भारताच्या सर्वांगीण सुधारणेचें ध्येय गोखल्यांनीं आपल्या डोळ्यासमोर ठेवलें होतें; आणि सामाजिक कार्यांत लोकांनीं धर्मसाधनेइतक्याच श्रद्धेनें व उत्साहानें भाग घ्यावा अशी त्यांची इच्छा होती. पण प्रत्यक्षांत मात्र त्यांचा भर केवळ राजकारणावरच होता. म्हणून प्रचलित समाजव्यवस्थेमुळें चिरडल्या जाणाऱ्या बहुसंख्य लोकांची सहानुभूति त्यांना संपादन करतां आली नाहीं. त्यामुळें त्यांच्या भारत सेवक समाजाचें ध्येय व्यापक असलें, तरी त्यांना सेवकांचा तुटवडा पडला. त्यांची श्रद्धा सात्त्विक होती; पण लोकसंग्रहाच्या अभावीं त्यांचें कर्तृत्व शेवटीं पोरकेंच ठरलें.

गोखल्यांपेक्षां फेरोजशहामध्यें अधिक कणखरपणा, धडाडी व आक्रमक वृत्ति होती. रुबाबदार व्यक्तित्व आणि विद्वत्ताप्रचुर वक्तृत्व यांच्या जोरावर महापालिका, विधिमंडळ, राष्ट्रसभा इत्यादि ठिकाणीं त्यांनीं सरकारवर व लोकांवर आपली सारखीच छाप पाडली; आणि व्यापारी व कारखानदार वर्गाच्या मागण्या व्यवस्थितपणें अधिकाऱ्यांपुढें मांडून त्यांचा पाठिंबा मिळविला. पण ते ज्या वर्गातून पुढें आले तो वर्ग राजकीय क्षेत्रांत नव्यानेंच प्रविष्ट झाला होता. जनतेचें नेतृत्व आपण करूं शकूं असा विश्वास त्याच्यामध्यें अजून निर्माण झाला नव्हता. म्हणून फेरोजशहांनीं सामान्य लोकांविषयीं पूर्णपणें

बेफिकीर वृत्ति पत्करली. त्यामुळें नेतृत्वाचे अनेक गुण अंगीं असूनहि देशांत जिवंत व जोरदार चळवळ निर्माण करणें त्यांना कधींच जमलें नाहीं.

## सुराज्य आणि स्वराज्य

बंगालच्या फाळणीनें निर्माण झालेल्या सार्वत्रिक असंतोषामुळें जहाल राष्ट्रवादी गटाला राष्ट्रसभेंत आपला प्रभाव पाडण्यास अनुकूल संधि मिळाली. ब्रिटिश राज्यपद्धतींतील उदार तत्त्वें आणि हिंदी नोकरशाहीचा जुलुमी कारभार यांतील पेंच सोडवितां न आल्यानें जुने पुढारी दिङ्मूढ झाले होते. त्यांची मनोवृत्ति आणि विचारसरणी कायमची बनून गेली असल्यामुळें त्यांच्या धोरणांत मूलगामी बदल होण्याची शक्यता नव्हती. त्यामुळें सनदशीर मार्गांतील मिंधेपणा आणि मानहानि यांना विटलेले उसळत्या रक्ताचे कांहीं नवे तरुण दहशतवादाकडे वळले. पण बहुसंख्य मध्यमवर्गीयांना देशभक्तीचें हें उग्र असिधाराव्रत झेपण्यासारखें नसल्यानें योग्य मार्गदर्शनाच्या अभावीं ते निष्क्रिय किंवा संधिसाधु बनण्याचा धोका होता. अशा वेळीं क्रांतिकारकांच्या कणखर ध्येयवादाचा व्यवहार्य व परिणामकारक साधनांशीं मेळ घालून होतकरू तरुणांच्या त्यागबुद्धीला व पराक्रमाला प्रोत्साहन देणाऱ्या तडफदार नेतृत्वाची देशाला गरज होती. जहाल राष्ट्रवादी पक्षानें तत्परतेनें ही जबाबदारी आपल्या शिरावर घेतली; आणि सामान्य लोकांच्या शांततामय प्रतिकारावर आधारलेला बहिष्काराचा न्याय्य, कायदेशीर पण प्रखर असा मार्ग शोधून काढला.

जहाल प्रवृत्तीच्या या नव्या पक्षाला बंगाल व महाराष्ट्र ह्या दोन प्रांतांत विशेष पाठिंबा मिळाला. महाराष्ट्रांत नेमस्त संप्रदायाचीं पाळेंमुळें खणून काढून लोकमान्य टिळकांनीं ही विचारसरणी रुजविली. टिळकांच्या पूर्वी "काँग्रेसची जुनी पद्धत म्हटली म्हणजे अबकारी, जंगल, मीठ वगैरे खात्यांतील किरकोळ व्यंगें किंवा दोष काढून त्यांच्या निराकरणार्थ अगर कायदेकौन्सिलांत सुधारणा करण्याकरितां, अगर लष्करी खर्च कमी करण्याकरितां सरकारास जोरानें पण नम्रपणाची विनंती करावयाची. हिंदुस्थानांतील प्रजेस, आपल्या डोळ्यांपुढें कोणता हेतु ठेवून झटावें याबद्दल राष्ट्रीय सभा अगर तिचे अध्यक्ष नेटानें अगर स्पष्टपणानें कांहीं एक सांगत नसत." ¶ पण

¶ टिळक : केसरींतील लेख, भाग ३ रा, पृ. १३२.

" देशांतील लोकांपुढें अंतिमांतला अंतिम हेतु मांडून त्यांच्या मनोवृत्तीस एक प्रकारचें उदात्त वळण देणें हें केवळ श्लाघ्य नव्हे तर राष्ट्रोन्नतीच्या दृष्टीनें आवश्यकही आहे."§ असें टिळकांचें मत होतें. म्हणून राष्ट्रसभेनें एकदां आपलें ध्येय निःसंदिग्धपणें जाहीर करावें असा त्यांनीं आग्रह धरला; आणि दादाभाईसारख्या राजकीय महर्षींच्या पाठिंब्यामुळें तो तडीसहि नेला. १९०६ सालीं कलकत्ता येथें झालेल्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनामध्यें दादाभाईनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत 'स्वराज्य' ह्या ध्येयाची स्पष्टपणें घोषणा केली; आणि राष्ट्रसभेंतील नव्या प्रवृत्तींचें मोकळेपणानें स्वागत केलें. " इंग्लंडांतील लोक ज्याप्रमाणें लोकनियुक्त प्रतिनिधींच्या द्वारें राज्यकारभार चालविण्याकरितां आपले अधिकारी नेमितात, कारभाराचें धोरण ठरवितात, कर बसवितात आणि उठवितात, अथवा करानें वसूल केलेले पैसे अमक्या अमक्या कामीं खर्च झाले पाहिजेत, दुसऱ्या कामीं होऊं नयेत, असें ठरवितात, त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील राज्यकारभार चालविण्याचें, कायदे करण्याचें, अधिकारी नेमण्याचें व कराचे पैसे खर्च करण्याचें काम हिंदी प्रजेच्या हातांत पाहिजे " असा स्पष्ट खुलासा करून त्यांनीं स्वातंत्र्याच्या कल्पनेंत लोकशाहीचा आशय ओतला. ‡ टिळकांनीं दादाभाईच्या ह्या अध्यक्षीय भाषणाचा फायदा घेऊन आपल्या लेखांतून अंतिम साध्य म्हणून स्वराज्यावर लोकांचें लक्ष केंद्रित केलें. हिंदुस्थानांतील विशिष्ट परिस्थितींत तात्कालिक उद्दिष्ट म्हणून त्यांनीं 'वसाहतीच्या स्वराज्या'स मान्यता दिली, आणि त्यासाठीं नेटानें झगडण्यास लोकांना प्रवृत्त केलें. मात्र मानवाच्या मनांतील स्वतंत्रतेची उदात्त भावना लक्षांत घेतां जगांतील इतर राष्ट्रांप्रमाणें 'संपूर्ण स्वातंत्र्य' हेंच हिंदी राष्ट्राचेंहि अंतिम ध्येय होय असें आवर्जून सांगण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं.

टिळकांनीं आपल्या विचारसरणींत उत्कट ध्येयनिष्ठेला डोळस वास्तववादाची जोड दिली होती. म्हणून इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या परस्परसंबंधांतील हितविरोध त्यांना स्पष्टपणें उमगला. इंग्लंडचें वैभव हें हिंदुस्थानच्या पिळवणुकीवर आधारलेलें असल्यामुळें कॉंझर्वेटिव्ह काय किंवा लिबरल काय कोणताहि पक्ष अधिकारारूढ झाल्यानें इंग्लंडच्या

§ किता, पृ. १९७. ‡ किता, पृ. १९६.

हिंदुस्थानविषयक धोरणांत फरक पडणें शक्य नव्हतें. इंग्लंडच्या अंतर्गत राज्यव्यवस्थेंत न्याय, कायदा, व्यक्तिस्वातंत्र्य हीं तत्त्वें अंतर्भूत असलीं, तरी इंग्लंडचा व्यापार व साम्राज्य हीं मिलस्पेन्सरच्या तत्त्वानुसार चालत नव्हतीं. हिंदुस्थानच्या बाबतींत इंग्रजांचा स्वार्थ त्यांच्या शहाणपणाच्या आड येत होता. त्यामुळें शास्त्रचर्चेप्रमाणें राजकारणाचे प्रश्नहि येथें नुसत्या बुद्धिवादानें सुटतील या भाबड्या आशेला वास्तविक कोणताच आधार नव्हता. "शास्त्रीय बाबतींत लोकांचीं मतें फिरविणें आणि राजकीय बाबतींत सत्ताधारी लोकांचीं मतें फिरविणें या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत. ज्याठिकाणीं मनुष्याच्या मताचा स्वार्थाशीं संबंध असतो त्या ठिकाणीं स्वार्थास चट्टा बसल्या-खेरीज नुसत्या वादविवादानें त्याचें मत फिरवितां येत नाहीं...विशेषतः करून परकीय राज्यकर्ते आणि जिंकलेली प्रजा यांच्या दरम्यानच्या लढ्यांत हाच न्याय लागू पडतो." § राजकारण हा केवळ सत्यशोधनाचा प्रांत नसून तो बलाबलाचा मामला आहे, म्हणून हक्कांसाठीं रडून किंवा भीक मागून कांहीं उपयोग नाहीं. प्रजेस हक्क पाहिजे असल्यास ते तिनें स्वपराक्रमानें व स्वावलंबनानेंच मिळविले पाहिजेत याबद्दल टिळकांना बिलकुल संदेह नव्हता. म्हणून इंग्रजांच्या औदार्यावर भिस्त न ठेवतां आणि सरकारी अधिकाऱ्यांच्या रोषाची फिकीर न करतां प्रजेची हिंमत वाढविण्याची, आणि निश्चय, धैर्य, स्वावलंबन आणि स्वार्थत्याग इत्यादि गुण तिच्या अंगीं बाणविण्याची त्यांनीं खटपट केली.

## सनदशीर आणि कायदेशीर

देशाच्या स्वाभिमानाला पोषक अशा 'स्वराज्य' ह्या ध्येयाचा टिळक-पक्षानें सार्वत्रिक प्रसार केला. त्याबरोबरच लोकांच्या सामर्थ्यावर आधारलेलीं स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण व बहिष्कार हीं प्रतिकाराचीं नवीं साधनेंहि त्यांनीं राष्ट्रसभेपुढें मांडलीं. राष्ट्रांतील असंतोष प्रत्यहीं भडकत असतांना नेमस्त पुढारी बेसनदशीरपणाचें बुजगावणें पुढें करून जनतेच्या स्वयंस्फूर्त उठावाला आळा घालण्यास कारणीभूत होत होते. टिळकांनीं सनदशीर

§ किता, पृ. ७.

व कायदेशीर यांमधील फरक स्पष्ट करून बहिष्काराच्या चळवळीला न्यायाचें व कायदेशीरपणाचें भरभक्कम अधिष्ठान मिळवून दिलें. इंग्लंडफ्रान्समधील लोकसत्ताक जबाबदार राज्यपद्धति आणि हिंदुस्थानांतील अनियंत्रित नोकरशाही पद्धति यांची तुलना करून त्यांनीं सनदशीरपणाचें थोतांड हें कसें भ्रममूलक आहे तें लोकांच्या नजरेस आणलें. "इंग्लंडांतील राजसत्ता 'कॉन्स्टिटयूशनल' किंवा 'सनदशीर' आहे असें जेव्हां म्हणतात तेव्हां त्याचा अर्थ असा असतो कीं, तेथील राजसत्ता अनियंत्रित नसून लोकांनीं संपादन केलेल्या हक्कांमुळें तिची मर्यादा किंवा व्याप्ति पुष्कळच संकुचित झालेली आहे. ज्या देशांतील राजा वाटेल तें करण्यास मुखत्यार असतो त्या देशांतील राजसत्तेची घटना 'सनदशीर' आहे असें म्हणण्याची वहिवाट नाहीं; कारण तेथील प्रजेस कांहींच हक्क नसतात. इंग्लंडांतील लोकांनीं आपल्या राजाकडून अशा हक्कांच्या सनदा मिळविल्या आहेत; आणि राजाचा हक्क इतका संपुष्टांत आणला आहे कीं, एकादा राजा जुलमी निघाल्यास त्यास लोक पदच्युतहि करूं शकतात, अथवा प्रसंगविशेषीं त्याच्या शिरच्छेदापर्यंतहि पाळी येते!" * म्हणून "इंग्लंडचा राजा आणि पार्लमेंट ही राजसत्तेची घटना इंग्लंडांतील लोकांपुरती सनदशीर आहे; पण हिंदुस्थान देशासंबंधानें हा राजा आणि हें पार्लमेंट अनियंत्रित म्हणजे हिंदुस्थानांतील प्रजेच्या अगर त्यांच्या प्रतिनिधींच्या मताप्रमाणें अगर इच्छेप्रमाणें न चालणारीं आहेत." § म्हणून हिंदुस्थानांतील सनदशीर चळवळ हा वाक्संप्रदाय केवळ निरर्थकच नव्हे तर लोकांची दिशाभूल करणारा आहे. लोकमत जागृत करणें व लोकांचें माताधिक्य आपल्या बाजूस करून घेणें ह्याला इंग्लंडांत सनदशीर चळवळ म्हणतात. हिंदुस्थानांत अशा तऱ्हेची चळवळ शक्य नाहीं. कारण येथील सरकार व अधिकारी वर्ग लोकांना जबाबदार नाहींत. लोकमत पायाखालीं तुडवून बेजबाबदारपणें वागणारें सरकार बदलून घेण्याचा येथील लोकांना हक्क नाहीं, याची टिळकांना जाणीव होती. सनदेचें हें खरें स्वरूप न ओळखल्यामुळें नेमस्तांनीं केवळ कविकल्पनेनें राणीच्या जाहीरनाम्याला मॅग्नाकार्टाची प्रतिष्ठा दिली होती. पण "राणीचा जाहीरनामा

---

* किता, पृ. १६५. § किता, पृ. १६६.

ही खरी सनद नव्हे व त्यामुळें हिंदुस्थानांतील राजसत्ता कोणत्याहि प्रकारें मर्यादित झालेली नाहीं. सन १८५७ च्या बंडानंतर लोक शांत व्हावे म्हणून राणीनें प्रजेस जो गोड आशीर्वाद दिला तो या जाहीरनाम्यांत आहे "‡ हें टिळकांचें मतच वस्तुस्थितीस धरून होतें. इंग्लंडमधील जनतेलाहि स्वकीय राज्यकर्त्यांशीं जीवापाड झगडूनच घटनेचे किंवा लोकशाहीचे हे हक्क मिळवावे लागले. मग हिंदुस्थानांतील प्रजेला मात्र परकीय सरकारविरुद्ध त्यासाठीं संघटित प्रतिकाराच्या चळवळीची गरज नाहीं असें म्हणणें कितपत सयुक्तिक होतें? स्वराज्यासाठीं सरकारशीं झगडण्याची ही अपरिहार्यता टिळकांनीं आपल्या लेखांतून वारंवार प्रतिपादिली आहे. त्याबरोबरच इंग्रज लोकांची प्रवृत्ति जात्याच सनदशीर असल्यामुळें आणि त्यांच्या स्वार्थांतहि सुसंस्कृतपणा व दूरदर्शित्व असल्यामुळें सशस्त्र बंड न करतां सरकारवर लोकमताचें कायदेशीर दडपण आणूनहि हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत सुधारणा घडवितां येतील असा त्यांना विश्वास वाटत होता. कायदेशीर चळवळींत अत्याचाराची भीति नसल्यामुळें सरकारला ज्याप्रमाणें निश्चिंतपणा असतो त्याप्रमाणें कायद्याच्या राज्यांत सरकारवरहि कायद्याचें बंधन असल्यामुळें प्रजेलाहि अधिकाऱ्यांच्या दंडुकेशाहीपासून संरक्षण मिळतें. म्हणून कायद्याच्या कक्षेंतच जनतेला प्रतिकारक्षम बनविण्याची टिळकांनीं पराकाष्ठा केली. मात्र असें करतांना कायदेशीरपणाचें त्यांनीं नसतें स्तोम माजविलें नाहीं. कारण " हल्लीचे स्थितींत कायदा करणें आमच्या हातचें नाहीं; तेव्हां आमचे प्रयत्न इतिहासास, मामूल वहिवाटीस, प्रजेच्या नैसर्गिक हक्कांस धरून नीतिदृष्ट्या जरी योग्य असले, तरी ते कायदेशीर किंवा बेकायदेशीर ठरविणें ही केवळ सरकारच्या इच्छेची गोष्ट आहे. प्रजेचे योग्य प्रयत्नहि एकादे वेळीं यांच्या कायद्यानें बेकायदेशीर होऊं शकतील." अशा वेळीं तिचे प्रयत्न बेकायदेशीर असें म्हणण्यापेक्षां कायदा जुलुमी असें म्हणणें भाग पडेल.† "सरकारचें कोणतेंहि कृत्य जुलमाचें आहे किंवा योग्य आहे, हें ठरविण्याचा अधिकार प्रजेचा आहे. ज्यावर 'जुलूम' असा छाप प्रजा मारील तो जुलूम" § अशा स्थितींत कायदेशीर किंवा बेकायदेशीर हे शब्द आमच्या

‡ कित्ता, पृ. १६६. † कित्ता, पृ. १७१. § कित्ता, पृ. ८८.

प्रयत्नांस लागतात कीं नाहीं याची आम्ही चिंता करीत बसण्यांत कांहीं हशील नाहीं. न्याय, नीति आणि ऐतिहासिक परंपरा किंवा प्रगति यांचा आधार आपणांस आहे कीं नाहीं एवढेंच आम्ही पाहिलें पाहिजे, आणि तसें असेल तर जुलमी कायदा मोडण्याबद्दल असलेली शिक्षा सोसूनहि आपण त्याचा प्रतिकार केला पाहिजे असा स्वच्छ निर्वाळा देऊन टिळकांनीं प्रजेच्या नैसर्गिक हक्कांची तरफदारी केली आहे. मात्र कायदेभंगाचा हा हक्क जरी त्यांनीं तत्त्वतः मान्य केला, तरी प्रत्यक्षांत लोकांची तयारी अजमावून सार्वजनिक चळवळीस कायद्याची मर्यादा घालण्याची त्यांनीं खबरदारी घेतली. कारण कायदेशीर कीं बेकायदेशीर हा प्रश्न धोरणाचा आहे, तत्त्वाचा नाहीं, असेंच त्यांना वाटत होतें.

## स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण आणि बहिष्कार

बंगालमधील बहिष्काराच्या चळवळीनें टिळकांना लोकमताच्या सामर्थ्याची प्रचीति आणून दिली. म्हणून राष्ट्रसभेच्या मागें जनतेची संघटित शक्ति उभी करण्याचा उद्योग त्यांनीं आरंभिला. प्रजा कितीहि दुर्बळ असली तरी धैर्यानें, जुटीनें आणि निश्चयानें अरेरावी राज्यकर्त्यांस ती शस्त्रावीणहि भारी होते ही गोष्ट रशिया, फ्रान्स वगैरे राष्ट्रांच्या इतिहासावरून सिद्ध झाली होती. "प्रजेचा संप आणि निग्रह यांची शक्ति कांहीं सामान्य नाहीं." * "मुंग्यांच्या अंगांतहि एकजूट केल्यास हत्तीला जेरीस आणण्याचें सामर्थ्य असतें." † म्हणून प्रजेच्या असंतोषानें एकदां का रौद्र स्वरूप धारण केलें कीं त्यापुढें उदारमतवादी मोर्लेनाच काय पण अरेरावी कर्झनलाहि नमावें लागेल अशी त्यांची खात्री होती. मात्र "त्यासाठीं हजारों लोकांचा समुदाय निश्चयानें बांधला गेला पाहिजे. लोकमताचें बळ निश्चयांत आहे, केवळ समुच्चयांत नाहीं...गवताच्या काड्या एकावर एक ठेवून ढीग केल्यानें कांहीं काम होत नाहीं. त्याची दोरी वळावी लागते आणि दोरीचा पीळ इतका बळकट असावा लागतो कीं, दोरी जळेल, पण पीळ जळणार नाहीं. अशी दोरी वळली म्हणजे मग मदोन्मत्त हत्तीचें आकलन

* किता, पृ. ५८. † किता, पृ. ५९.

करण्याची तिच्यांत शक्ति येते. आपल्या देशांतील लोकमत म्हणजे वाऱ्याची मोट आहे, तृणाचें दोरखंड नव्हे. आणि यांत जर कांहीं सुधारणा झाली नाहीं तर त्याचा दोष लोकांपेक्षां पुढाऱ्यांकडे अधिक आहे असें आम्ही समजतों. § "राष्ट्र तयार नसल्यास तें तयार करण्याचें काम पुढाऱ्यांचें आहे; किंबहुना पुढाऱ्यांचें जर कांहीं कर्तव्य असलें तर तें हेंच होय; कारण सर्व राष्ट्र तयार असल्यास मग पुढाऱ्यांचीही जरूर नाहीं. स्वराज्याच्या प्राप्तीकरतां हा जो झगडा होणार आहे त्यासाठीं लोकांस तयार केलें पाहिजे, आणि तसें तयार करण्याचा मार्ग म्हटला म्हणजे लोकांस हा झगडा करावयास लावणें हाच होय...राजकीय हक्क गोडीगुलाबीनें मिळावयाचे नाहींत; त्याकरितां पुढाऱ्यांस तुरुंगांत गेलें पाहिजे, हद्दपार झालें पाहिजे, किंवा दुसरा छळ सोसला पाहिजे." ‡ पुढाऱ्यांच्या या आत्मक्लेशांतूनच लोकांची तयारी होते. ह्या श्रद्धेनेंच टिळक स्वतः देहदंड सोसण्यास पुढें सरसावले; आणि आपल्या निष्ठेनें, त्यागानें आणि वीरवृत्तीनें त्यांनीं जनतेला स्वाभिमानाची व पराक्रमाची शिकवण दिली.

प्रतिकाराचीं प्रमुख साधनें म्हणून टिळकांच्या जहाल पक्षानें स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण व बहिष्कार यांचा पुरस्कार केला. त्यांच्या मताप्रमाणें ब्रिटिशांचें हिंदुस्थानांतील वर्चस्व, हें मुख्यतः राजकीय, आर्थिक व शैक्षणिक क्षेत्रांतील त्यांच्या हुकमतीवर अवलंबून होतें. ब्रिटनच्या व्यापाऱ्यांनीं हिंदी कारागिरांचे उद्योगधंदे नेस्तनाबूद करून येथील प्रजेची पद्धतशीर पिळवणूक चालविली होती. सरकारनियंत्रित शाळाकॉलेजांतून युरोपीय संस्कृतीचें श्रेष्ठत्व तरुणांच्या मनावर बिंबविलें जात असल्यानें त्यांच्या न्यूनगंडाचें सारखें पोषण होत होतें. ब्रिटिश नोकरशाहीनें जुन्या कोठल्याहि सरकारपेक्षां लोकांच्या मनांत आपल्या राज्ययंत्राबद्दल जरब उत्पन्न केली होती. या तिन्ही क्षेत्रांत इंग्रजांना शह देण्यासाठीं बहिष्कारयोगाचा अवलंब करण्याचें राष्ट्रवाद्यांनीं योजलें. परकीय मालावरील बहिष्कारानें इंग्रजांच्या व्यापाराला खो देण्याचा त्यांचा प्रयत्न होता. शाळा कॉलेजांवर बहिष्कार पुकारून त्यांच्या शैक्षणिक धोरणाचा त्यांना निषेध करावयाचा होता. सरकारी नोकरीवरील बहिष्कारानें इंग्रजांचें राज्ययंत्र

§ किता, पृ. ५ ‡ किता, पृ. २००.

खिळखिळें करण्याची त्यांची मनीषा होती. मात्र सरकारी नोकऱ्या आणि शाळाकॉलेजें यांवर मध्यमवर्गाचा चरितार्थ अवलंबून असल्यामुळें प्रत्यक्षांत या चळवळीचें क्षेत्र फार विस्तारलें नाहीं. तरी इटली, चीन, आयर्लंड, अमेरिका इत्यादि ठिकाणीं परिणामकारक ठरलेलें बहिष्काराचें राजकीय शस्त्र हिंदुस्थानांत या काळींच प्रथम परजलें गेलें; आणि त्याच्या प्रभावानें लोकजागृतीच्या व सामुदायिक प्रतिकाराच्या चळवळीस हळुहळू आकार येऊं लागला.

## लोकशाही कार्यपद्धति

लोकशाहीच्या तत्त्वाची श्रेष्ठता टिळकांना मनोमय पटल्यामुळें त्यांनीं राष्ट्रसभेच्या कार्यपद्धतींत लोकशाहीचे नियम आणि निर्बंध, संकेत आणि परंपरा रुजविण्याची पराकाष्ठा केली. परस्परांतील मतभेद शांततेनें व सलोख्यानें मिटवून प्रगतीचा मार्ग सर्वांना सारखाच खुला ठेवणें हें कोणत्याहि समाजांत फक्त लोकशाही पद्धतीनेंच शक्य होतें. लोकशाही पद्धतींत प्रत्येकाला आपले विचार स्पष्टपणें मांडण्याची आणि बहुमत आपल्या बाजूस वळवून घेण्याची मोकळीक असते. मात्र कोणत्याहि प्रश्नावर निरनिराळ्या दृष्टींनीं उघड चर्चा होऊन एकादां का बहुमतानें कौल दिला, कीं तो सर्व पक्षांनीं शिरसावंद्य मानणें हाच लोकशाहीचा आत्मा होय. टिळकांच्या काळांत राष्ट्रसभेंत अनेक मतप्रवाह निर्माण झाल्यामुळें फुटीर प्रवृत्तींची वाढ होऊन राष्ट्रसभेचीं शकलें झालीं होतीं. जहाल आणि मवाळ या दोन्ही पक्षांनीं आपले सवते सुभे स्थापन केले होते. पण इंग्रजांसारख्या बलाढ्य शत्रूशीं सामना देण्यासाठीं राष्ट्रसभेमध्यें एकजूट असणें आवश्यक आहे हें टिळकांना तीव्रतेनें जाणवत होतें. खुद्द पार्लमेंटांतहि सोशलिस्ट, रॅडिकल, कॉन्झर्वेटिव्ह आणि लिबरल हे भिन्नभिन्न मताचे भिन्नभिन्न पक्ष जर एकत्र काम करीत आहेत, तर मग हिंदुस्थानांतील दोन्ही पक्षांस तसें काम कां करतां येऊं नये असा त्यांनीं नेमस्त पुढाऱ्यांस सवाल टाकला. "कांहीं विशिष्ट कार्याकरितां एक होऊन पुन्हां आपआपलीं विशिष्ट मतें लोकांपुढें मांडण्याची प्रत्येक पक्षास मुभा असणें यांतच राष्ट्राचें हित आहे, हाच मार्ग राजमार्ग आहे, आणि पाश्चिमात्य राष्ट्रांच्या इतिहासाचेंहि त्यास पाठबळ आहे.

दोन्ही पक्षांसहि अशा तऱ्हेची मोकळीक राहूं द्या; एकमेकांपासून एकमेकांस थोडीशी अडचण होत असल्यास तिकडे दुर्लक्ष करा; परस्परांपासून परस्परांस होणाऱ्या फायद्याकडे लक्ष द्या; दोन्ही पक्ष एकाच राजकार्यधुरेचे वाहक आहेत हें विसरूं नका; सरकारबरोबर भांडण्यासाठीं दोघांच्याहि संघशक्तीची अपेक्षा आहे हें ध्यानांत ठेवा; विचारस्वातंत्र्य कायम राखणें यांतच राष्ट्राचें हित आहे हा सिद्धान्त मनांत बाळगा; आणि या सर्व गोष्टींकडे लक्ष ठेवून काम करण्याची पद्धत एकमेकांच्या विचारें आणि पूर्वींचे दाखले पाहून ठरवून घ्या. म्हणजे दोन्ही पक्षांचा समेट होऊन राष्ट्रीय सभेंत एकत्र काम करण्यास दोघांसहि अडचण पडणार नाहीं." † अशा शब्दांत त्यांनीं आपली तडजोडीची भूमिका स्पष्ट केली होती. एवढेंच नव्हे तर ब्रिटिश पार्लमेंट-प्रमाणें राष्ट्रसभा ही सर्व हिंदुस्थानची प्रातिनिधिक संस्था बनून कालाच्या ओघाप्रमाणें तिचें ध्येय व धोरण बदलत जावें; आणि राष्ट्राच्या प्रगतीला ती पोषक ठरावी म्हणून त्यांनीं तुरुंगांतून सुटून आल्यानंतर कसोशीनें प्रयत्न केले.

टिळकांनीं संपूर्ण स्वातंत्र्याची उघड घोषणा करून तरुण पिढीला पराक्रमाची स्फूर्ति दिली; प्रतिकाराचीं न्याय्य व परिणामकारक साधनें लोकांसमोर मांडून त्यांची त्यागभावना जागृत केली; आणि सामान्य जनांच्या सामुदायिक प्रतिकाराची आवश्यकता प्रतिपादून निरनिराळ्या प्रश्नांवर लोकमत संघटित करण्याचा पायंडा पाडला. मात्र इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या-मधील संबंधांचें सत्यस्वरूप जरी त्यांनीं वारंवार स्पष्ट केलें, तरी हिंदुस्थानांतील निरनिराळ्या वर्गांचे परस्परसंबंध, त्यांच्यांतील साधर्म्य आणि विरोध त्यांनीं लक्षांत घेतला नाहीं. म्हणून लोकसंघटनेचा पाया घालतांना व्यक्तिगत गुणांवरच त्यांनीं विशेष भर दिला; आणि वर्गसंबंध व वर्गहित यांची दखल घेतली नाहीं. लोकशाहीबद्दल प्रेम असूनहि लोकांचा बुद्धिभेद होईल या भीतीनें सामाजिक विषमतेवर आघात करणाऱ्या व्यक्तिवादाला त्यांनीं विरोध केला. त्यामुळें त्यांची लोकशाहीची कल्पना राजकीय यंत्रणेपुरती मर्यादित राहिली; समाजाचा जुना पाया उखडून टाकून नव्या लोकशाहीच्या तत्त्वानुसार

† कित्ता, पृ. २६५,

त्याची पुनर्रचना करण्याच्या दृष्टीनें त्यांनीं कांहींच हालचाल केली नाहीं. म्हणून परंपराभिमान व इंग्रजविरोध हेंच त्यांच्या चळवळीचें अधिष्ठान राहिलें; आणि सर्व वर्गांना एकत्र आणून त्यांच्या संघटित सामर्थ्यानें इंग्रज-सरकारवर दडपण आणण्याचें त्यांचें स्वप्न त्यांच्या हयातींत तरी साकार होऊं शकलें नाहीं.

## मध्यमवर्गीय राजकारण

अशा प्रकारें ज्वलज्जहाल, जहाल व मवाळ या तीन प्रवृत्तींच्या परस्पर संबंधांतून महाराष्ट्रांतील राष्ट्रवादाची घडण होत गेली. सावरकरांच्या 'अभिनव भारता'नें निर्भेळ स्वातंत्र्याची घोषणा करून त्याच्या सिद्धीसाठीं सशस्त्र प्रतिकाराची कांस धरली. पण या संस्थेच्या कार्यपद्धतीवर वास्तवदृष्टीपेक्षां कल्पनारम्यतेचाच पगडा अधिक असल्यामुळें स्वयंसैनिकांची टिकाऊ व जोरदार संघटना बांधण्यांत तिला यश आलें नाहीं. टिळकांच्या जहाल पक्षानें क्रांतिकारकांच्या ध्येयनिष्ठेचें, त्यागाचें व मर्दुमकीचें कौतुक केलें; पण वस्तुस्थितीची पुरती ओळख असल्यानें सशस्त्र क्रांतीचा मार्ग त्याला अविचाराचा व भयावह वाटला. मात्र वर्गसंघटनेच्या व आर्थिक पाठबळाच्या अभावीं अर्जविनंत्या आणि निषेधनिदर्शनें यांशिवाय दुसरा कोणताच मार्ग टिळकपंथीयांच्या तेव्हां आटोक्यांत नव्हता. म्हणून भावनेनें ज्वलज्जहालांच्या जवळ असूनहि कृतीच्या प्रांतांत मवाळांच्या पलीकडे त्यांची फारशी मजल गेली नाहीं. तसें पाहिलें तर टिळक व गोखले यांच्या विचारसरणींत साध्य व साधनें या दोन्ही बाबतींत तत्त्वतः कांहीं फरक नाहीं. टिळकांनीं निरपवाद स्वातंत्र्याचे पवाडे गाइले हें खरें; पण तात्कालिक ध्येय म्हणून त्यांनीं वसाहतीच्या स्वराज्याचाच पाठपुरावा केला. गोखल्यांनीं हक्कांची मागणी करतांना वसाहतीच्या स्वराज्यावरच बोट ठेवलें; पण देशाच्या अंतिम आकांक्षांवर कोणत्याच मर्यादा घालण्याची त्यांची इच्छा नव्हती. ¶ इतकेंच नव्हे तर इंग्लंडमधील नागरिकांना जे हक्क उपभोगावयास मिळतात ते सर्वच्या सर्व हिंदी नागरिकांना मिळाले पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता.

---

¶ Speeches of G. K. Gokhale, P., 1104.

साधनांच्या बाबतींत टिळकांनीं प्रजेच्या नैसर्गिक हक्कांची द्वाही फिरवूनहि राजकीय चळवळ कायद्याच्या कक्षेंत राखण्याची पराकाष्ठा केली, तर गोखल्यांनीं नेमस्तपणाची भूमिका कायम राखूनहि अर्जापासून करबंदीपर्यंतच्या प्रत्येक चळवळीचा सनदशीरपणांत समावेश केला. एकीकडे सरकारच्या न्यायबुद्धीवर व औदार्यावर भिस्त ठेवणाऱ्या गोखल्यांनीं वाढत्या लोकजागृतीचें वेळोवेळीं स्वागत केलें; तर दुसरीकडे बहिष्काराची हांक देणाऱ्या टिळकांनीं जरूर पडतांच विलायतेला डेप्युटेशनें पाठविण्यांत पुढाकार घेतला. म्हणून जहाल आणि मवाळ यांच्या विचारांतील भेद हा शेवटीं तीव्र व सौम्य अशा वृत्तींतीलच भेद ठरला. मात्र एकाच तात्त्विक भूमिकेवर जरी हे दोन्ही पंथ उभे होते, तरी मवाळांची दृष्टि सरकारवर खिळलेली असल्यामुळें त्यांच्या धोरणाचा विपर्यास होऊन त्यांच्यावर लाचारीचा शिक्का बसला. उलट जहालांनीं सामान्य जनांकडे आपला मोर्चा वळविला होता. म्हणून मवाळांना मान्य असूनहि जें साधतां आलें नाहीं, त्याची कांहीं प्रमाणांत तरी जहालांनीं पूर्वतयारी केली.

सावरकर, टिळक आणि गोखले या तिघांच्याहि प्रयत्नांतून हिंदुस्थानांत राष्ट्रव्यापी राजकीय चळवळ निर्माण होऊं शकली नाहीं. याचें कारण या सर्वांचा दृष्टिकोन मध्यमवर्गीय होता हेंच होय. परदेशांतून गुप्तपणें शस्त्रें मिळविण्यावरच क्रांतिकारकांची सारी मदार होती. म्हणून येथील आर्थिक व सामाजिक परिस्थितीचें स्वरूप त्यांनीं समजून घेतलें नाहीं यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण वास्तववादी भूमिकेवरून लोकांच्या चळवळीची उभारणी करूं इच्छिणाऱ्या टिळकपंथीयांनाहि प्रत्यक्षांत मध्यमवर्गीय राजकारणाच्या मर्यादा कधीं ओलांडतां आल्या नाहींत. त्यांचें ध्येय केवळ राजकीय होतें. धर्म व इतिहास यांच्या वैभवशाली परंपरेंत अवास्तव रमून गेल्यामुळें त्यांच्या राष्ट्रवादाची अहंताहि सांस्कृतिक व भावनाप्रधानच होती. म्हणून समाजांतील निरनिराळ्या वर्गांचे प्रश्न आणि गाऱ्हाणीं, प्रेरणा व हितसंबंध यांचा खोलवर विचार करण्याची त्यांना गरज वाटली नाहीं. सरकारवर दडपण आणण्यासाठीं त्यांनीं बहिष्काराचा मंत्र जपला. परंतु कोणत्या शक्तीमुळें तो फलदायी होईल याचा शोध घेतला नाहीं. वास्तविक पाहतां राजकीय, औद्योगिक व शैक्षणिक

क्षेत्रांतील बहिष्काराचा निरनिराळ्या वर्गावर निरनिराळा परिणाम होत होता. परकीय मालावरील बहिष्कार हा हिंदी भांडवलदार वर्गाच्या हितसंबंधास पोषकच होता. परंतु अर्थकारणाकडे दुर्लक्ष्य करून टिळकपंथ शिक्षक, वकील व उदमी कारागीर यांच्या त्यागबुद्धीवरच विसंबून राहिला. पण या ना त्या रूपानें सरकारी राज्ययंत्राशीं जखडलेल्या या वर्गाकडून बहिष्काराचा कार्यक्रम परिणामकारकतेनें अंमलांत येण्याचा संभव नव्हता. आद्योगिक बहिष्काराची चळवळ हिंदुस्थानांतील भांडवलशाहीच्या वाढीला उपकारक होऊं शकेल हें बहिष्कार या शब्दाला तीव्र विरोध असूनहि अर्थप्रधान उदारमतवादी दृष्टिकोनामुळें गोखल्यांना लवकर उमगलें. मात्र महायुद्धापूर्वी येथील भांडवलदारवर्ग अगदींच प्राथमिक अवस्थेंत होता. भांडवल, यंत्रसामुग्री, तंत्रविद्या यासाठीं सरकारी मदतीची त्याला आवश्यकता होती. म्हणून बहिष्काराच्या घोषणेनें सरकारला एकदम बिथरविण्याची गोखल्यांची इच्छा नव्हती. § यासाठीं ज्याठिकाणीं इंग्लंडच्या स्पर्धेचा प्रश्न उपस्थित होण्यासारखा नव्हता त्या ठिकाणीं आर्थिक प्रगतीच्या दृष्टीनें त्यांनीं स्वदेशीचा म्हणजेच पर्यायानें बहिष्काराचा मार्ग पुरस्कारिला. मँचेस्टरच्या कापडाऐवजीं जावाच्या साखरेवर बहिष्कार घालण्याच्या त्यांच्या सूचनेंत हीच दृष्टि अभिप्रेत आहे. † बहिष्काराकडे पाहण्याच्या टिळक व गोखले ह्यांच्या दृष्टींतील हा फरक मध्यमवर्ग व

---

§ The co-opeartion of government in certain matters of Industrial progress is thus essential; and those who have occasion to talk of the swadeshi question should not fail to realize that a great responsibility rests upon them. They only unnecessarily increase the difficulties in our path when they talk as though we could do without government assistance in the matter; and thereby they damage without meaning to do so, such chances as exist for real industrial progress."

ibid, p. 1127.

† " If we make up our minds to encourage Indian sugar as far as possible, and in this case I am glad to be able to say ' have nothing to do with foreign sugar ' we

भांडवलदारवर्ग यांच्यांतील परिस्थितिभेदामुळें उत्पन्न झाला आहे. मात्र गोखल्यांच्या विचारसरणीला जरी भांडवलदारी तत्त्वज्ञानाचें अधिष्ठान होतें, तरी त्यांचा पिंड मध्यमवर्गीय संस्कारांनीं घडलेला होता. म्हणून मनानें लोकांच्या जवळ असल्यानें स्वदेशी चळवळीच्या निमित्तानें टिळकांप्रमाणेंच गोखल्यांनाहि जनतेच्या सामर्थ्याची प्रचीति आली. पण प्रादेशिक परंपरेच्या अभावीं फेरोजशहांसारख्या भांडवलदारांच्या प्रतिनिधींना ती येऊं शकली नाहीं. म्हणून बहिष्काराच्या चळवळीबद्दल ते सुरवातीस उदासीनच राहिले. त्यांच्या सहकार्याच्या अभावीं या क्षेत्रांतील टिळकगोखल्यांचे प्रयत्नहि तोकडे ठरले.

तसें पाहिलें तर टिळकांपेक्षां गोखल्यांचें तत्त्वज्ञान अधिक व्यापक व मूलगामी होतें. पण जनतेशीं प्रत्यक्ष संबंध न राखल्यामुळें त्यांना लोकमताचा पाठिंबा मिळाला नाहीं. टिळकांनीं राष्ट्रवादांत सांस्कृतिक आशय ओततांना प्रादेशिक प्रश्नांकडे अधिक जिव्हाळ्यानें पाहिलें. त्यामुळें त्यांची विचारसरणी महाराष्ट्रांत ताबडतोब रुजली. मात्र महाराष्ट्रीय प्रश्नांचा विचार आणि मराठी माध्यम यामुळें इतर प्रांतांना त्यांच्या भूमिकेची व व्यक्तिमत्त्वाची ओळख लवकर पटली नाहीं. पण राष्ट्रसभा काबीज करण्याची ईर्षा धरल्यावर त्यांना इतर प्रांतांच्या चळवळीशीं अधिक समरस व्हावें लागलें. फाळणीनें चिडून गेलेल्या बंगाली लोकांना सक्रिय सहानुभूति दाखविण्यासाठीं त्यांनीं महाराष्ट्रांतहि बहिष्काराची मोहीम सुरू केली. मात्र पुढाऱ्यांची विचारसरणी कितीहि निर्दोष व सुसंगत असली, तरी पक्षाचें धोरण आणि कार्यक्रम, प्रचार आणि प्रभाव हा त्याच्या अनुयायांवर अवलंबून असतो. त्यांची वृत्ति आणि वकूब, त्यांच्या प्रेरणा आणि पूर्वग्रह यांतूनच कोणत्याहि चळवळीचें स्वरूप अखेर निश्चित होतें. सावरकरांना स्वतःला समाजसुधारणा मान्य असली, तरी त्यांचे सहकारी सनातनी व धर्मनिष्ठ असल्यानें मध्ययुगीन परंपरेच्या शृंखला त्यांना तोडतां आल्या नाहींत. टिळकांची दृष्टि परिवर्तनशील व लोकाभिमुख होती; तरीपण संकुचित वृत्तीच्या त्यांच्या पुराणमतवादी

---

should be able with the co-operation of the government, in a brief time to produce all the sugar we want."

Gokhale : *Speeches*, p. 1128.

अनुयायांनीं त्यांच्या चळवळींतील लोकशाहीचा आशय नेमका डावलून टाकला. गोखले स्वतः निष्ठावान्, निःस्पृह व स्वार्थत्यागी होते, परंतु नेमस्त-संप्रदायांत संधिसाधु व सरकारधार्जिण्या लोकांचा भरणा असल्यामुळें त्यांच्या पक्षांत मिंधेपणाचें व निष्क्रियतेचें प्राबल्य माजलें. म्हणूनच युगायुगांची हिंदु समाजाची विशिष्ट घडण बदलून राष्ट्रीयत्वाचा नवा अहंकार निर्माण करण्यांत या तिन्ही प्रवृत्तींना म्हणण्याजोगें यश आलें नाहीं. त्यांच्या चळवळीच्या लाटा बहुधा नागरी जीवनाच्या आवारांतच घोटाळत राहिल्या. ग्रामीण जीवनाची तटबंदी त्यांना कधींच उध्वस्त करतां आली नाहीं.

तत्कालीन धर्ममीमांसा, अध्यात्मविचार, इतिहाससंशोधन आणि ललित वाङ्मय इत्यादि सर्व क्षेत्रांत या परंपरानिष्ठ राष्ट्रवादाचे पडसाद उमटले आहेत. टिळकांनीं ‘ गीतारहस्या ’ मध्यें येथील अध्यात्मवादाची युरोपांतील आधुनिक विचारप्रवाहांशीं तुलना करून भारतीय तत्त्वज्ञानाचें श्रेष्ठत्व सिद्ध केलें. खरे–राजवाडे इत्यादिकांनीं मराठेशाहीच्या इतिहासाचें संशोधन करून मराठी रक्तांतहि शौर्य, पराक्रम, मुत्सद्देगिरी आणि संघटनाचातुर्य इत्यादि गुण वसत असल्याचें सप्रमाण शाबित केलें. खाडिलकर, परांजपे, कोल्हटकर, आपटे, नाथमाधव, विनायक आणि गोविंद इत्यादि लेखकांनीं आपआपल्या ग्रंथांतून पूर्वजांच्या वैभवाची व पराक्रमाचीं स्फूर्तिदायक चित्रें रेखाटून लोकांचा स्वाभिमान व राष्ट्रहितबुद्धि जागृत करण्याची शिकस्त केली. मात्र काव्य, इतिहास आणि धर्मग्रंथ यांचें जरी या काळांत खूप संशोधन झालें, तरी त्यांचें समीक्षण व मूल्यमापन करण्याची दृष्टि केवळ प्रचारनिष्ठ व उपयुक्ततावादी होती. चालू राजकीय चळवळींना अन्य क्षेत्रांतहि अवास्तव महत्त्व देऊन त्यांना पोषक असणारा अर्थ जुन्या घडामोडींवर लादण्याकडे त्यांचा कल होता. म्हणून त्यांमधून हिंदुस्थानच्या इतिहासांतील निरनिराळ्या घटनांचे व प्रवाहांचें यथायोग्य व शास्त्रशुद्ध मूल्यमापन होऊं शकलें नाहीं. म्हणून इतिहासज्ञांना मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेंत राष्ट्रवादाचा आविष्कार दिसला, आणि जातिव्यवस्थेंत श्रमविभागाचा आशय आढळला. आधुनिक प्रवृत्तींना जुन्या भारतीय परंपरेच्या कोंदणांत बसविण्याच्या ह्या वृत्तीमुळें सामाजिक प्रश्नांबद्दल मूलगामी विचार कधीं झाला नाहीं. तात्कालिक व

फुटकळ सुधारणांचा लोकांनीं व्यवहारांत अंगीकार केला. पण समाजांतील निकोप व प्रगमनशील प्रवृत्तींची जोपासना केली नाहीं. लोकांच्या उत्सवप्रियतेचा व धर्मश्रद्धेचा नेत्यांनीं फायदा घेतला; पण त्यांच्यांत खंबीर व डोळस कार्यनिष्ठा निर्माण होण्यास आवश्यक असणारीं नवीं सामाजिक मूल्यें त्यांनीं स्वीकारलीं नाहींत. आपल्या राष्ट्राचा गौरव करण्याच्या सदिच्छेनें का होईना, पण त्यांनीं कळत नकळत पाश्चात्य सुधारणांचा विपर्यास केला; आणि मध्ययुगीन मूल्यांचा उदोउदो करून सुधारणाविरोधी प्रवृत्तींना प्रोत्साहन दिलें. लोकशाही, लोकसंपर्क, प्रजापक्षीय राजनीति इत्यादि कल्पना शेवटीं पुढाऱ्यांच्या लेखांतच राहिल्या. प्रत्यक्ष समाजजीवनांत त्यांचा योग्य परिपोष कधींच होऊं शकला नाहीं.

टिळकांच्या तुरुंगवासाच्या काळांत राष्ट्रीय चळवळीची बरीच पीछेहाट झाली. सरकारच्या दडपशाहीनें मूठभर तरुणांच्या दहशतवादाचा बीमोड तर झालाच, पण राज्यकर्त्यांचा रोष ओढवून घेणें मध्यमवर्गाला झेपण्या-सारखें नसल्यामुळें बहिष्काराची चळवळ हळुहळू थंडावत गेली. राष्ट्रीय प्रवृत्तीच्या पुढाऱ्यांना व पत्रकारांना सरकारनें भराभर शिक्षा ठोठावल्यामुळें जहाल संप्रदायाची वाताहत झाली. म्हणून टिळकांच्या गैरहजेरींत राष्ट्रसभा पुन्हा मवाळांच्याच हातांत राहिली. नेमस्तांनीं मोर्लेमिंटो सुधारणांचें स्वागत करून सरकारशीं सहकार्याचें धोरण अवलंबिलें. लोकांची राजकीय जाणीव आणि अपेक्षा यांच्या मानानें त्या सुधारणा अगदींच तोकड्या असल्यामुळें जनतेची अगतिकता व नैराश्य कायमच राहिलें.

### तत्त्वजिज्ञासा आणि सत्यान्वेषण

लढाऊ राजकारणाची अशा रीतीनें विल्हेवाट लागल्यावर राष्ट्रीय चळवळींतील अंतर्मुख वृत्तीचे विचारवंत आत्मसंशोधनाकडे वळले. वामन मल्हार जोशी हे महाराष्ट्रीय जीवनांतील या नव्या प्रवृत्तीचे प्रतिनिधि होत. सनातनी आणि सुधारक, जहाल आणि मवाळ यांच्यांतील कलह म्हणजे केवळ दोन पक्षांची स्पर्धा नव्हे, दोन नेत्यांचें भांडण तर नव्हेच नव्हे; तर त्याच्या मुळाशीं कांहीं भरीव तात्त्विक अधिष्ठान आहे अशी त्यांची खात्री होती. म्हणून या सामाजिक प्रवृत्तींची सांगोपांग छाननी करून त्यांच्या

समन्वयाची त्यांनीं खटपट आरंभिली. राजकीय प्रश्नांचें महत्त्व व निकड त्यांना मान्य होती. पण सामाजिक सुधारणेकडे दुर्लक्ष करून यापुढें चालणार नाहीं अशी त्यांची मनोदेवता त्यांना ग्वाही देत होती. टिळकांच्या जहाल प्रतिकारवादानें त्यांना आकर्षून घेतलें. त्याबरोबरच आगरकरांचा बुद्धिवाद आणि गोखल्यांची विधायक दृष्टि यांची त्यांनीं उपेक्षा केली नाहीं. तात्कालिक प्रश्नांच्या पलीकडे जाऊन त्यांनीं मूलतत्त्वांची चिकित्सा सुरू केली. अध्यात्मवाद व भौतिकवाद, शब्दप्रामाण्य व अंतःप्रेरणा, समाजनियमन व व्यक्तिस्वातंत्र्य इत्यादि गोष्टींचा त्यांनीं सूक्ष्मपणें व साकल्यानें विचार केला. पक्षाभिमानापेक्षां देशहितावर दृष्टि ठेवून प्रत्येक बाबीचा सत्यान्वेषण बुद्धीनें व स्वतंत्रपणें विचार करण्याची त्यांची प्रवृत्ति होती. जुन्या परंपरेचा रास्त अभिमान बाळगूनहि पाश्चात्य विचारप्रवाहांची सहानुभूतिपूर्वक दखल घेण्याचें धोरण त्यांनीं अंगीकारलें. राष्ट्रवाद व सुधारणावाद दोन्ही एकांगी वाटल्यामुळें सामाजिक प्रगतीच्या दृष्टीनें त्यांचा मेळ घालण्याची त्यांना उत्कंठा होती. परंतु वामनरावांची भूमिका तत्त्वचिंतकाची असल्यामुळें त्यांनीं या परस्परविरोधी विचारप्रणालींचें विश्लेषण केलें; पण प्रत्यक्ष कृतीच्या प्रवाहांतूनच सिद्ध होणारें त्यांचें ऐक्य त्यांना तत्त्वचर्चेनें साधतां आलें नाहीं यांत कांहींच नवल नाहीं. पुढें गांधीजींच्या विचारांत आणि राजकारणांत या दोन्ही प्रवृत्तींचा संगम झालेला आपणांस दिसून येतो. पण त्यापूर्वींच महाराष्ट्रांतील कांहीं लोकांचीं मनें या मिलाफाला हळुहळू तयार होत होतीं याचें वामनरावांच्या विचारांत आपणांस चांगलें प्रत्यंतर येतें.

## असंतोष आणि अगतिकता

१९१४ सालीं जगावर पहिल्या महायुद्धाचें संकट ओढवलें. जर्मनीच्या बेलगाम साम्राज्यवादी आकांक्षांना बांध घालण्याचा मुख्य भार इंग्लंडला सहन करावा लागला. इंग्लंडच्या या संकटकालीं राजनिष्ठेनें त्याला मदत करणें हिंदुस्थानांतील राष्ट्रवाद्यांनाहि आपलें कर्तव्य वाटलें. म्हणून त्यांनीं लोकशाही राष्ट्रांना आपला नैतिक पाठिंबा असल्याचें जाहीर केलें. लहानलहान राष्ट्रांचा स्वयंनिर्णयाचा हक्क अबाधित राखणें हा पाश्चिमात्य राष्ट्रांचा युद्धहेतु आहे अशी अमेरिकेचे अध्यक्ष विल्सन यांनीं युद्ध चालू असतांना घोषणा केली होती. म्हणून युद्धांतील विजयानंतर ब्रिटिश साम्राज्याची पुनर्घटना होऊन

हिंदुस्थानलाहि स्वराज्याचे हक्क देण्यांत येतील अशी हिंदी लोकांनीं आशा धरली. युद्धजन्य परिस्थितीच्या आघातानें हिंदी लोकांची जडता व औदासीन्य पार नष्ट होऊन गेलीं. त्यामुळें लोकजागृतीबद्दल बेफिकीर असणारे मवाळ हळुहळू निष्प्रभ ठरून जहाल पक्ष आघाडीवर येत चालला. युद्धामुळें चालून आलेल्या संधीचा फायदा घेऊन साम्राज्यसरकारकडे स्वराज्याची एकमुखी मागणी करावी या हेतूनें टिळक सर्व पक्षांची एकजूट करण्याच्या खटपटीस लागले. हिंदु-मुसलमान, जहाल-मवाळ या सर्वांच्या व्यापक राष्ट्रहितबुद्धीला त्यांनीं आव्हान केलें; आणि स्वराज्यसंघाची चळवळ सुरू केली. या व इतर तत्सदृश चळवळींचा थोडाबहुत परिणाम होऊन १९१९ सालीं इंग्रजसरकारला नव्या सुधारणांचा हप्ता देणें भाग पडलें. मॅंटेग्यु–चेम्सफर्ड सुधारणांनीं राष्ट्रवाद्यांचें समाधान झालें नाहीं. तरी देखील शक्य तेथें सहकार्य व अवश्य तेथें प्रतिकार असें प्रतिसहकारवादाचें धोरण त्यांनीं अवलंबिलें.

राष्ट्रसभेनें सहकार्यासाठीं पुढें केलेला हात झिडकारून सरकारनें दडपशाहीला सुरवात केल्यावर लोकांचीं मनें अधिकच प्रक्षुब्ध झालीं. युद्धकालांत हिंदुस्थानांतील उद्योगधंद्यांची कांहीं प्रमाणांत वाढ झाल्यामुळें भांडवलदार व कामगार हे दोन वर्गहि संख्येनें व संघटनेनें प्रबळ होऊं लागले होते. त्यांच्या शक्तीचा उपयोग करून घेण्यास विचारानें आणि प्रवृत्तीनें मध्यमवर्गीय नेतृत्व उणें पडूं लागलें; आणि सर्वसंग्राहक अशा नव्या तत्त्वज्ञानाची व परिणामकारक प्रतिकारतंत्राची राष्ट्रीय चळवळीला गरज वाटूं लागली. अशा वेळीं गांधीजींनीं आपला अहिंसात्मक असहकाराचा कार्यक्रम देशापुढें ठेवला; आणि राष्ट्रीय अपमानाची भरपाई करण्याच्या बुद्धीनें देशांतील लक्षावधि लोकांनीं तो हिरीरीनें उचलून धरला. त्यापूर्वींच खेडा आणि चंपारण्य येथील लढे लढवून त्यांनीं शेतकऱ्यांची सहानुभूति संपादन केली होती. अहमदाबादच्या मजूरांची संघटना करून त्यांचीं अंतःकरणें त्यांनीं जिंकून घेतलीं; आणि आपल्या हक्कांसाठीं सत्याग्रही तंत्रानें झगडण्याची त्यांना शिकवण दिली. गांधीजींचें नेतृत्व व कार्यपद्धति यांच्यापुढें ज्वलज्जहाल, जहाल आणि मवाळ हे तिन्ही पक्ष फिके पडले; आणि त्यांच्या मार्गदर्शनाखालीं नवे वर्ग व नव्या शक्ति राजकीय चळवळीच्या आखाड्यांत उतरल्या.



: ५ :

# राष्ट्रसभा आणि गांधीवाद

१ ऑगस्ट १९२० रोजीं गांधीप्रणीत अहिंसात्मक असहकाराच्या चळवळीनें हिंदी राजकारणांतील एका नवीन युगाला प्रारंभ झाला. स्वयंनिर्णयाच्या तत्त्वासाठीं पहिलें महायुद्ध लढलें गेलें. तेव्हां त्यांत भाग घेणारीं पाश्चात्य राष्ट्रें हिंदी स्वराज्याच्या मागणीस मनःपूर्वक पाठिंबा देतील; आणि युद्धकालांतील हिंदुस्थानची कामगिरी विचारांत घेऊन ब्रिटिश सरकारहि स्वेच्छेनें सत्तादानास तयार होईल अशी पुष्कळांची अपेक्षा होती. परंतु १९१९ च्या सुधारणा–कायद्यानें ती साफ चुकीची ठरली. त्यांत रौलट ॲक्टच्या निमित्तानें पंजाबांत झालेल्या अनन्वित अत्याचारांची आणखी भर पडून लोकांचीं मनें अधिकच प्रक्षुब्ध झालीं. या अमानुष हत्याकांडाचा अखिल भारतांतून एकमुखानें तीव्र निषेध झाला असतांहि त्याला जबाबदार असणाऱ्या अधिकाऱ्यांना योग्य शासन मिळालें नाहीं; इतकेंच नव्हे तर इंग्लंडमध्यें त्यांचें राजरोस कौतुक झालें; आणि पार्लमेंटांत जेव्हां हा प्रश्न चर्चेस निघाला, तेव्हां हिंदी लोकमताबद्दल पराकाष्ठेची बेफिकीर वृत्ति दिसून आली. त्यामुळें पंजाब–प्रकरण म्हणजे चारदोन आततायी अंमलदारांची दंडुकेशाही नव्हे, तर ब्रिटिशांच्या बेजबाबदार राजनीतीचाच तो उद्वेगजनक

परिपाक होय ही गोष्ट अगदीं स्पष्ट होऊन चुकली; आणि इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या संबंधांत विश्वासाचा व सहानुभूतीचा लवलेशहि उरला नाहीं. तसेंच युद्धाचें पर्यवसान कांहीं होवो, खलिफाचे अधिकार व प्रतिष्ठा यांना बाध येणार नाहीं अशा समजुतीनें मुसलमान सैनिक इंग्लंडच्या बाजूनें लढले. परंतु पुढें ब्रिटन आपल्या अभिवचनास जागलें नाहीं. त्यामुळें हिंदी मुसलमानांच्या राजनिष्ठेला जबर धक्का बसला. प्रजेचा स्वाभिमान व हित-संबंध यांची यत्किंचितहि चाड न बाळगणाऱ्या सरकारला कशा रीतीनें वठणीवर आणावयाचें हा सर्वांनाच मोठा पेंच पडला. अर्जविनंत्या व शिष्ट-मंडळें हे पूर्वापार प्रचलित असलेले मार्ग आतांपर्यंतच्या अनुभवांवरून निकामी ठरले होते. अशा राष्ट्रीय मानहानीच्या प्रसंगीं सनदशीर उपाय खुंटतांच युरोपांतील जनतेनें बहुधा सशस्त्र क्रांतीचा अवलंब केला होता. परंतु हिंदु-स्थानसारख्या निःशस्त्र, असंघटित व अवाढव्य देशाला हा मार्ग परवडण्यासारखा नव्हता. सनदशीर चळवळीची निष्फळता व सशस्त्र क्रांतीची अव्यवहार्यता यामुळे निर्माण झालेली कोंडी फोडण्याची ताकद जुन्या पुढाऱ्यांत नव्हती. अशा परिस्थितींत सार्वभौम सरकारला हिंदी लोकमतापुढें मान तुकवून वरील अन्यायाचें परिमार्जन करण्यास भाग पाडण्यासाठीं महात्माजींनीं अहिंसात्मक असहकाराचा कार्यक्रम जनतेपुढें मांडला. त्यांत सनदशीर चळवळींतील संयम व जबाबदारी आणि सशस्त्र क्रांतींतील स्फूर्ति व पराक्रम यांचा अंतर्भाव झालेला होता. त्यामुळें राष्ट्रीय अपमानाची भरपाई करण्यास अधीर बनलेल्या लाखों स्त्रीपुरुषांनीं त्यांत अभूतपूर्व उत्साहानें भाग घेतला. तुरुंगवास पत्करून, लाठीमार सोसून, प्रसंगीं गोळीबारालाहि तोंड देऊन आपल्या देशाभिमानाची व स्वातंत्र्यप्रीतीची त्यांनीं जगाला साक्ष पटवून दिली.

असहकारितेच्या या देशव्यापी आंदोलनामध्यें पुढाऱ्यांना व कार्य-कर्त्यांना जनतेंतील सुप्त सामर्थ्याचा जो प्रत्यय आला, त्यामुळें राष्ट्रसभेचें स्वरूप पार बदलून गेलें. तिचें ध्येय व धोरण, रचना व कार्यक्रम अधिकाधिक लोकाभिमुख होत जाऊन ब्रिटिश पार्लमेंटप्रमाणें ती अल्पावकाशांतच आम हिंदी जनतेची प्रातिनिधिक संघटना बनली. नागपूरच्या अधिवेशनांत साम्राज्यांतर्गत स्वराज्य, सनदशीर चळवळ, आस्तेकदम सुधारणा इत्यादि

तपशीलाच्या बाबी रद्द करून ‘ न्याय्य व शांततामय मार्गांनीं स्वराज्याची प्राप्ति ’ या मोजक्या शब्दांत सुटसुटीतपणें राष्ट्रसभेनें आपल्या ब्रीदाची फेरमांडणी केली. शक्य तर साम्राज्यांत राहून, पण जरूर तर साम्राज्यांतून फुटूनहि स्वराज्य मिळविण्याचा निश्चय तिनें जाहीर केला. त्यापूर्वीच गांधीजींनीं अलीबंधूंसह हिंदुस्थानभर दौरा काढला होता. एवढ्या मोठ्या बलाढ्य सरकारला उघड आव्हान देणारा एक समर्थ महात्मा म्हणून तीस कोटि लोक त्यांच्याकडे श्रद्धेनें व भक्तिभावानें पाहात होते. ‘ एका वर्षांत स्वराज्य ’ या त्यांच्या मंत्रवाक्यानें देशांतील सर्व वातावरण भारलें गेलें. त्यांच्या नेतृत्वाखालीं कॉंग्रेसनें खादीप्रसारापासून स्वयंसेवक–भरतीपर्यंत, पिकेटिंगपासून करबंदीपर्यंत ज्या नानाविध चळवळी केल्या, त्यामुळें सरकारचा दरारा नाहींसा झाला, राजसत्तेचें नैतिक अधिष्ठान धुळीस मिळालें. पुढें या चळवळींचा जोम ओसरला, तरी कॉंग्रेसचें वजन कायमच राहिलें. कौन्सिलप्रवेशास राष्ट्रसभेची मान्यता मिळाल्यावर स्वराज्यपक्षाच्या अधिकृत उमेदवारांनीं विधिमंडळांत प्रवेश केला, व तेथेंहि अडवणुकीच्या धोरणानें स्वराज्याचा प्रश्न धसास लावण्याची त्यांनीं खटपट चालू ठेवली. इकडे गांधींचे कट्टर अनुयायी विधायक कार्यांत गढून गेले; आणि खादी व दलितोद्धार यांच्या द्वारें त्यांनीं खेड्यांतील दैनंदिन जीवनाशीं कॉंग्रेसचा प्रत्यक्ष संबंध जोडला.

रशियांतील कम्युनिस्ट राज्यक्रान्ति व युरोपांतील समाजवादी आंदोलनें यांचाहि येथील तरुण मनावर अप्रत्यक्षपणें प्रभाव पडूं लागला होता. युरोपच्या व रशियाच्या दौऱ्यामधून समाजवादी संस्कार घेऊन आलेल्या जवाहरलाल नेहरूंनीं १९२७ च्या राष्ट्रसभेमध्यें संपूर्ण स्वातंत्र्य हेंच कॉंग्रेसचें अंतिम ध्येय असल्याचा ठराव पास करून घेतला; व त्याच्या प्रचारासाठीं युवकसंघ व स्वातंत्र्यसंघ या संस्था स्थापन केल्या. हिंदुस्थानच्या शासनपद्धतींत कोणता फेरफार करणें आवश्यक आहे याविषयीं पार्लमेंटला शिफारशी करण्यासाठीं ब्रिटिश सरकारनें याच सुमारास सायमन–कमिशनची योजना केली होती. ह्या कमिशनमध्यें एकहि हिंदी प्रतिनिधि घेतलेला नसल्यामुळें त्यावर बहिष्कार घालण्याचा हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व पक्षांनीं निर्णय घेतला; व परस्परांच्या सहकार्यानें तो अंमलांतहि आणला. विधि-

मंडळांतील राष्ट्रसभावाद्यांना निरनिराळ्या पक्षांच्या व जातींच्या प्रतिनिधींची भूमिका वारंवार विचारांत घ्यावी लागे. त्यामुळें स्वराज्याच्या एकमुखी मागणीची कल्पना बळावत गेली, आणि देशांतील सर्वपक्षीय प्रमुख पुढाऱ्यांचें जास्तींत जास्त सहकार्य संपादून राष्ट्रसभेच्या आदेशानुसार नेहरू-कमिटीनें साम्राज्यान्तर्गत स्वराज्याचा आराखडा तयार केला. तो स्वीकारण्यासाठीं इंग्रज सरकारला एक वर्षाची मुदत देण्यांत आली. पण तिचा कांहींच उपयोग झाला नाहीं. म्हणून १९२९ अखेर लाहोर येथें वसाहतीच्या स्वराज्याची ही योजना रद्द करून राष्ट्रसभेनें संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास केला; आणि अवघ्या तीनचार महिन्यांतच कायदेभंगाची प्रचंड चळवळ उभारून देशाच्या कानाकोपऱ्यांत स्वातंत्र्याचा संदेश नेऊन पोहोंचविला. सरकारनें खूप दडपशाही करून पाहिली. परंतु चळवळीचा जोर कमी झाला नाहीं. उलट, सरकारला राष्ट्रसभेच्या नेत्यांशीं बोलणीं करणें भाग पडलें; व त्यांतून गांधी-आयर्विन करार झाला. या करारामुळें जगांत कॉंग्रेसची प्रतिष्ठा पुष्कळच वाढली. राष्ट्रसभेचे एकमेव प्रतिनिधि म्हणून गांधीजी गोलमेज परिषदेला गेले; व तेथें राष्ट्रसभेची भूमिका त्यांनीं स्पष्ट केली. गांधीजी इंग्लंडहून परत येण्यापूर्वीच सरकार आणि कॉंग्रेस यांतील सलोख्याचें वातावरण नाहींसें झालें होतें. बंगाल, पंजाब व सरहद्दप्रांत या ठिकाणीं वटहुकुमांचें राज्य सुरू झालें होतें. अब्दुल गफारखान व जवाहरलाल नेहरू यांना अटक करण्यांत आली होती. अशा स्थितींतहि महात्माजींनीं एकंदर परिस्थितीचा खुलासा करून घेण्यासाठीं व्हाइसरॉयची मुलाखत मागितली. परंतु बिनशर्त विचारविनिमय करण्याचें त्यांनीं नाकारल्यामुळें महात्माजींना पूर्वी तहकूब केलेली कायदेभंगाची चळवळ पुन्हा सुरू करणें भाग पडलें.

कायदेभंगाची ही चळवळ थांबविल्यानंतर १९३४ मध्यें राष्ट्रसभेनें मध्यवर्ती विधिमंडळाच्या निवडणुका लढविल्या; व मध्यंतरींच्या दडपशाहीमुळें कॉंग्रेस नामशेष झालेली नाहीं ह्याची सरकारला खात्री पटवून दिली. १९३५ सालीं नवा घटनाकायदा पास झाला. पण संस्थानिकांना दिलेल्या सवलती व व्हाइसरॉयचे राखीव अधिकार यामुळें लोकशाही कार्यपद्धतीला त्यांत मुळींच वाव नसल्यानें कॉंग्रेसनें त्याला विरोध केला; आणि सार्वत्रिक व प्रौढ मतदानाच्या

तत्त्वावर निवडलेल्या घटनासमितीची मागणी केली. या कायद्यांतील प्रांतिक स्वायत्ततेचें तत्त्व कॉंग्रेसला मान्य असल्यानें तिनें १९३७ च्या निवडणुकींत धडाडीनें भाग घेतला; व बहुमताच्या जोरावर सात प्रांतांत मंत्रिमंडळें स्थापन केलीं. १९३९ सालीं युरोपांत दुसऱ्या महायुद्धाला तोंड फुटलें. त्यावेळीं येथील लोकांची संमति न घेतां हिंदुस्थान हें युध्यमान राष्ट्र असल्याचें इंग्रज सरकारनें जाहीर केल्यामुळें सरकारी धोरणाचा निषेध करण्यासाठीं कॉंग्रेस मंत्र्यांनीं राजीनामे दिले. हुकूमशाहीचा पराभव करून लोकशाहीचा बचाव करणें हाच संयुक्त राष्ट्रांचा युद्धहेतु असल्याचें इंग्लंडनें जाहीर केलें होतें. जगाला त्याची साक्ष पटविण्यासाठीं त्यानें हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची घोषणा करावी अशी राष्ट्रसभेची मागणी होती. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं इंग्लंडवर आघात करण्याची हिंदी लोकांना मुळींच इच्छा नव्हती. म्हणून स्वातंत्र्याची हमी दिल्यास हिंदुस्थान शस्त्रबलानेंहि इंग्लंडच्या शत्रूविरुद्ध लढेल असें राष्ट्रसभेनें आपलें अहिंसेचें ब्रीद कांहीं काल बाजूस सारूनहि इंग्रज सरकारला आश्वासन दिलें. ब्रिटिशांनीं हा सहकार्याचा हात झिडकारल्यानंतरहि त्यांना अडचणींत आणूं नये या हेतूनें राष्ट्रसभेनें आपला विरोध वैयक्तिक सत्याग्रहा-पुरताच मर्यादित ठेवला. रशिया व आग्नेय आशिया या ठिकाणीं हुकुमशाही राष्ट्रांच्या होणाऱ्या विजयामुळें हिंदी लोकांचीं मनें भीतिग्रस्त होऊन गेलीं. त्याबरोबरच इंग्रजांबद्दलची द्वेषभावनाहि सारखी वाढत होती. समाजाचा नैतिक अधःपात टाळावयाचा असल्यास स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. म्हणून 'करेंगे या मरेंगे' या निर्धारानें १९४२ सालीं ब्रिटिशांना हिंदुस्थानांतून घालवून देण्याचा राष्ट्रसभेनें निश्चय केला. सरकारनें सर्व पुढाऱ्यांना अचानक तुरुंगांत डांबल्यावर लोकांनीं १९४२ सालीं स्वयंस्फूर्तीनें जी चळवळ केली, तिच्या योगानें कॉंग्रेसनें आपल्या कर्तृत्वाचा व लोकप्रियतेचा उत्कर्षबिंदु गांठला.

याप्रमाणें कॉंग्रेसच्या ध्येयांत ज्या मानानें व्यापकता व सुस्पष्टता आणि धोरणांत ज्या मानानें निश्चितता व परिणामकारकता येत चालली, त्या मानानें तिच्यांतील आदर्शवादाला वास्तवतेची, प्रक्षोभकतेला जबाब-दारीची, आणि लढाऊपणाला विधायक दृष्टीची जोड मिळाली; आणि उत्तरोत्तर राष्ट्राच्या आकांक्षेला व इभ्रतीला साजेशी भूमिका

घेऊन हिंदुस्थानांतील राष्ट्रवादाला तिनें उत्कृष्ट आकार आणला. वर्षांतून एकदां जमून नुसते कागदी ठराव करण्याऐवजीं आपल्या पाठीमागें लोकमताची संघटित शक्ति उभी करून तिनें एकाहून एक तीव्र असे पांच लढे लढविले. परकीयांच्या प्रतिकाराइतकेंच राष्ट्राच्या पुनर्घटनेला महत्त्व देऊन तिनें अस्पृश्यतानिवारणाचें व ग्रामोद्धाराचें कार्य हातीं घेतलें. कराचीच्या अधिवेशनांत मूलभूत हक्क व आर्थिक कार्यक्रम या विषयींचे जे ठराव पास झाले, त्यांमुळें स्वातंत्र्याच्या कल्पनेंत लोकशाहीचा आशय ओतला गेला. त्याच्याहि पुढें जाऊन १९३६ चा शेतकीविषयक कार्यक्रम व १९३७ चा निवडणूक जाहीरनामा यांमधून तिनें श्रमजीवी वर्गाच्या हितसंबंधांची दखल घेतली; व आर्थिक आणि सामाजिक क्षेत्रांत अधिकाधिक पुरोगामी धोरण स्वीकारलें. हिंदु–मुसलमान, स्पृश्यास्पृश्य, ब्राम्हणब्राम्हणेतर असा भेदभाव न करतां सर्व धर्मांच्या व जातींच्या लोकांची सहानुभूति तिनें संपादन केली. मजूर आणि भांडवलदार, शेतकरी व सावकार या सर्व वर्गांत राष्ट्रभावनेचा परिपोष करून त्यांना आपल्या चळवळींत तिनें सामील करून घेतलें. सुशिक्षितांप्रमाणें अशिक्षितांना, शहरवासीयांप्रमाणें खेडुतांना तिच्याबद्दल आपुलकी वाटावी म्हणून तिचीं कांहीं अधिवेशनें मुद्दाम खेड्यांत भरविण्यांत आलीं. कौन्सिलप्रवेश व कौन्सिलबहिष्कार, राष्ट्रवाद व वर्गवाद, अध्यात्मवाद व भौतिकवाद अशा निरनिराळ्या प्रवृत्तींवर श्रद्धा ठेवणाऱ्या कार्यकर्त्यांना तिनें एकजुटीनें काम करावयास लावलें.

राष्ट्रसभेच्या वाढत्या संसारांत तिच्या शाखोपशाखांची नीट व्यवस्था राखण्यासाठीं एका शिस्तबद्ध यंत्रणेची गरज होती. १९२० च्या नागपूर–कॉंग्रेसनें चार आणे देणारे प्राथमिक सभासद, त्यांनीं निवडून दिलेल्या तालुका, जिल्हा, प्रांत व अखिल भारत यांच्या कमिट्या व या सर्वांना मार्गदर्शन करणारी व आदेश देणारी वर्किंग कमिटी—याप्रमाणें ब्रिटिशांच्या हिंदी नोकरशाहीला प्रतिस्पर्धी अशी एक सुयंत्रित संघटना उभारली. राष्ट्रसभेच्या कार्याचा प्रचार करण्यासाठीं स्वयंसेवक दलांची स्थापना करण्यांत आली. विधायक कार्याच्या विस्ताराबरोबर एकेका विभागास पूर्णपणें वाहून घेणाऱ्या अखिल-भारतीय चरखा-संघ, हरिजन-सेवक संघ अशा स्वायत्त संस्थाहि अस्तित्वांत

आल्या. केवळ अंतर्गत प्रश्नांतच नव्हे तर आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतहि हिंदी राष्ट्राचें प्रतिनिधित्व करण्याची दक्षता घेऊन राष्ट्रसभेनें वेळोवेळीं जागतिक घडामोडीं-संबंधीं मतप्रदर्शन केलें; आणि आंतरराष्ट्रीय परिषदांना आपले प्रतिनिधि पाठवून जगाच्या राजकारणांत भाग घेण्यास सुरवात केली. हिंदी राष्ट्राच्या पृथगात्मतेचें प्रतीक म्हणून स्वतंत्र राष्ट्रध्वज, राष्ट्रगीत आणि राष्ट्रभाषा इत्यादि मानचिह्नें निश्चित करून जनतेच्या मनांत तिनें त्यांच्याबद्दल निष्ठा उत्पन्न केली. मोठमोठ्या चळवळींतून तावूनसुलाखून निघालेल्या या प्रबल संघटनेची दखल घेणें अखेर इंग्रजांना भाग पडलें; आणि हिंदी लोकांना शांततेच्या मार्गानें राजकीय स्वातंत्र्य मिळवून देण्याचें राष्ट्रसभेचें ध्येय १५ ऑगस्ट १९४७ रोजीं साध्य झालें.

## असहकार व कायदेभंग

१९२० नंतर राष्ट्रसभेचा हा जो कायापालट झाला, त्याला मुख्यतः गांधीजींचें अलौकिक व्यक्तिमत्त्व व असाधारण नेतृत्व कारणीभूत झालें आहे. रानडे व गोखले यांच्याप्रमाणें गांधींचाहि प्रथम ब्रिटिशांच्या न्याय-बुद्धीवर विश्वास होता. परंतु पंजाब व खिलाफत या दोन्ही प्रकरणांत त्यांना जो विपरीत अनुभव आला, त्यावरून सत्तांध सरकार व नोकरशाही फक्त कृतीची व बलाचीच भाषा ओळखतात अशी त्यांनीं आपल्या मनाशीं पक्की खूणगांठ बांधली. मात्र क्रांतिकारकांच्या साहसी कृत्यांनीं सरकारला दहशत बसण्याऐवजीं बहुधा दडपशाहीलाच उत्तेजन मिळतें; म्हणून व्यक्तिगत बहादुरीपेक्षां सामुदायिक प्रतिकारावर अधिक भर देणारा सत्याग्रहाचा मार्ग गांधींनीं शोधून काढला. असहकार व कायदेभंग हीं सत्याग्रहाचीं दोन प्रमुख अंगें होत. हिंदी लोकांच्या संमतीनें व त्यांच्या हितासाठीं आपण हिंदुस्थानचें राज्य चालवितों ह्या ब्रिटिशांच्या कोटिक्रमांतील मानभावीपणा उघड करून त्यांच्या राजनीतीचें पाशवी स्वरूप जगाच्या निदर्शनास आणणें हें असहकाराचें एक उद्दिष्ट होतें. 'इंग्रजांचें राज्य हें आपल्या सहकार्यावर आधारलेलें आहे, त्यांचीं कायदेमंडळें, न्यायालयें व शिक्षणसंस्था यांना मान्यता देऊन त्यांच्या सत्तेस आपण बळकटी आणीत आहोंत; हें सहकार्य, ही मान्यता जर आपण दिली नाहीं तर ब्रिटिशांना येथें एक दिवस देखील राज्य करतां येणार नाहीं' ह्या जाणिवेंतून

असहकाराच्या चळवळीचा जन्म झाला. गांधींच्या ध्येयवादाला व्यवहारदृष्टीचें वावडें नसल्यानें लोकांकडून त्यांनीं प्रथम कमींत कमी त्यागाची व धैर्याची अपेक्षा केली. जनमताचे निर्माते व प्रवक्ते म्हणून आतांपर्यंत पुढें आलेल्या वरिष्ठ वर्गांना त्यांनीं स्वार्थत्यागाचें व क्रियाशीलतेचें उदाहरण घालून देण्यास पाचारण केलें. त्यासाठीं सरकारनियुक्त मानाच्या जागा व पदव्या, शाळा-कॉलेजें, न्यायमंदिरें, कायदेकौन्सिलें आणि विदेशी माल यांवर बहिष्कार पुकारण्यांत आला. न्यायालयांतून व विद्यालयांतून बाहेर पडलेले वकील, शिक्षक आणि विद्यार्थी यांच्यामार्फत बहुजनसमाजांत जागृति घडवून आणून बहिष्कारापासून करबंदीपर्यंत असहकारितेचा चढता कार्यक्रम अंमलांत आणण्याची गांधींची योजना होती. स्वखुषीनें दिलें जाणारें सहकार्य जरी नाकारलें, तरी अनियंत्रित सत्तेच्या बळावर सरकार आपले जुलुमी कायदे व वटहुकूम जनतेवर लादणारच, तेव्हां हेंहि जोखड झुगारून देण्यासाठीं कायदेभंगाची मोहीम सुरू झाली. टिळकांच्या काळांत बहिष्काराच्या चळवळीचा जोर वाढला, तरी राजद्रोह आणि कायदेभंग यांच्याबद्दल लोकांच्या मनांत सारखी रुखरुख व न्यूनगंड होता. गांधीजींनीं सद्यःस्थितींत 'राजद्रोह हा काँग्रेसचा धर्म आहे', 'कायदेभंग हें हिंदी नागरिकांचें एक पवित्र कर्तव्य आहे' अशा घोषणा करून जनतेच्या मनावरील राजनिष्ठेचें व कायद्याच्या स्वतःप्रामाण्याचें दडपण उडवून दिलें. या चळवळींमुळें लोकांचा उत्साह अगदीं शिगेस जाऊन पोहोंचला; व सामान्य माणसांनींहि वीरोचित कृत्यें केल्यामुळें लोकांच्या मनांतील कायदा, पोलीस व तुरुंग यांची भीति साफ नाहींशी झाली. कायदेभंगाच्या प्रवृत्तीपासून देशांत अराजक माजूं नये म्हणून गांधींनीं या चळवळीस सत्य व अहिंसा यांच्या मर्यादा घातल्या. त्यांचें युद्धतंत्र अगदीं साधें व सरळ होतें. प्रतिपक्षाला अडचणींत टाकून त्याचा गैरफायदा घेणें त्यांना पसंत नव्हतें. तत्त्वासाठीं स्वयंप्रेरणेनें स्वतः क्लेश सहन करून विरोधकांमध्यें अन्यायाचें परिमार्जन करण्याची इच्छा निर्माण करणें ही सत्याग्रहामागील प्रेरणा होती. म्हणून इंग्रजी राज्य हें सैतानी आहे असें वारंवार म्हणत असतांहि त्यांनीं आपल्या चळवळीला इंग्रजद्वेषाचा संपर्क लागूं दिला

नाहीं. ज्यांतील अन्याय ढळढळीत आहे व जेथें तडजोडीस वाव आहे असे कायदे मोडण्याचें त्यांचें धोरण होतें. आपल्या किमान मागण्या स्पष्टपणें सरकारपुढें मांडून, जबाबदार अधिकाऱ्यांना वेळोवेळीं सत्याग्रहाची पूर्वसूचना देऊन, शेवटपर्यंत सन्मान्य तडजोडीची तयारी ठेवून आणि एक कायदा मोडतांना इतर सर्व कायदे दक्षतेनें पाळण्याचा अनुयायांना आदेश देऊन चळवळ आटोक्याबाहेर जाऊं नये म्हणून ते अतोनात काळजी घेत. स्वाभिमानाचा व सदसद्विवेकबुद्धीचा प्रश्न असेल व रक्तपाताचा संभव नसेल तर वैयक्तिक कायदेभंगास त्यांची नेहमीच अनुज्ञा होती. पण सामुदायिक कायदेभंगावर मात्र त्यांनीं फार कडक निर्बंध घातले होते. हिंदुस्थानसारख्या मागासलेल्या खंडप्राय देशांत हा कांटेकोरपणा, ही सावधगिरी आवश्यक होती. एका बाजूला अद्ययावत् शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज असें नोकरशाहीचें राज्ययंत्र व दुसऱ्या बाजूला शतकानुशतकें गुलामगिरींत खितपत पडलेली निर्बल व निःशस्त्र जनता यांच्यामधील हा झगडा होता. तेव्हां सरकारच्या दडपशाहीवर निदान कायद्याचीं तरी बंधनें रहावींत या उद्देशानें टिळकांनीं प्रतिकाराची चळवळ कायद्याच्या कक्षेंत चालू ठेविली. पुढें कायद्याची चौकट तोडल्याखेरीज राजकीय चळवळीस भवितव्य नाहीं असें दिसून येतांच महात्माजींनीं कायदेशीरपणाचें हें बंधन काढून टाकलें. पण त्याबरोबरच सामुदायिक चळवळीस हुल्लडबाजीचें स्वरूप येऊं नये म्हणून त्यांनीं अहिंसेवर पदोपदीं जोर दिला, गुप्ततेचा व अत्याचारांचा सरौस निषेध केला. लोकप्रियता कमी होण्याचा धोका पत्करूनहि वेळोवेळीं आपल्या चुका कबूल केल्या. तसेंच अनुयायांकडून जेव्हां गैरशिस्तपणा झाला, तेव्हां त्याबद्दल कधीं त्यांनीं स्वतः प्रायश्चित घेतलें, कधीं जबाबदार व्यक्तींना जाहीर दिलगिरी प्रदर्शित करावयास लावली. त्यामुळें त्यांच्या चळवळीस नैतिक अधिष्ठान लाभलें. जगांत तिचा बराच बोलबाला झाला, आणि आपल्या आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठेस जपणाऱ्या ब्रिटिश सरकारला दडपशाही करतांना थोडेंबहुत तारतम्य राखणें भाग पडलें.

गांधींच्या व्यक्तित्वांत तत्त्व आणि व्यवहार यांचा उत्कृष्ट मिलाफ झालेला होता. म्हणून अंतर्गत यादवी टाळून निरनिराळे वर्ग आणि प्रवृत्ति

यांना एकत्र आणण्यांत चळवळीच्या प्राथमिक अवस्थेंत कां होईना त्यांना बरेंच यश आलें. तसेंच वरिष्ठ वर्गाचा पैसा आणि प्रतिष्ठा यांचा त्यांनीं आपल्या चळवळीसाठीं पुरेपूर फायदा करून घेतला, तरी त्यांची प्रवृत्ति मुळांत लोकाभिमुख होती. सर्वांना रुचतील व झेपतील असे कार्यक्रम पुढें मांडून त्यांवर आपल्या सगळ्या शक्ति केंद्रित करण्यास त्यांनीं लोकांना शिकविलें; आणि क्रमाक्रमानें चळवळीची कक्षा वाढवीत नेली. लोकांची नाडी त्यांच्या हातीं असल्यानें ह्या चळवळी सहसा आटोक्याबाहेर गेल्या नाहींत. परदेशी कापडाच्या होळीला मान्यता देऊन लोकांच्या भडकलेल्या भावनांना त्यांनीं वाट करून दिली; आणि त्यांच्या विध्वंसक प्रवृत्तीला व्यक्ती-कडून वस्तूकडे खेंचून लढ्यांतील अनत्याचारीपणाला एकप्रकारें दृढता आणली. † स्वतःचे प्राण पणाला लावूनहि देशांतील अत्याचारांना त्यांनीं वेळोवेळीं आळा घातला आणि चळवळ उच्च पातळीवर राखण्याची पराकाष्ठा केली. मात्र एवढ्या मोठ्या देशव्यापी लढ्यांत थोडेसें अतिक्रमण अटळ आहे याची गांधीजींना कल्पना होती. म्हणून आणीबाणीच्या वेळीं ते अहिंसेचा जप करीत बसले नाहींत; तर एकंदर परिस्थितीवरील पकड पक्की ठेवून चळवळीचा व्याप आणि वेग वाढविण्याकडे त्यांनीं लक्ष दिलें. § हिंदुस्थानच्या स्वातंत्र्या-साठीं लाख लोकांचे प्राण खर्ची पडले तरी हरकत नाहीं; पण लोकांत उमेद आहे तोंपर्यंत लढा चालू ठेवला पाहिजे, चळवळ पुढें रेटली पाहिजे अशी त्यांची भावना होती. म्हणून दर खेपेस त्यांच्या राजकीय चळवळी अधिकाधिक प्रखर होत गेल्या.

कायदेभंगाची कल्पना वस्तुतः निषेधपरच आहे. एकेक कायदा मोडल्यानें कोणतेंच सरकार कधीं उलथून पडत नाहीं. म्हणून सरकारी राज्ययंत्र

---

† "I am transferring the ill will from men to things."—Gandhi–from–D. G. Tendulkar: '*Mahatma*', Vol. II, p. 74.

§ "I would rather risk violence a thousand times than risk the emasculation of a whole race": Gandhi. ibid. p. 4.

खिळखिळें करूं पाहणाऱ्या स्वातंत्र्यसैनिकांना अखेर सत्ताग्रहणाची तयारी करावी लागते. राष्ट्रसभेनें 'उघड बंड' पुकारलें, तरी तिच्यापाशीं सत्ताग्रहणाची कोणतीच सुसंबद्ध योजना नसे. त्यामुळें पुढाऱ्यांना तुरुंगांत टाकतांच हळुहळू चळवळ थंडावत जाई. म्हणून गांधीजींच्या चळवळी बहुतांशीं निदर्शनात्मकच राहिल्या; आणि भारतीय व आंतरराष्ट्रीय लोकमताचें जास्तींत जास्त दडपण आणून राज्यकर्त्यांना वाटाघाटीस प्रवृत्त करण्यापलीकडे त्यांची मजल गेली नाहीं. स्वातंत्र्यसंग्रामांत हिंदी पुढाऱ्यांना ब्रिटिशांच्या सदिच्छेवर व मुत्सद्दीपणावर विसंबून राहून सत्तादानाची वाट पहावी लागली. मात्र ब्रिटिशांची मनोरचना बरोबर हेरून व हिंदुस्थानांतील परिस्थितीचें अचूक निदान करून प्रत्येक पाऊल टाकण्यांत गांधीजींनीं कमालीचें कौशल्य दाखविलें; आणि आंतरराष्ट्रीय परिस्थितीचा अनुकूल फासा पडतांच हें सत्तांतर शांततेनें झालेलें पाहण्याचें भाग्यहि त्यांना लाभलें.

## विधायक कार्यक्रम

गांधीजी स्वतःला गोखल्यांचे शिष्य म्हणवीत. एका अर्थानें तें खरें आहे. राजकारणांत साधनशुचिता, सत्यनिष्ठा, चारित्र्य यांची आवश्यकता गांधीजींप्रमाणें गोखल्यांनाहि मान्य होती. सामाजिक बाबतींत रानडे व गोखले यांची सर्वांगीण सुधारणावादाची परंपराच गांधीजींनीं अधिक कार्यक्षमतेनें पुढें चालविली. लोकांच्या आत्मिक उन्नतीसाठीं देखील त्यांचा आर्थिक उत्कर्ष साधण्याची, त्यांच्या अज्ञानाचा परिहार करण्याची व मानवी प्रगतीच्या आड येणाऱ्या इतर सर्व गोष्टी दूर करण्याची आवश्यकता आहे असें गांधीजींचें मत होतें. § राष्ट्रसभेनें समाजसुधारणेचें हें कार्य हातीं घ्यावें, तिच्या कार्यकर्त्यांनीं लोकांच्या दुःखांत सहभागी व्हावें, त्यांच्या अडीअडचणी समजून घ्याव्यात, त्यांचें औदासीन्य दूर करावें आणि अशा रीतीनें ती खऱ्याखुऱ्या अर्थानें जनतेची प्रतिनिधि बनावी, अशी गांधीजींची इच्छा

§ "True spiritual regeneration must include economic uplift and removal of ignorance and everything that goes to retard human progress." ibid. Vol. IV, p. 151.

होती. † मात्र प्रत्यक्ष कार्यावर त्यांचा सतत भर असल्यानें लोकशिक्षणासाठींहि त्यांनीं सेवेचा व त्यागाचाच मार्ग सुचविला, आणि सत्याग्रहाच्या चळवळीला विधायक कार्यक्रमाची जोड दिली. खादी, जातीय ऐक्य, अस्पृश्यतानिवारण, दलितोद्धार, दारूबंदी, ग्रामसंघटन, राष्ट्रीय शिक्षण आणि मजूरसंघटना इत्यादि विविध कार्यक्रमांच्या द्वारें समाजजीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत त्यांनीं प्रवेश केला. या कार्यक्रमांच्या निमित्तानें राष्ट्रसभेच्या कार्यकर्त्यांना खेडोपाडीं पाठवून समाजाच्या वेगवेगळ्या थरांत त्यांनीं जागृति घडवून आणली; आणि राष्ट्रीय चळवळीला बहुजनसमाजाचा प्रथमच पाठिंबा मिळवून दिला.

खादी आणि ग्रामोद्योग हे राष्ट्रसभेच्या विधायक कार्यक्रमाचें एक प्रमुख अंग होतें. एकोणिसाव्या शतकामध्यें इंग्रजांच्या स्पर्धेमुळें खेड्यांतील कारागिरीचा नाश झाला होता. दुय्यम व्यवसायाच्या अभावीं शेतकऱ्याला जमिनीच्या लहानशा तुकड्यावर आपल्या सर्व गरजा भागविणें कठिण होत चाललें होतें. अशा वेळीं ज्या चरख्याच्या उपेक्षेमुळें खेड्यांना दारिद्र्याची अवकळा आली, त्याचें पुनरुज्जीवन करून गांधींनीं खेड्याच्या आर्थिक उन्नतीचा पाया घातला. मात्र शेतकऱ्याला दुय्यम व्यवसाय पुरविणें एवढेंच कांहीं खादीच्या कार्यक्रमाचें उद्दिष्ट नव्हतें. या चळवळीच्या निमित्तानें उत्पादक व्यवसायांचें महत्त्व बुद्धिजीवी लोकांच्या मनावर बिंबवून गांधीजींनीं त्यांच्या मनांतील शारीरिक श्रमाबद्दलची तुच्छताबुद्धि नाहींशी केली. शहरांचें वैभव हें शेतकऱ्यांच्या पिळवणुकीवर आधारलेलें आहे याची त्यांनीं पांढरपेशा मध्यमवर्गाला सतत जाणीव करून दिली; आणि खेडुतांची सेवा करून त्यांचा ऋणानुबंध जोडण्यासाठीं शेंकडों सुशिक्षित तरुण त्यांनीं खेड्यामध्यें पाठविले. खादीला व्रताची योग्यता देऊन त्यांनीं आंग्लविद्याविभूषितांच्या पोषाखीपणाला पायबंद घातला; आणि ‘ गरजा कमी व श्रम जास्त ’ या तत्त्वाच्या प्रतिपादनानें व आचरणानें त्यांच्या विचारांत क्रांति घडवून आणली.

---

† " The Congress must progressively represent the masses. They are as yet untouched by the politics.... We must share their sorrows, understand their difficulties and anticipate their wants. " ibid. Vol. II, p. 194.

लोकसंग्रहाचें एक सुलभ साधन या दृष्टीनें चरख्याला अतिशय महत्त्व होतें. हिंदुस्थानांतील ग्रामीण जीवनाचा तो पुरातन व सर्वसामान्य घटक होता. इतकेंच नव्हे तर अन्न-आच्छादनाच्या प्राथमिक गरजेशीं तो निगडित असल्यामुळें हवापाण्याइतकीच खेड्याच्या सुस्थितीला त्याची आवश्यकता होती. * म्हणून महात्माजींनीं चरखा हा विधायक कार्याचा व ग्रामसंघटनेचा मध्यबिंदु कल्पिला, आणि त्याच्याभोंवतीं जुन्यानव्या अनेक व्यवसायांचा प्रपंच थाटला. त्यामुळें बहुजनसमाजाच्या सुखदुःखांशीं समरस होऊन त्याच्या राजकीय आकांक्षा जागृत करण्याची व राष्ट्रसभेबद्दल त्याच्या मनांत निष्ठा उत्पन्न करण्याची स्वयंसेवकांना संधि मिळाली. विधायक कार्यक्रमाच्या योगानें समाजांतील निरनिराळ्या वर्गांमध्यें व जातींमध्यें समतेचें व बंधुभावाचें वातावरण निर्माण झालें. खादीचा पंचा नेसून नियमितपणें ग्रामसफाई करणारे उच्चवर्णीय सुशिक्षित स्वयंसेवक पाहून खेडुतांच्या मनांतील सुशिक्षितांबद्दलचा दुजाभाव थोडा कमी झाला. गांधी-टोपी ही सहिष्णुतेची, सहानुभूतीची व सेवाधर्माची प्रतीक बनली. विधायक कार्यकर्त्यांचा स्वार्थत्याग व लोकसेवेची तळमळ यामुळें बहुजनसमाजाला त्यांच्याबद्दल आपुलकी वाटली. राजकीय चळवळ ही मूठभर सुशिक्षितांची मक्तेदारी नसून गरीबांपासून श्रीमंतांपर्यंत सर्वांनाच तिच्यामध्यें स्थान आहे अशी लोकांची खात्री पटली. म्हणूनच ते मोठ्या संख्येनें या चळवळींत सामील झाले. 'सुतानें स्वराज्य' ह्या वचनाचा उपहास करणाऱ्या लब्धप्रतिष्ठितांना चरख्याची ही महती कळली नाहीं. म्हणूनच गांधीजींच्या लोकप्रियतेचें वर्मही त्यांना उमगलें नाहीं.

* "It (the spinning wheel) has two aspects, terrible and benign. In its terrible aspect it is calculated to bring about the only boycott we need for independent national existence, namely, that of the foreign cloth. It alone can kill the demoralising British self-interest. In its benign aspect it gives a new life and hope to the villager. It can fill millions of hungry mouths. It alone can bring us in touch and in tune with the villagers. It is the very best popular education that is needed for the millions. It is life-giving." ibid. Vol. II, p. 183.

खेडीं व शहरें यांमधील दुवा म्हणून राजकीय दृष्ट्या चरखा कितीहि उपयुक्त ठरला, तरी गांधीजींची खादीविषयक अर्थमीमांसा शास्त्रशुद्ध नाहीं. चरखा आणि ग्रामोद्योग यांसारख्या चळवळींत हिंदुस्थानांतील शेतकरी–समाजाची उगवत्या भांडवलशाहीविरुद्ध झालेली स्वाभाविक प्रतिक्रिया दिसून येते. भांडवलदारी उत्पादनपद्धतीच्या प्राथमिक अवस्थेंत तिच्यांतील स्पर्धा व बेकारी, यांत्रिकता व असुरक्षितता यांच्या भीतीनें सुरक्षिततेवर आधारलेल्या जुन्या मध्ययुगीन व्यवस्थेकडे परतण्याची सुप्त इच्छा बहुतेक सर्व देशांतील सामान्य जनतेंत आढळून येते. उत्पादन-साधनांचा विकास झाल्यानें लोकांचें राहणीचें मान जसजसें सुधारलें, तसतशी पुढारलेल्या देशांतील लोकांची जुन्या अर्थव्यवस्थेबद्दलची ओढ कमी होत गेली; आणि आर्थिक उत्कर्षाबरोबर सांस्कृतिक विकासाचीं नवीं क्षितिजें त्यांच्या डोळ्यासमोर उभीं राहिलीं. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत भांडवलशाहीला उतरती कळा लागली. तेव्हां तिच्यांतील दोष अधिक तीव्रतेनें जाणवूं लागले. पण पुन्हां मागें परतून जुन्या समाजव्यवस्थेचें पुनरुज्जीवन करण्याची या वेळीं कोणाला इच्छा झाली नाहीं. भांडवलशाहीमुळें झालेले फायदे कायम राखून तिच्यांतील वैगुण्यें टाळण्यासाठीं स्पर्धा व करार यांऐवजीं सहकार्य व नियोजन यांवर आधारलेली नवी अर्थव्यवस्था निर्माण करण्याची युरोपांतील लोकांनीं महत्त्वाकांक्षा बाळगली. परंतु गांधीजींच्या वृत्तींत अध्यात्म-निष्ठा आणि व्यक्तिवाद यांचें प्राबल्य असल्यामुळें मार्क्ससारख्या समाजवादी तत्त्वज्ञाच्या विचारांकडे त्यांचें लक्ष गेलें नाहीं. उलट यंत्रसंस्कृतीवरील रस्किन, टॉल्स्टॉय, थोरो इत्यादि अंतर्मुख वृत्तीच्या व्यक्तिवादी तत्त्वचिंतकांची टीकाच त्यांना अधिक ग्राह्य वाटली.† सर्वत्र सदासर्वकाळ चाललेल्या द्रव्यपूजेंतून आजच्या समाजांतील निर्घृणता, विषमता आणि विरूपता निर्माण झाली आहे असें रस्किनचें मत होतें. रस्किनची ही भूमिका गांधीजींना पूर्णपणें मान्य होती. आध्यात्मिक मूल्यांना सोडचिठ्ठी देऊन संपत्ति, सत्ता असल्या भौतिक गोष्टींचा मानवानें ध्यास घेतल्यामुळें त्याची अधोगति झाली आहे. स्वैर धांवणाऱ्या इंद्रियांवर ताबा मिळवून आपल्या आवश्यक गरजा स्वावलंबनाच्या

---

† ibid. Vol. VI, p. 177.

जोरावर पुऱ्या करण्याचा प्रत्येकानें निश्चय केला, तर बेकारीचा व स्पर्धेचा प्रश्न आपोआप सुटेल, आणि मानवजातीला सहकार्यानें व सुखासमाधानानें राहतां येईल अशी त्यांची श्रद्धा होती. म्हणून स्वयंपूर्ण ग्रामराज्याची कल्पना लोकांपुढें मांडून त्यांनीं ग्रामसंस्थेच्या पुनरुज्जीवनाचें कार्य हातीं घेतलें.

इंग्रजी अमदानींत हिंदुस्थानांतील जुनी ग्रामसंस्था कोसळून पडली. पण परकीयांच्या स्पर्धेमुळें नव्या उद्योगधंद्यांची वाढ झाली नाहीं. म्हणून सुधारलेली राहणी, सामाजिक समता, वैचारिक स्वातंत्र्य व लोकसत्ताक राज्य-पद्धति इत्यादि नव्या समाजव्यवस्थेचे फायदे येथील लोकांना कधींच अनु-भवितां आले नाहींत. उलट, बेकारी, बकालीपणा, दारुण जीवनकलह इत्यादि दुष्परिणाम त्यांच्या वांट्याला आले. म्हणून नव्या संस्कृतीबद्दल जरी त्यांना कुतूहल वाटलें, तरी तिच्या इष्टानिष्टतेबद्दल त्यांच्या मनाचा लवकर निर्णय होईना. त्यामुळें त्यांची जुन्याची आवड कायम राहिली. स्वतः गांधीजी जरी रूढ अर्थानें पुराणमतवादी नव्हते, तरी त्यांच्या तत्त्वज्ञानांत लोकांची ही पुराणप्रियता प्रतिबिंबित झाली आहे. जुन्या अर्थव्यवस्थेची श्रेष्ठता त्यांनीं चिकित्सक पद्धतीनें प्रतिपादिली नाहीं. त्यांच्या अध्यात्मविचारांशीं सुसंगत असल्यामुळें आटोपशीर व स्वयंपूर्ण ग्रामसंस्था त्यांना साहजिकच विलोभनीय वाटली. हिंदुस्थानांतील बहुसंख्य लोकांनीं मात्र जुन्या खेड्यांच्या धर्तीवर नवी अर्थव्यवस्था उभारण्यास त्यांना कधींच अनुकूलता दर्शविली नाहीं. कारण, त्यांची ही विचारसरणी मानवाची नैसर्गिक प्रेरणा व इतिहासाचा ओघ या दोहोंच्याहि विरुद्ध आहे. आपल्या शारीरिक व मानसिक गरजा भागविण्याच्या आणि आपलें राहणीचें मान सुधारण्याच्या प्रेरणेमधून आतां-पर्यंत मानवजातीचा विकास झाला आहे. यांत्रिक शोधामुळें जीं नवींनवीं सुख-साधनें उपलब्ध झालीं, त्यांचा उपभोग एका विशिष्ट वर्गालाच फक्त घेतां आला; आणि बाकीच्या जनतेला बेकारी, महागाई, अतिश्रम किंवा रोगराई असलीं संकटें सहन करावीं लागलीं हें खरें आहे. पण त्याला उपाय म्हणजे यंत्रसंस्कृतीचा निषेध करणें हा नसून समाजाची पुनर्घटना करून तिला लोकहितार्थ राबविणें हाच होय. म्हणूनच राष्ट्रसभेनें प्रचारसाधन म्हणून जरी चरख्याचा गौरव केला, तरी गांधीजींच्या अर्थशास्त्राला तिनें कधींच

मान्यता दिली नाहीं. उलट, राष्ट्राच्या औद्योगीकरणाचीच तिनें वारंवार घोषणा केली.

गांधीजींच्या सुधारणावादाची प्रेरणा मानवतेची व दलितोद्धाराची आहे. सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक दृष्ट्या मागासलेल्या जातींना मदत करून त्यांना बरोबरीच्या नात्यानें वागविण्याची जबाबदारी त्यांनीं वरिष्ठ वर्गावर टाकली. दलितांना स्वतःच्या हक्कासाठीं कणखरपणानें व संघटित रीत्या झगडण्यास प्रवृत्त करण्याची भूमिका त्यांनीं स्वीकारली नाहीं. ग्रामोद्योगसंघ, चरखासंघ किंवा हरिजनसेवकसंघ ह्या शेतकऱ्यांच्या किंवा हरिजनांच्या संघटना नव्हत, § तर त्या वर्गाचा उद्धार करण्यासाठीं झटणाऱ्या कार्यकर्त्यांच्या संघटना होत. म्हणूनच समाजाची रचना आमूलाग्र बदलून मागासलेल्या वर्गाचे प्रश्न सोडविण्याऐवजीं त्यांनीं कांहीं व्यक्तींना विकासाची संधि दिली; व दलित वर्गांत थोडीबहुत जागृति घडवून आणली. ह्या संस्था कधींहि प्रातिनिधिक व लढाऊ बनल्या नाहींत; आणि म्हणूनच प्रतिष्ठित वर्गाचें आसन त्यांच्यामुळें यत्किंचित्‌हि हादरलें नाहीं. तसेंच कार्याचा प्रसार व सातत्य या दृष्टीनें समाजसुधारणेच्या निरनिराळ्या क्षेत्रांत श्रमविभागाची आवश्यकता होती. म्हणून विधायक कार्यकर्त्यांनीं स्वतःस एकेका कार्याला सर्वस्वीं वाहून घेतलें, पण वेगवेगळ्या संस्थांच्या कार्यांत एकसूत्रीपणा आणण्याकडे मात्र त्यांच्या चालकांनीं पुरेसें लक्ष दिलें नाहीं. या सूत्ररहित जड विभागणीनें त्यांच्या दृष्टींत संकुचितपणा व वृत्तींत कर्मठपणा आला. त्यामुळें त्यांच्या कार्यकर्त्यांना दलितांबद्दल वाटणारी सहानुभूति आणि त्यांची सेवावृत्ति व उद्योगशीलता यांचा बहुजनसमाजावर जरी प्रभाव पडला तरी समजाक्रांतीचें साधन म्हणून ह्या संघटनांचा व्हावा तितका उपयोग झाला नाहीं. त्यांचे कार्यकर्तेहि राष्ट्रसभेऐवजीं व्यक्तिशः गांधीजींना जबाबदार होते. म्हणून राष्ट्रसभेच्या बदलत जाणाऱ्या आर्थिक व राजकीय दृष्टिकोनाचा त्यांच्यावर कांहीं विशेष संस्कार

---

§ "They are purely humanitarian services with no other aim than that of serving the Daridranarayans." ibid. Vol. IV, p. 48.

झाला नाहीं. मात्र ह्या कार्यकर्त्यांचा स्वार्थत्याग व लोकप्रियता यांमुळें गांधीजींचें राष्ट्रसभेवरील वजन शेवटपर्यंत कायम राहिलें. या निःस्वार्थी व निष्ठावान् स्वयंसेवकांची पुण्याई सरकारशीं झगडा करतांना व निवडणुका लढवितांना राष्ट्रसभेच्या उपयोगी पडली. पण सत्तापराङ्मुखतेचे अध्यात्मवादी विचार व व्यापक क्रांतिवादी दृष्टिकोनाचा अभाव यांमुळें राष्ट्रसभेच्या यंत्रणेवर ताबा मिळविण्याचा त्यांनीं कधींच प्रयत्न केला नाहीं. असे निरपेक्ष वृत्तीचे सेवापरायण गांधीवादी कार्यकर्ते खेड्यांत जाऊन बसल्यावर शहरांतील कॉंग्रेस–संघटनांचीं सूत्रें स्वार्थ आणि परमार्थ यांचा कुशलतेनें मेळ घालणाऱ्या तत्त्वशून्य व्यवहारवादी लोकांच्या हातीं राहिलीं तर नवल नाहीं.

## सत्याग्रह : आशय आणि प्रभाव

राष्ट्रसभेनें धोरण म्हणून सत्याग्रहाचा स्वीकार केला होता. पण गांधीजींच्या दृष्टीनें सत्य आणि अहिंसा हीं जीवनाचीं अंतिम मूल्यें होतीं. त्यांनीं स्वातंत्र्यलढ्याचें नेतेपण पत्करलें, विधायक कार्य करणाऱ्या संस्था स्थापन केल्या, अधिकारारूढ कॉंग्रेस–मंत्रिमंडळांना मार्गदर्शन केलें; परंतु या सर्व कर्तृत्वामागील प्रेरणा अहिंसेच्या मार्गानें सत्याचा शोध ही होती. मानवी जीवनाचें मूळ अधिष्ठान नैतिक आहे; आणि त्यांच्याशीं सुसंगत असलेली भौतिक प्रगतिच न्याय्य व श्रेयस्कर आहे अशी त्यांची श्रद्धा होती. ‘ मनुष्य हा बाह्य परिस्थितीचा किंवा सहजप्रवृत्तीचा गुलाम नाहीं. त्याचें शरीर जरी भौतिक सृष्टीच्या नियमांनीं जखडलेलें असलें, तरी त्याचा आत्मा हा विश्वव्यापी चैतन्याचा एक स्फुलिंग आहे. त्यामुळें इच्छाशक्तीच्या जोरावर भोंवतालच्या परिस्थितीवर तो मात करूं शकतो, सहजप्रवृत्तींना वळण लावूं शकतो. सत् आणि असत् , कार्य आणि अकार्य, न्याय आणि अन्याय यांचा निर्णय करणारी विवेकबुद्धि हेंच त्याचें खरें वैशिष्ट्य आहे. तिच्या साहाय्यानें आपलें अंतर्जीवन शुद्ध, समृद्ध, समर्थ व उन्नत बनविणें यांतच मानवी जीवनाची सफलता आहे ’ असा त्यांच्या एकंदर विचारसरणीचा इत्यर्थ आहे. आत्मविकास हा जरी मुख्यतः आपल्या श्रद्धाबलावर व प्रयत्नशीलतेवर अवलंबून असला, तरी त्यासाठीं कांहीं प्रमाणांत का होईना, पण बाह्य परिस्थिति अनुकूल असावी लागते. दारिद्य, दुःख आणि उपासमार

यांनीं सतत पीडलेलीं माणसें उच्चतर जीवनाकडे सहसा वळत नाहींत. " वेदनांनीं विव्हळणाऱ्या माणसाला कबीराच्या भक्तिगीतानें आराम वाटत नाहीं, आणि भुकेनें तडफडणाऱ्याला भाकरीशिवाय दुसरें काव्य सुचत नाहीं " ही वस्तुस्थिति गांधीजींनीं कधीं दृष्टीआड केली नाहीं. ¶ इतकेंच नव्हे तर समाजाच्या नैतिक अभ्युदयासाठीं भौतिक परिस्थिति बदलण्याची आवश्यकता त्यांनीं निःसंदिग्धपणें प्रतिपादन केली; आणि व्यक्तीच्या अंतःप्रेरणेला व आत्मविकासाला वाव देणाऱ्या राजकीय व सामाजिक सुधारणांचा पुरस्कार केला.

महात्माजींची वृत्ति धार्मिक असल्यामुळें वेद, उपनिषदें, गीता यांसारखे प्राचीन धर्मग्रंथ व मध्ययुगीन वैष्णव संतांची परंपरा यांच्याबद्दल त्यांना नितांत आदर होता. भक्तिमार्गी संतांप्रमाणेंच धर्माच्या बाह्य उपचारांपेक्षां अंतःशुद्धीला त्यांनीं अधिक महत्त्व दिलें; आणि कर्मठपणाऐवजीं संयम, सदाचार, सहिष्णुता व सेवावृत्ति हे गुण अंगीं बाणविण्याचा आपल्या अनुयायांना उपदेश केला. वैयक्तिक चारित्र्यावर भर देऊनहि संतांनीं सामाजिक व्यवहारांत शब्दप्रामाण्य आणि रूढिवाद यांचें वर्चस्व मान्य केलें होतें. परंतु गांधीजींनीं शब्दाशब्दाची चिकित्सा करीत न बसतां आपल्या विवेकबुद्धीला पटेल असा शास्त्रवचनांचा अर्थ लावला. § अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींतहि त्यांची हीच भूमिका होती. हिंदूंप्रमाणेंच खिस्ती, मुसलमान, पारशी यांच्याहि धर्मग्रंथांचा अभ्यास करून आपल्या धर्मकल्पनेस त्यांनीं व्यापकता आणली.

---

¶ " I have found it impossible to soothe the suffering patients with a song from Kabir. The hungry millions ask for one poem–the invigorating food. " ibid. Vol. II, p. 87.

§ " As a sanatani Hindu I am firmly of opinion that even if there is any authority, we must not kill the spirit of our religion by a literal interpretation of the text. Words have, like man himself, an evolution, and even a Vedic text must be rejected, if it is repugnant to reason and contrary to experience." ibid. Vol. II, p. 361.

स्वतःला सनातनी हिंदु म्हणवून घेऊनहि मुसलमानांच्या धर्मभावनांबद्दल त्यांनीं सहानुभूति बाळगली; आणि सर्व धर्मांच्या लोकांनीं एकमेकांशीं बंधुभावानें वागावें असा आदेश दिला. कृतिशीलतेचा व स्वतःच्या विवेक-बुद्धीशीं एकनिष्ठ राहण्याचा आग्रह धरल्यामुळेंच अध्यात्मवादी विचार असूनहि गांधीजी पूर्वींच्या अनेक सुधारकांपेक्षां प्रत्यक्ष व्यवहारांत अधिक पुरोगामी व परिणामकारक ठरले.

गांधीजींप्रमाणें रानडेहि अध्यात्मवादी होते. पण त्यांचा अध्यात्मवाद धार्मिक क्षेत्रापुरता मर्यादित होता. सामाजिक, आर्थिक व राजकीय व्यवहारांत रानड्यांनीं भौतिकवादी दृष्टिकोन स्वीकारला. गांधीजींनीं मात्र प्रत्येक सामाजिक प्रश्नाची मानवतावादाशीं व मानवतावादाची ईश्वरवादाशीं सांगड घातली. भौतिक जीवनाकडे त्यांनीं आध्यात्मिक उन्नतीचें एक साधन म्हणून पाहिलें; आणि बाह्य परिस्थितीला अंतर्जीवनाची पार्श्वभूमि यापलीकडे महत्त्व दिलें नाहीं. निसर्ग आणि समाज यांच्याशीं माणसाचा वेगवेगळ्या रीतीनें जो नित्य संबंध येतो त्यामधून त्याच्या व्यक्तित्वाची घडण होत जाते हें त्यांना मान्य नव्हतें. मनुष्याची अंतःप्रेरणा त्यांनीं परिस्थितीहून श्रेष्ठ व स्वतःसिद्ध मानली. म्हणून बुद्धिबलानें निसर्गावर ताबा मिळवून मानवाच्या सुखासाठीं त्याला सतत राबविण्याची पाश्चात्त्य प्रवृत्ति त्यांना हितावह वाटली नाहीं. मनोवृत्ति कह्यांत ठेऊन जरूर तेथें परिस्थितीला मुरड घालणें हेंच त्यांचें ध्येय होतें. त्यामुळें प्रचलित समाजव्यवस्थेंत आमूलाग्र परिवर्तन घडवून आणण्याचा खटाटोप न करतां परिस्थितीशीं जुळतें घेऊन स्वयंपूर्ण खेड्यांत स्वावलंबी जीवन जगण्याचीच त्यांनीं लोकांना शिकवण दिली. मनुष्याच्या उपजत प्रवृत्तींशीं त्यांचे हे विचार सुसंगत नसल्यामुळें त्यांच्या सत्याग्रही तत्वज्ञानाचा पाया शेवटीं स्वप्नाळूच राहिला. सामाजिक प्रश्नांकडे अध्यात्मवादी दृष्टिकोनांतून पाहण्याच्या ह्या प्रवृत्तीमुळें राजकीय प्रतिकाराला त्यांनीं धर्मयुद्ध ठरविलें, जनतेंत जागृति घडवून आणण्यासाठीं केलेल्या उपवासाची त्यांनीं प्रायश्चित्तांत गणना केली. लोकसंग्रहाच्या दृष्टीनें हातीं घेतलेल्या खादी, सूतकताई यांसारख्या कार्यक्रमाला त्यांनीं व्रतांची योग्यता दिली. अस्पृश्यता, जातिभेद इत्यादि सामाजिक प्रश्नांचें धार्मिक स्वरूप त्यांनीं कायम ठेवलें. इतकेंच नव्हे, तर बिहारच्या

भूकंपासारख्या नैसर्गिक घटनेचीहि अस्पृश्यतेच्या पापाचरणानें ओढवलेला ईश्वरी कोप अशीच त्यांनीं उपपत्ति लावली. † सामान्य लोक मात्र परंपरागत रूढी व बाह्य उपचार यांनाच धर्म समजत होते. त्यामुळें या धार्मिक परिभाषेनें त्यांची दिशाभूल झाली. गांधीजींच्या विशाल व प्रगत धर्मकल्पनें-तील आशय न समजल्यानें स्वतःच्या जुनाट संस्कारांना ते चिकटून राहिले. म्हणून गांधीजींच्या सर्वधर्मसंग्रहानें देशांतील जातीयतेचें निर्मूलन झालें नाहीं. ही धार्मिक प्रवृत्ति व परिभाषा यांची मध्ययुगीन वातावरणाचे अवशेष कायम राखण्यास मात्र बरीच मदत झाली.

## अध्यात्मनिष्ठ मानवतावाद

हिंदुस्थानांतील सामाजिक जीवनांत गांधीजींचा अध्यात्मनिष्ठ मानवता-वाद ही एक प्रभावी शक्ति ठरली आहे. पहिल्या महायुद्धामध्यें युरोपांत जो संहार झाला आणि त्यानंतरच्या आर्थिक व राजकीय अरिष्टांमुळें मानवतेची जी सर्वत्र विटंबना झाली, तिच्यापासून समाजाला वांचविण्याची विचारवंतांना गरज वाटूं लागली होती. स्पर्धेऐवजीं सहकार्यावर आधारलेली समाजरचना उभारून मानवाला स्थैर्य व सुरक्षितता प्राप्त करून देण्याचे समाजवाद्यांचे प्रयत्न अजून प्रयोगावस्थेंतच होते. हिंदुस्थानांतहि पारतंत्र्य आणि रूढिवाद यांच्या दडपणानें लोकांचीं मनें मारलीं गेलीं होतीं. अशा वेळीं 'व्यक्ति हें समाजधारणेचें केवळ एक साधन नसून तें एक स्वतंत्र शक्तिकेंद्र आहे' हें तत्त्व महात्माजींनीं लोकांच्या मनावर बिंबविलें. आधुनिक जीवनांतील यांत्रिकता, गुंतागुंत व असुरक्षितता यांमुळें व्यक्तीच्या विकासाला मुळींच संधि मिळत नाहीं. भौतिक समृद्धीच्या मागें लागल्यामुळें जीवनांतील उच्चतर आनंदाला मानव पारखा होत आहे. म्हणून आत्मिक सुखाच्या प्राप्तीसाठीं ऐहिक गरजा कमी करण्याचा व आपलें जीवन साधें, स्वयंपूर्ण व स्वावलंबी बनविण्याचा मार्ग त्यांनीं सुचविला.

व्यक्तीच्या आत्मविकासावरच मानवी संस्कृतीचें भवितव्य अखेर अवलंबून असल्यामुळें मानवतेची भावना पायदळीं तुडवून कोणतेंहि उच्चतर

† ibid. Vol. III, p. 305.

ध्येय साध्य होणें शक्य नाहीं. म्हणून चिरंतर नीतिमूल्यांकडे पाठ फिरवून सामाजिक प्रगतीची आशा करणें व्यर्थ आहे अशी महात्माजींची श्रद्धा होती. त्यामुळें राजकीय व सामाजिक लढ्यांत त्यांनीं सत्य–अहिंसेचा, साधनशुद्धीचा आग्रह धरला.मानवी जीविताचें मोल ओळखूनहि युरोपांतील शांततावाद्यांप्रमाणें सामाजिक व्यवहारांत त्यांनीं अगतिकता पत्करली नाहीं; तर आत्मबलावर भिस्त ठेवून समाजांतील घातक प्रवृत्तींशीं सतत झगडा करण्याची त्यांनीं लोकांना प्रेरणा दिली. मानवाच्या आध्यात्मिक शक्तीवर त्यांचा आत्यंतिक विश्वास होता. म्हणून सारें जग जरी उलटलें तरी स्वतःच्या विवेकबुद्धीशीं कधींहि प्रतारणा करूं नका असें नेहमींच आपल्या अनुयायांना त्यांचें सांगणें होतें. ¶ सत्याग्रहाच्या या तत्त्वज्ञानानें गांधीजींनीं हिंदुस्थानांतील जनतेंत नवचैतन्य निर्माण केलें. देशाच्या स्थितीबद्दल आतांपर्यंत उदासीन असणारे सर्वसामान्य लोक सरकारला निर्भयतेनें आव्हान देऊं लागले. राजसत्तेबद्दल नेहमी अनास्था दाखविणारीं खेडीं अहमहमिकेनें स्वातंत्र्याच्या चळवळींत भाग घेऊं लागलीं. इंग्रजांसारख्या बलाढ्य राज्यकर्त्यांनाहि आपण शस्त्रबलाशिवाय नमवूं शकूं असा जो आत्मविश्वास असहकाराच्या चळवळीनें बहुजनसमाजांत निर्माण झाला, त्यानें राष्ट्रवादाचें सामर्थ्य शतपटींनीं वाढलें.

आत्मविकास हें जरी गांधीजींनीं मानवी जीवनांतील एकमेव उद्दिष्ट मानलें, तरी व्यक्तीच्या वृत्तींत आणि वर्तणुकींत बदल घडवून आणण्यासाठीं सामाजिक संस्थांच्या पुनर्घटनेची आवश्यकता आहे हेंहि त्यांनीं प्रतिपादन केलें. परंतु ‘सामाजिक संस्थांमधील वैगुण्यालाहि मूलतः व्यक्तीचे दोषच कारणीभूत असतात. दारिद्र्य, विषमता व अन्याय ह्यांचा उगम त्या त्या समाजांतील माणसांच्या मनोवृत्तींत म्हणजे त्यांच्या स्वार्थीपणांत व दुर्बलतेंत आहे. म्हणून बाह्य परिस्थिति बदलण्यासाठींहि माणसाच्या मनोवृत्तींत प्रथम परिवर्तन घडवून आणलें पाहिजे. मनुष्य हा कोणत्याहि संस्थेचा घटक असला

---

¶ “The still small voice within you must always be the final arbiter when there is a conflict of duty.” ibid. Vol. II, p. 3.

तरी त्या संस्थेहून तो तत्त्वतः श्रेष्ठ असतो. § म्हणून संस्थेंतील अन्यायाचें व अनीतीचें निराकरण करण्यासाठीं, तिच्या घटकव्यक्तींना आपल्या अंतःसामर्थ्याची व कर्तव्याची जाणीव करून देणें हाच सर्वोत्कृष्ट उपाय होय' असें त्यांचें मत होतें. बुद्धिनिष्ठेऐवजीं अंतःप्रवृत्तीवर त्यांची अधिक भिस्त होती. म्हणून उदारमतवाद्यांप्रमाणें चर्चा आणि युक्तिवाद यांनीं सामाजिक प्रश्न सुटतील अशी भाबडी आशा त्यांनीं धरली नाहीं. * सामाजिक सुधारणांना विरोध करणाऱ्या, अन्यायाला जबाबदार असणाऱ्या प्रतिष्ठित लोकांना नमविण्यास शेवटीं शक्तीचा वापर करावाच लागतो. पण पाशवी शक्तीच्या बळावर न्याय व अन्याय किंवा सत्य आणि असत्य यांचा खरा निर्णय लागूं शकत नाहीं. म्हणून असत्याला सत्यानें विरोध करण्यांत, पाशवी शक्तीविरुद्ध आत्मिक शक्ति उभी करण्यांत आणि हिंसेला अहिंसेनें तोंड देण्यांतच कोणत्याहि समाजाचें वास्तविक हित आहे; अन्यायाविरुद्ध मनाची सारी शक्ति एकवटून सत्याग्रही सैनिकानें आत्मक्लेश सहन केल्यास प्रतिपक्षाच्या अंतःकरणांतील विवेकबुद्धि जागृत होईलच होईल अशी त्यांची श्रद्धा होती. म्हणूनच राजकीय व सामाजिक लढ्यामध्यें त्यांनीं हृदयपरिवर्तनाचा मार्ग चोखाळला. या सत्याग्रही तत्त्वज्ञानामुळें सरकारच्या अत्याचारांना तर पायबंद बसलाच; पण समाजांतील अंतर्गत विरोधाची धारहि पुष्कळ कमी झाली. धर्म, जाति, वर्ग, भाषा, प्रांत आणि संस्थानें यांनीं शतशः विभागलेल्या या देशांत नव्या जागृतीबरोबर आपापसांत भांडणें लागतील अशी भीति होती. हरएक बाबतींत जनतेला अहिंसेचें पथ्य कांटेकोरपणें सांभाळावयास लावून हा धोका टाळण्याची गांधीजींनीं पराकाष्ठा केली. सत्याग्रही तत्त्वज्ञानाच्या द्वारें त्यांनीं लोकांना

---

§ "I have discovered that man is superior to the system he propounds." ibid. Vol. II, p. 66.

* "I have found that mere appeal to reason does not answer where prejudices are age-long and based on supposed religious authority. Reason has to be strengthened by suffering, and suffering opens the eyes of understanding." ibid. Vol. II, p. 239.

आपले मतभेद समजुतदारपणें मिटविण्यास शिकविलें. म्हणूनच फारशी जीवितहानि न होतां स्वातंत्र्यचळवळ उत्तरोत्तर फोफावत गेली.

गांधीजींची वृत्ति प्रयोगशील तत्त्वचिंतकाची असल्यामुळें त्यांच्या विचारसरणीस कधीं सांचेबंदपणा आला नाहीं. समाजजीवनाशीं सतत जिव्हाळ्याचा संबंध ठेवून त्यांनीं आपल्या धोरणांत परिस्थित्यनुरूप वेळोवेळीं फरक केला. तरीहि अध्यात्मनिष्ठेमुळें त्यांच्या सुधारणावादाला पुष्कळच मर्यादा पडल्या. व्यक्तीची उन्नति हेंच कोणत्याहि सामाजिक संस्थेचें उद्दिष्ट असलें पाहिजे; आणि व्यक्तिजीवनांतहि केवळ सुखोपभोगांपेक्षां नैतिक गुणांच्या उत्कर्षापासून होणाऱ्या सात्त्विक समाधानालाच अधिक महत्त्व दिलें पाहिजे या गांधीप्रणीत सिद्धान्ताबद्दल आज विचारवंतांमध्यें सहसा दुमत होणार नाहीं. पण भौतिक प्रगति व नैतिक सामर्थ्य यांची गांधींनीं केलेली फारकत मात्र अध्यात्मवादाला धरून असली, तरी बुद्धिवादाशीं विसंगत आहे. मानवाच्या प्राथमिक गरजा पुऱ्या झाल्याशिवाय त्याला आत्मिक विकासाची तळमळ लागत नाहीं. म्हणून बहुसंख्य लोकांच्या आत्मिक उन्नतीसाठींसुद्धां त्यांची भौतिक परिस्थिति अगोदर बदलली पाहिजे; आणि त्यांच्या राहणीचें मान सुधारलें पाहिजे हें गांधीजींनाहि कबूल होतें. परंतु ललितकला, साहित्य व तत्त्वज्ञान यांपासून मिळणाऱ्या निरागस आनंदाचा उगमहि अखेर भौतिक जीवनांतच आहे, हें त्यांना मान्य नव्हतें. म्हणून प्राथमिक गरजा भागविण्यासाठीं अन्नवस्त्रांच्या बाबतींत स्वावलंबी होण्याचा त्यांनीं लोकांना उपदेश केला. पण त्यांच्या जीवनांत क्रांति होण्यासाठीं औद्योगीकरण आवश्यक आहे असें त्यांना वाटलें नाहीं.

माणसाच्या इच्छाशक्तीवर व अंतःसामर्थ्यावर गांधीजींचा अमर्याद विश्वास होता. म्हणून सक्तीचे उपाय अंमलांत न आणतांहि वरिष्ठ वर्गाच्या विवेकबुद्धीला आवाहन करून सामाजिक व आर्थिक सुधारणा घडवून आणतां येतील अशी त्यांना खात्री वाटली. परंतु व्यक्ति ही निसर्गतः स्वयंपूर्ण असली, तरी सामाजिक व्यवहारांत ती सर्वस्वीं स्वतंत्र राहूं शकत नाहीं. तिच्या आचारविचारांत सामाजिक संबंधांचें प्रतिबिंब पडलेलें असतें. तिच्यांतील गुणावगुणांना विशिष्ट सामाजिक परिस्थिति बहुतांशीं कारणीभूत

असते. सामाजिक पुनर्घटनेच्या कार्यांत पुढाकार घेणाऱ्या कांहीं व्यक्तींना व संघटनांना आपल्या चळवळीच्या यशस्वितेसाठीं थोडीबहुत मानसिक तयारी करावी लागतेच. परंतु बहुसंख्य लोकांच्या मनोवृत्तींत होणारा मूलभूत फरक ही मात्र समाजक्रांतीनंतरच घडून येणारी गोष्ट आहे. व्यक्ति हा समाजाचा एक अविभाज्य घटक आहे. पण समाजसंस्थांचें स्वरूप केवळ व्यक्तीवर अवलंबून नसतें. विशिष्ट कालांतील सामाजिक संस्था ह्या ऐतिहासिक विकास-क्रमांतून निर्माण झालेल्या असतात; आणि त्यांच्या उत्कर्षाचे नियमहि भौतिक परिस्थितींतून स्थूलमानानें निश्चित झालेले असतात. ते जाणून घेऊन आपल्या मनाप्रमाणें ह्या संस्थांना इष्ट तें वळण लावणें हें समाजधुरीणांचें कर्तव्य आहे. समाजेतिहासाच्या या नियमांकडे गांधीजींनीं दुर्लक्ष केल्यामुळें त्यांच्या सुधारणावादाला शास्त्रशुद्ध तत्त्वज्ञानाची बैठक मिळाली नाहीं. म्हणून या सुधारणावादाचा थोडाबहुत प्रभाव पडला, तरी सामाजिक समस्या सोडविण्यांत तो यशस्वी झाला नाहीं.

गांधीजींची शाश्वत व चिरंतन नीतिमूल्यांची कल्पनाहि वस्तुस्थितीला धरून नाहीं. सत्य, अहिंसा, समता, बंधुभाव हीं तत्त्वें जोंपर्यंत अमूर्त स्वरूपांत लोकांपुढें मांडलीं जातात तोंपर्यंत त्यांच्या इष्टानिष्टतेबद्दल मतभेद होण्याचा संभव नसतो. पण या मूल्यांचा प्रत्यक्ष आविष्कार व्यक्तींच्या परस्परसंबंधांतून म्हणजेच त्या त्या समाजाच्या नीतिनियमांतून होतो. समाज हा सदैव बदलत असल्यानें नीतिनियमांत फरक होणें अपरिहार्य आहे. अशा स्थितींत सुधारकांनीं स्वतःला जुन्या नियमांनीं जखडून घेतल्यास सामाजिक प्रगतिच अशक्य होईल. नीति-मूल्यें हीं परिस्थितिसापेक्ष असल्यामुळें समाजांतील दोन हितसंबंधांतील झगडा हा दोन नीतिकल्पनांचा संघर्ष ठरतो. म्हणून प्रतिपक्षांतील व्यक्ति कितीहि उदार व सहिष्णु असल्या, तरी त्यांच्या विवेकबुद्धीवर विसंबून त्यांच्या नीतिकल्पना बदलण्याची आशा व्यवहार्य ठरत नाहीं. शिवाय, जुन्या संस्थांमधून ज्यांचा फायदा होतो ते लोक स्वाभाविकपणेंच त्यांना चिकटून राहतात; आणि त्यांच्या स्वार्थप्रवृत्तीमुळें तडजोडीचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरतात. वाटाघाटीला ज्या ठिकाणीं वाव नसतो, तेथें प्रतिपक्षाला नमविण्यासाठीं आत्मिक शक्तीचा वापर करावा असें गांधीजींचें म्हणणें होतें. पण आत्मिक बलाचा आविष्कार

हा निरपवादपणें भौतिक माध्यमांतूनच होतो; आणि भौतिक शक्ति असणाऱ्यांनाहि अंतिम विजयासाठीं नैतिक सामर्थ्याची उपासना करणें भाग पडतें. गांधीजी जर एकांतांत उपवास व प्रार्थना करीत बसले असते, तर चर्चिलसारख्या कट्टर साम्राज्यवादी मुत्सद्यांनीं त्यांना मुळींच जुमानलें नसतें हें उघड आहे. पण त्यांच्या मागें राष्ट्रसभेची, हिंदी लोकमताची जी संघटित शक्ति होती तिच्यामुळेंच सरकारला त्यांच्या म्हणण्याची दखल घ्यावी लागे.

प्रत्यक्षांत भौतिक शक्तीचा प्रतिपक्षावर प्रभाव पडत असलेला स्पष्ट दिसत असूनहि अध्यात्मवादी वृत्तीमुळें आपल्या विचारांत गांधीजींनीं आत्मिक बलावर भर दिला. म्हणून सामाजिक कलहांत प्रतिष्ठित वर्गांच्या सद्बुद्धीवर ते विश्वसून राहिले. भूतदयेनें प्रेरित होऊन सत्ताधारी वर्गांनीं विधायक कार्य करणाऱ्या त्यांच्या संस्थांना अनेकदां मदत केली असेल. पण सध्याच्या अन्यायमूलक समाजव्यवस्थेचा पाया बदलण्याची या वर्गांना मुळींच उत्सुकता नव्हती. तरी देखील महात्माजींनीं दलितांच्या शक्ति संघटित करण्याकडे पुरेसें लक्ष दिलें नाहीं. त्यामुळें श्रमिकसंघटनांच्या अभावीं गांधीयुगामध्यें समाजक्रांतीची पूर्वतयारी होऊं शकली नाहीं.

गांधीजींच्या दृष्टिकोनांत बुद्धीपेक्षां भावनेवर, शब्दांपेक्षां कृतीवर, पांडित्यापेक्षां सेवेवर अधिक भर आहे. तत्त्वज्ञानांतील सुबोधता व कार्यपद्धतींतील साधेपणा यांमुळें त्यांची हांक सामान्य जनांपर्यंत जाऊन पोहोंचली, पण सोपेपणावर भर देतांना विचारांच्या सूक्ष्मतेकडे दुर्लक्ष झालें. सिद्धान्ताच्या मांडणींत सुसंगति आणण्याची खबरदारी घेतली गेली नाहीं. भारतांतील निरनिराळ्या चळवळींचें नियंत्रण करण्याची जबाबदारी स्वतः गांधींना पार पाडावयाची होती. म्हणून दैनंदिन कामकाजाच्या रगाड्यांत आपल्या तत्त्वज्ञानाची पद्धतशीर मांडणी करण्यास त्यांना उसंत मिळणें शक्य नव्हतें. पण त्यांनीं दाखविलेल्या अंतिम मूल्यांच्या प्रकाशांत त्यांच्या व्यासंगी व निष्ठावंत अनुयायांनीं हें काम करणें जरूर होतें. पण कृतीवर भर देतांना तत्त्वमीमांसेचा उपहास करण्याची प्रवृत्ति राष्ट्रवाद्यांमध्यें निर्माण झाली. म्हणून स्वातंत्र्यचळवळीच्या विकासाबरोबर राष्ट्रवादी तत्त्वज्ञानाची वाढ झाली नाहीं. लढ्याचा आदेश देतांना गांधीजींनीं अनेकदां गूढवादाची परिभाषा वापरली. म्हणून

त्यांच्या प्रगतिशील धोरणाचें व कार्यतंत्राचें शास्त्रशुद्ध विवेचन होऊं शकलें नाहीं; आणि त्यांच्या अनुयायांमध्यें कर्मठपणा व विभूतिपूजा यांचें प्रस्थ माजलें. " गांधीजी चळवळीच्या तंत्राबद्दल फार संदिग्ध बोलत; पण त्यांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वावर विश्वास ठेवून आम्ही त्यांच्या आज्ञा निमूटपणें पाळल्या " असें खुद्द श्री. जवाहरलाल नेहरूंनींच नमूद करून ठेवलें आहे. § तर्कशुद्ध विवेचनाच्या अभावीं गांधीवाद्यांची अंतःप्रेरणाहि बहुतांशीं त्यांच्या पूर्वसंस्कारांवर अवलंबून राहिली. म्हणून ज्या ठिकाणीं सामाजिक रूढींतील अन्याय व अमानुषता उघड होती तेथें त्यांनीं निःसंकोचपणें रूढींवर प्रहार केले. पण सामाजिक संस्थांमधून अप्रत्यक्षपणें जी पिळवणूक चालते तिच्याकडे त्यांचें लक्ष गेलें नाहीं. अस्पृश्यतेच्या चालींतील जुल्म त्यांना दिसला; पण आर्थिक पिळणुकींतील अन्यायाचें त्यांना आकलन झालें नाहीं. म्हणून दलितोद्धार, अस्पृश्यतानिवारण, ग्रामसंघटना यांसारख्या अनेक चळवळींना त्यांनीं तोंड फोडलें; पण कुठलीच चळवळ त्यांना अखेरपर्यंत काबूंत ठेवतां आली नाहीं.

## महात्माजी आणि महाराष्ट्र

असहकाराच्या चळवळीपूर्वी महाराष्ट्राच्या राजकारणांत नेमस्त व राष्ट्रीय असे दोन प्रमुख पक्ष होते. गोखले व फेरोजशहा यांच्या मृत्यूनंतर लवकरच नेमस्त पक्षाला ओहोटी लागली; आणि १९२० नंतर तर त्याचें कर्तृत्व अगदींच संपुष्टांत आलें. राष्ट्रसभेच्या ठरावानुसार शाळा, न्यायालयें व विधिमंडळें यांच्यावरील बहिष्काराच्या कार्यक्रमावर लोकांची सारी प्रतिकार-शक्ति केंद्रित झाली होती. अशा वेळीं लोकांच्या मनःस्थितीची व देशांतील वातावरणाची यत्किंचितहि पर्वा न करतां नेमस्त पुढाऱ्यांनीं मॉंटेग्यु–चेम्सफर्ड सुधारणांचें स्वागत करून अधिकारस्वीकाराचें धोरण पत्करलें. साहजिकच लोकांच्या मनांत त्यांच्याविषयीं अनादर उत्पन्न झाला; आणि राजकारणाच्या प्रवाहांतून हा पक्ष एकदम बाहेर फेंकला गेला. त्यामुळें या संप्रदायांत जरी अनेक अनुभवी, सत्प्रवृत्त, विवेकशील आणि व्यासंगी माणसें होतीं, तरी भारताच्या पुढील राजकारणावर त्यांचा कांहींच प्रभाव पडला नाहीं.

---

§ Jawaharlal Nehru—*An Autobiography*, p. 73.

लोकमान्य टिळकांचा जहाल राष्ट्रीय पक्ष नेमस्तांच्या मानानें अधिक क्रियाशील, संघटित व लोकप्रिय होता. १९१९ चा सुधारणा कायदा या पक्षाच्या नेत्यांना ‘अपुरा, असमाधानकारक, व निराशाजनक’ वाटला. तरी देखील या कायद्यामुळें मिळालेल्या हक्कांचा लोकहितासाठीं जास्तींत जास्त उपयोग करून घ्यावा या दृष्टीनें त्यांनीं ‘शक्य तेथें सहकार्य, व जरूर तेव्हां विरोध’ या प्रतिसहकारतत्त्वाचा अवलंब केला; आणि आगामी निवडणुकांत भाग घेण्यासाठीं काँग्रेस लोकशाही पक्षाची स्थापना केली. पण १ ऑगस्ट १९२० रोजीं लो. टिळक दिवंगत झाले; व हिंदी राजकारणाचीं सूत्रें हातीं घेऊन गांधींनीं असहकाराची चळवळ सुरू केली. या चळवळीची रूपरेषा ठरविण्याचा प्रश्न जेव्हां राष्ट्रसभेपुढें आला, तेव्हां महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षांत दोन तट पडले. पहिल्यापासून लढाऊ राजकारणाकडे ज्यांचा जास्त ओढा होता, असे भावनोत्कट वृत्तीचे लोक निःशस्त्र प्रतिकाराच्या या मोहिमेकडे आपोआप खेचले गेले. गांधीजींचा असहकारयोग म्हणजे टिळकांच्या बहिष्कारयोगाचीच पुढची पायरी होय अशी त्यांच्या मनानें त्यांना ग्वाही दिली. काकासाहेब खाडिलकर, शिवरामपंत परांजपे, गंगाधरराव देशपांडे इत्यादि जहाल प्रकृतीचे कार्यकर्ते असहकारितेच्या चळवळीशीं ताबडतोब समरस झाले व त्यांनीं राष्ट्रसभेच्या कार्यक्रमाला मनःपूर्वक पाठिंबा दिला. उलट टिळकपक्षांतील केळकर, अणे, मुंजे, खापर्डे, भोपटकर इत्यादि सनदशीर प्रवृत्तीच्या कार्यकर्त्यांनीं गांधींच्या आत्यंतिक धोरणास कसून विरोध केला. असहकाराचें तत्त्व त्यांना मान्य होतें. स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण व बहिष्कार या गोष्टींचा पूर्वीपासून त्यांच्या कार्यक्रमांत समावेश झालेला होता; पण शिक्षणसंस्था, न्यायमंदिरें व कायदेकौन्सिलें यांच्यावर सरसकट बहिष्कार घालणें हें अव्यवहार्य आहे, गैरमुत्सद्दीपणाचें आहे असा त्यांनीं आक्षेप घेतला. “कायदेकौन्सिलें हीं स्वराज्याच्या झगड्यांतील एक युद्धभूमि व लष्करी ठाणीं आहेत....सरकार जर लोकांशीं वागतांना साम, दाम, दंड, भेद हे चारहि उपाय सारखे अंमलांत ठेवतें तर लोकांनींहि तसेंच करणें योग्य होईल. सरकारच्या भात्यांत हवे तितके बाण असतां प्रजापक्षानें मात्र आपल्या धनुष्यास एकच बाण ठेवावा यांत शहाणपणा नाहीं...कौन्सिलवर बहिष्कार घालणें ही गोष्ट

मुत्सद्दीपणाची नव्हे हें गांधींच्या डोक्यांत शिरत नाहीं ही नाईलाजाची व दुर्दैवाची गोष्ट आहे. "† अशी त्यांची भूमिका होती. " राजकारणांत कोणाहि मनुष्याला पुढारीपणाचा ताम्रपट दिलेला नसतो. "‡ तेव्हां आपली विचारसरणी जर अनुभवसिद्ध व सयुक्तिक आहे, तर आज ना उद्यां आपणांस राष्ट्रसभेंत बहुमत मिळवितां येईल असा त्यांना विश्वास वाटत होता. म्हणून राष्ट्रसभेंत राहूनच विचारविनिमयाच्या मार्गानें आपलें मत प्रभावी करण्याचा त्यांनीं निश्चय केला. त्यांच्यापैकीं जवळ जवळ सर्वांनीं शिस्तपालनासाठीं कॉंग्रेसच्या ठरावास मान देऊन १९२० च्या निवडणुकींतील आपल्या उमेदवाऱ्या मागें घेतल्या. जोंपर्यंत चळवळीचा जोर वाढत होता, गांधीजींचा प्रत्येक शब्द झेलण्यास जोंपर्यंत जनता उत्सुक होती, तोंपर्यंत कौन्सिलवादी पक्षानेंहि राष्ट्रसभेच्या प्रचारांत भाग घेतला. वसई, अकोला इत्यादि प्रांतिक परिषदांतून उपसूचनांच्या द्वारें विरोधाचे सूर निघत होते. त्या त्या वेळीं या उपसूचनांचें मर्म उलगडून दाखविण्यास केसरीकार कधीं चुकले नाहींत. मात्र प्रारंभींच्या काळांत तरी कॉंग्रेसची भूमिका तत्त्वतः मान्य करून तपशीलाबाबत मतभेद दाखविण्याचें या पक्षाचें धोरण होतें.

'बार्डोलीचा बार फुकट गेल्यानंतर' राष्ट्रसभेंत मतमतांचा गलबला माजला. दास, नेहरू यांच्यासारखे राष्ट्रसभतील मान्यवर व वजनदार पुढारी कौन्सिलप्रवेशाची भाषा बोलूं लागले होते. त्यामुळें महाराष्ट्रांतील कौन्सिलवादी पक्षाला आपलें म्हणणें निःशंकपणें मांडण्यास हुरूप आला; आणि कॉंग्रेसमधील नाफेरवाल्या प्रवृत्तीवर त्यांनीं टीकेची सरबत्ती सुरू केली. नंतर कौन्सिलप्रवेशास राष्ट्रसभेची रीतसर अनुमति मिळाली; आणि १९२३ च्या निवडणुकांमध्यें स्वराज्य पक्षाचे अनेक उमेदवार कायदेमंडळांत निवडून आले. विधिमंडळांतील कामकाज चालू झाल्यावर दास–नेहरू व केळकर–अणे यांच्या धोरणांतील फरक अधिकाधिक जाणवूं लागला. कायदेमंडळें काबीज करण्यास दास–नेहरू जरी उद्युक्त झाले, तरी विधायक कार्यक्रम व कायदे-

† समग्र केळकर वाङ्मय, असहकारिता खंड, पृ. ३१, ४४, ५०.

‡ कित्ता. पृ. ४८

भंग यांचें महत्त्व त्यांनीं दृष्टीआड केलें नाहीं. गांधीजींच्या व्यक्तित्वाबद्दल त्यांना आदर होता. त्यांच्या नेतृत्वाची व मार्गदर्शनाची त्यांना आवश्यकता वाटत होती. कायदेमंडळांतील सभासदांच्या मागें जागृत लोकमताची प्रभावी शक्ति उभी करावयाची असेल, तर गांधीप्रणीत विधायक कार्यक्रमाची उपेक्षा करून चालणार नाहीं असें त्यांचें स्पष्ट मत होतें. तसेंच कायदे-मंडळांतील अडवणुकीचें धोरण अयशस्वी ठरल्यास त्यांतून बाहेर पडून कायदेभंगाचा मार्ग अनुसरण्याचें त्यांनीं राष्ट्रसभेला आश्वासन दिलें होतें. महाराष्ट्रांतील कौन्सिलवाद्यांना मात्र असहकार, कायदेभंग, हिंदु–मुस्लिम ऐक्य, अस्पृश्यता निवारण व चरखा इत्यादि कार्यक्रमाची थोरवी कधींच कळली नाहीं. देशकालपरिस्थितीचा विचार न करतां गांधींच्या एकंदर विचारसरणीवरच त्यांनीं तर्कदुष्टतेचा व तऱ्हेवाईकपणाचा छाप मारला. दास–नेहरूंप्रमाणें विधायक पद्धतीनें विरोध करण्याऐवजीं ते अनुदारतेनें महात्माजींवर सरांस टीका करीत राहिले. त्यामुळें लोकांना त्यांच्या मताबद्दल कधीं सहानुभूति वाटली नाहीं. मंत्रीपदें स्वीकारण्याच्या प्रश्नावर स्वराज्यपक्षांतील मतभेद विकोपास जाऊन १९२६ सालीं केळकर–जयकर प्रभृति महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं प्रतिसहकार पक्ष काढला; आणि पुढील निवडणुका स्वतंत्रपणें लढविल्या, तरी देखील अधिकृतपणें हा पक्ष कॉंग्रेसबाहेर पडला नाहीं.

१९३० सालीं गोलमेज परिषदेवर बहिष्कार घालून राष्ट्रसभेनें कायदे-भंगाची चळवळ सुरू केली. या चळवळीमध्यें सर्वसामान्य लोकांनीं इतका अपरंपार उत्साह दाखविला, कीं त्या वावटळींत फेर-नाफेर, अडवणूक-प्रतिसहकार यासारखे वाद पार लुप्त होऊन गेले. एवढेंच नव्हे तर प्रतिसहकारपक्षांतील अनेक कार्यकर्त्यांनीं व्यापक राष्ट्रहितबुद्धीनें कायदेभंगाच्या लढ्यांत तत्परतेनें भाग घेतला. गांधी–आयर्विन समेटानंतर चळवळ थांबली, आणि गांधीजी गोलमेज-परिषदेला गेले. हिंदुस्थानांत परत येतांक्षणींच जेव्हां त्यांनीं कायदेभंगाची चळवळ पुन्हां चालू केली, तेव्हां मात्र महाराष्ट्रांतील कौन्सिलवादी पक्ष तिच्यांत सामील झाला नाहीं. देशांत सगळीकडे दडपशाहीचें सत्र सुरू होतें. मोठमोठे कॉंग्रेसपुढारी बंदीखान्यांत अडकून पडले होते. अशा स्थितींतहि प्रतिसहकार पक्षाचे पुढारी तिसऱ्या गोलमेजपरिषदेस हजर राहिले. त्यानंतर

लौकरच राष्ट्रसभेपासून विभक्त होऊन त्यांनीं लोकशाही स्वराज्य पक्षाची स्थापना केली. १९३४ सालीं कॉंग्रेसनें मध्यवर्ती विधिमंडळाची निवडणूक लढविली, तेव्हां या पक्षानें आपले खास उमेदवार उभे करून राष्ट्र-सभेला विरोध केला. कायदेभंगाची चळवळ आणि विधायक कार्यक्रम यांमुळें राष्ट्रसभेची पुण्याई खूपच वाढलेली होती. त्यामुळें या निवडणुकींत लोकशाही पक्षाच्या उमेदवारांचा पराभव होऊन महाराष्ट्रांत कॉंग्रेस विजयी झाली. बहुजनसमाजाकडे पाठ फिरवून मुत्सद्दीपणाचे डावपेच लढविण्यांत गढून गेलेल्या स्वयंमन्य पुढाऱ्यांच्या डोळ्यांत जनतेनें यावेळीं चांगलेंच अंजन घातलें.

## मध्यमवर्गाचा कॉंग्रेसविरोध

टिळकपंथीयांचा कटाक्ष मुख्यतः गांधींच्या धोरणांतील अव्यवहार्यतेवर व अस्थिरतेवर होता. महात्माजींवरील त्यांच्या टीकेंत थोडेंबहुत तथ्य असलें, तरी ती बऱ्याच अंशीं अवास्तव व पूर्वग्रहदूषित आहे. सत्याग्रही जीवन-निष्ठेला बुद्धिवादाची बैठक न देतां गांधीजींनीं वारंवार अध्यात्माच्या परिभाषेंतच तिचें विवरण केलें. त्यामुळें त्यांच्या विचारप्रणालीवर व विवेचन-पद्धतीवर गूढवादाचें आवरण पडलें आहे यांत मुळींच शंका नाहीं. पण हिंदुस्थानची विशिष्ट परिस्थिति लक्षांत घेतां गांधीवादाचा एकंदर आशय व कार्यपद्धति ही समाजाच्या प्रगतीला पोषकच होती असें म्हणावें लागतें. असहकाराचा आदेश देऊन गांधींनीं राष्ट्राला जागें केलें. लोकांच्या देशाभिमानाला व स्वातंत्र्यप्रीतीला योग्य वळण लावून त्यांनीं निःशस्त्र प्रतिकाराचें नवें तंत्र यशस्वी करून दाखविलें. सत्याग्रही तत्त्वज्ञानाच्या या विधायक बाजूकडे टिळकपंथीयांचें लक्ष गेलें नाहीं. सूतकताई, ग्रामोद्योग, सामु-दायिक प्रार्थना इत्यादि कार्यक्रमांतील कर्मठपणा त्यांना दिसला; पण त्यांत अंतर्भूत असलेलें जनतासंपर्काचें व लोकजागृतीचें तत्त्व त्यांना उमगलें नाहीं. म्हणून एवढा आटापिटा करूनहि उठल्यासुटल्या गांधीवादांतील तेच तेच दोष उगाळीत बसण्यापलीकडे या टीकाकारांनीं कांहीं साधलें नाहीं. स्वतःला टिळकांचे वारसदार म्हणविणारे बरेच पुढारी सामुदायिक लढ्याबद्दल उदासीन होते; व कौन्सिलप्रवेशावरच त्यांची खरी भिस्त होती. पण १९१९ च्या

कायद्यांतील मतदानाचा हक्क इतका मर्यादित होता, कीं कौन्सिलप्रवेशाच्या प्रश्नाबद्दल बहुजनसमाजाला आस्था वाटण्याचें कांहीं कारण नव्हतें. तरीहि स्वातंत्र्यसंग्रामाची एक आघाडी म्हणून राष्ट्रसभेनें स्वराज्यपक्षीयांना विधिमंडळाच्या निवडणुका लढविण्यास मोकळीक दिली. तेव्हां कौन्सिलवाद्यांच्या विरोधाचा तात्त्विक पायाहि ढासळला. तरी देखील राष्ट्रसभेच्या धोरणास त्यांनीं कधीं संपूर्ण पाठिंबा दिला नाहीं. प्रांतिक स्वायत्ततेच्या काळांत हिंदुमुसलमानांचा प्रश्न जास्तच चिघळत गेला. मुसलमान पुढाऱ्यांशीं वाटाघाटी करून हा प्रश्न सामोपचारानें सोडविण्याची राष्ट्रसभेच्या नेत्यांची धडपड चालू होती. त्यासाठीं व्यक्तिशः थोडा कमीपणा घ्यावा लागला, तरी त्याची त्यांनीं कधीं फिकीर केली नाहीं. परकीय राज्यकर्त्यांना जातीय प्रश्नांत हस्तक्षेप करण्याची संधि मिळूं नये म्हणून अल्पसंख्याकांच्या बाबतींत त्यांनीं नेहमींच उदारता दाखविली. तेव्हां टिळकपंथीयांना कॉंग्रेसविरोधासाठीं आयतेंच एक हुकमी हत्यार सांपडलें. कॉंग्रेसश्रेष्ठींच्या मुसलमानधार्जिणेपणाकडे अंगुलिनिर्देश करून त्यांनीं हिंदूंच्या स्वाभिमानाचें व हितसंबंधांचें रक्षण करण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली.

टिळकांच्या व्यक्तित्वाबद्दल महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाला नितांत आदर होता. पण त्यांच्या संप्रदायाबद्दल त्याला कधींच ममत्व वाटलें नाहीं. आतांपर्यंत राजकीय चळवळींत अग्रभागीं असणाऱ्या मध्यमवर्गाला मात्र पहिल्यापासून टिळकपंथाबद्दल आपलेपणा वाटत होता; आणि गांधीयुगांतहि त्यानें हा ऋणानुबंध कायम ठेवला. युद्धोत्तर काळांत भांडवलदार वर्गाचें राष्ट्रसभेवरील वजन वाढलें. शेतकरी वर्गाला तिच्याबद्दल अधिक सहानुभूति वाटूं लागली. भांडवलदारांचें द्रव्यबळ आणि शेतकऱ्यांचें संख्याबळ यांच्या पाठिंब्यामुळें राष्ट्रसभेच्या स्वरूपांत फार मोठा बदल घडून आला; आणि साहजिकच हिंदी राजकारणांतील मध्यमवर्गाचें महत्त्व कमी कमी होत गेलें. शेंकडो स्वयंसेवकांच्या मिरवणुका, लक्षावधि लोकांच्या सभा, कोटी रुपयांचे फंड या गोष्टी त्याच्या अगदीं कल्पनेपलीकडील होत्या. गांधीजींनीं बुद्धीपेक्षां भावनेवर, व्यासंगापेक्षां सेवेवर व डावपेचापेक्षां आत्मक्लेशावर अधिक भर देऊन विद्वत्तेचें, वक्तृत्वाचें व कायदेपांडित्याचें स्तोम अजिबात

नाहींसें केलें. साधी राहणी व स्वावलंबन यांचा उपदेश करून त्यांनीं खेडुतांमध्यें आत्मविश्वास निर्माण केला; आणि उक्तीनें व कृतीनें रूढिवादावर आघात करून मध्यमवर्गाच्या सामाजिक प्रतिष्ठेची बैठक खणून काढली. त्यामुळें या वर्गाला गांधींचा कार्यक्रम रुचला नाहीं. केळकरांच्या टीकालेखांत मध्यमवर्गाचें हें असमाधान, ही इतराजी अप्रत्यक्षपणें प्रगट झाली आहे. गांधीजींनीं अपेक्षिलेला त्याग, निग्रह, सहिष्णुता व सेवावृत्ति हीं सामान्य माणसांच्या आवाक्याबाहेरचीं आहेत. शिवाय शाळा कॉलेजें, कोर्टें यांच्यावरील बहिष्कारामुळें व्यापारी व शेतकरी यांना मोकळीक मिळून मध्यमवर्गाच्या पाठीवरच त्यागाच्या गोण्या लादण्यांत येत आहेत अशी केळकरांची तक्रार होती. ¶ तेव्हां आत्यंतिकतेला बुजणाऱ्या व रूढ चाकोरींत समाधान मानणाऱ्या मध्यमवर्गाला सुवर्णमध्यवादी केळकरपक्ष जवळचा वाटल्यास नवल नाहीं.

टिळक संप्रदायांतील जहाल मनोवृत्तीच्या लोकांनीं असहकारितेच्या चळवळींत हिरीरीनें भाग घेतला खरा. पण हे लोकहि वृत्तीनें आणि संस्कारानें गांधीवादापासून खूप दूर होते. व्यासपीठावरून व वर्तमानपत्रांतून मवाळांशीं दोन हात करण्यांत, आणि राष्ट्रीय ऐक्याच्या व धार्मिक परंपरेच्या नांवाखालीं सुधारणावादाचा उपहास करण्यांत त्यांनीं आपली उभी हयात घालविली होती. फेरनाफेर वाद त्यांनीं मोठ्या तन्मयतेनें रंगविला; पण विधायक कार्याच्या एकेका क्षेत्रांत निःस्वार्थबुद्धीनें स्वतःला जन्मभर गाडून घेणें त्यांना जमलें नाहीं. म्हणून महाराष्ट्रांत गांधीवादाचा प्रचार करण्याची कामगिरी देव–दास्ताने–जावडेकर प्रभृति नव्या पिढींतील कार्यकर्त्यांना पार

---

¶ असहकारितेची चळवळ व्हावयाची तर ती विद्यार्थी, वकील, व्यापारी, रयत, सावकार, पदवीधर वगैरे सर्वच लोकांनीं एकदम सुरू करावी व जरूर तो स्वार्थत्याग सोसावा. शेतकऱ्यांनीं तरी शेतसारा देऊन सहकारिता कां करावी? जो तो वर्ग आपल्या पात्रतेप्रमाणें व मगदुराप्रमाणें चळवळ प्रत्यक्ष यशस्वी करील वा न करील. पण अमका वर्ग सुशिक्षित म्हणून त्यानें मात्र सर्वनाशाला सिद्ध व्हावें आणि अमका वर्ग अशिक्षित म्हणून त्याचा बचाव व्हावा हें नीट दिसत नाहीं." कित्ता, पृ. ८७.

पाडावी लागली. खेड्यापाड्यांतून विधायक कार्याच्या द्वारें त्यांनीं राष्ट्रसभेला बहुजनसमाजाचा पाठिंबा मिळविला; आणि प्रतिसहकारवाद्यांच्या हल्ल्यांना चिकाटीनें तोंड देऊन त्यांनीं शहरवासीयांत कॉंग्रेसची इभ्रत वाढविली.

## बहुजनसमाजाची कॉंग्रेसनिष्ठा

महाराष्ट्रांत राष्ट्रसभेच्या धोरणाला केवळ टिळकपंथीयांचाच विरोध होता असें नाहीं. सत्यशोधक चळवळींतून निर्माण झालेल्या ब्राह्मणेतर पक्षालाहि असहकाराचा मार्ग मान्य नव्हता. सुरवातीच्या काळांत सत्यशोधक चळवळीनें मुख्यतः सामाजिक प्रश्नांचीच दखल घेतली होती. पण मॉंटेग्यूच्या जाहीरनाम्यानंतर ब्राह्मणेतर पुढाऱ्यांना राजकारणांत लक्ष घालण्याची आवश्यकता वाटूं लागली. १९१९ च्या सुधारणा कायद्यानें मुंबई प्रांतिक विधिमंडळांत मराठा व तत्सम जाति यांच्यासाठीं कांहीं जागा राखून ठेवल्या होत्या. त्यामुळें सरकारशीं सलोखा राखूनच आपणांस हळुहळू जास्त हक्क व सवलती मिळवितां येतील असा त्यांना विश्वास वाटला. देशांत असहकारितेच्या चळवळीस सार्वत्रिक पाठिंबा मिळत असतांहि त्यांनीं कौन्सिलच्या निवडणुका लढविल्या; व मंत्रिपदें स्वीकारलीं. कोणत्याहि व्यापक तत्त्वज्ञानाचा आधार नसल्यानें लवकरच मंत्रिपदाच्या अभिलाषेमुळें या पक्षांत दुही माजली. उलट राष्ट्रसभेचें कार्य जसजसें वाढीस लागलें, तसतसें राजकीय ध्येयवादाचें लोण थेट बहुजनसमाजापर्यंत जाऊन पोहोंचलें. त्यामुळें ब्राह्मणेतरांतून जे नवीन तडफदार कार्यकर्ते पुढें आले, त्यांना आपल्या जुन्या पुढाऱ्यांचें धोरण संकुचित व निराशाजनक वाटलें. दलितोद्धाराच्या कार्यामुळें राष्ट्रसभेबद्दल त्यांना आपुलकी वाटूं लागली. बहुजनसमाजाचे प्रश्न सोडविण्याची इच्छा व शक्ति फक्त कॉंग्रेसमध्येंच आहे याबद्दल त्यांना संदेह उरला नाहीं. म्हणून केशवराव जेधे यांच्या नेतृत्वाखालीं अनेक ब्राह्मणेतर कार्यकर्त्यांनीं कॉंग्रेसमध्यें प्रवेश केला. त्यामुळें महाराष्ट्रांत कॉंग्रेसचें आसन स्थिर होण्यास पुष्कळच मदत झाली. शिरोडें येथील मिठाच्या सत्याग्रहांत, संगमनेर–बागलाणच्या जंगल सत्याग्रहांत, आणि सोलापूरच्या झेंडा सत्याग्रहांत महाराष्ट्रांतील शेंकडो स्वयंसेवक सामील झाले; व शौर्याची शर्थ करून

त्यांनीं जगाला आपल्या राष्ट्रभक्तीची व लढवय्येपणाची पुन्हा एकदां प्रचीति आणून दिली.

राष्ट्रसभेनें जेव्हां जेव्हां कायदेभंगाचा लढा पुकारला तेव्हां तेव्हां महाराष्ट्रानें इतर प्रांतांच्या बरोबरीनें त्यांत भाग घेतला. महात्माजींच्या पावलावर पाऊल टाकून अनेक महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांनीं विधायक कार्याला आपलें तनमनधन वाहिलें. १९३४, १९३७, १९४५ च्या निवडणुकांत येथील मतदारांनीं राष्ट्रसभेचे उमेदवार बहुमतानें निवडून दिले. तरीदेखील महाराष्ट्र कांग्रेसविरोधी आहे अशी हाकाटी सर्वत्र ऐकूं येते. हा गैरसमज होण्यास महाराष्ट्रांतील विशिष्ट परिस्थिति बव्हंशीं कारणीभूत झालेली आहे. गुजरात, कर्नाटक, बिहार, उत्तरप्रदेश इत्यादि प्रांत १९२० पूर्वी बंगाल व महाराष्ट्र यांच्या तुलनेनें राजकीय चळवळींत बरेच मागें होते. राष्ट्रसभेचा पाठपुरावा करणारे कांहीं कर्तबगार पुढारी प्रत्येक प्रांतांत होतेच. परंतु त्यांचा खास अनुयायीवर्ग अद्याप तेथें तयार झाला नव्हता. म्हणून कित्येक बाबतींत जरी त्यांचे गांधीजींशीं मतभेद होते, तरी त्यांच्या व्यक्तित्वाचा प्रभाव व कालाचा ओघ ओळखून त्यांनीं गांधींचें पुढारीपण निःसंकोचपणें पत्करलें. महाराष्ट्रांतील राजकीय चळवळीला मात्र १८७० पासूनच एक निश्चित वळण लागलें होतें, व त्यांतून येथें निरनिराळे विचारसंप्रदाय अस्तित्वांत आले होते. ही सांप्रदायिक परंपरा झुगारून देऊन सत्याग्रहाचें नवें तंत्र व तत्त्वज्ञान आत्मसात् करणें जुन्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना शक्य झालें नाहीं. त्यामुळें १९२० च्या चळवळीमधून कार्यकर्त्यांची जी नवी पिढी जन्मास आली, तिला या जुन्या राजकीय वतनदारांशीं झगडून आपलें वर्चस्व स्थापित करावें लागलें. पुढें महाराष्ट्रांतील बहुजनसमाज जरी कॉंग्रेसला येऊन मिळाला, तरी सुशिक्षित मध्यमवर्ग पूर्वपरंपरेलाच चिकटून राहिला. त्यामुळें सामाजिक व सांस्कृतिक सत्तेचीं केंद्रें जुन्या पुढाऱ्यांच्याच ताब्यांत राहिलीं. राजकीय जागृतीबरोबर जे नवे वर्ग राष्ट्रसभेंत आले त्यांना शैक्षणिक व सांस्कृतिक परंपरा लाभलेली नव्हती. तेव्हां कॉंग्रेसविरोधी पुढाऱ्यांची प्रतिष्ठा व वाक्चातुर्य यामुळें त्यांच्या मतभेदाचा जास्त गाजावाजा झाला. उलट नवोदित पण निष्ठावंत कॉंग्रेस कार्यकर्त्यांचें यश डोळ्यांत भरण्यास बराच काळ जावा लागला.

दलित वर्गांतील असंख्य लोकांनीं आपल्या सक्रिय सहानुभूतीनें राष्ट्रसभेस बळकटी आणली. ज्या ज्या वेळीं सरकारनें काँग्रेसला दडपून टाकण्याचा प्रयत्न केला त्या त्या वेळीं समाजाच्या अगदीं खालच्या थरांतील लोकहि स्वयंस्फूर्तीनें काँग्रेसच्या पाठीशीं उभे राहिले. पण उत्तरोत्तर त्यांच्या राजकीय आकांक्षा वाढूं लागल्या; व राष्ट्रसभेचें वर्गसमन्वयाचें धोरण त्यांना पटेनासें झालें. मागासलेल्या वर्गांतून पुढें आलेल्या कार्यकर्त्यांचा कल हळुहळू वर्गवादाकडे झुकूं लागला. कम्युनिस्ट, समाजवादी, दलितफेडरेशन असे जे नवीन पक्ष या काळांत उदयास आले त्यांना महाराष्ट्रानें अनेक कार्यकर्ते पुरविले. त्यांच्यापैकीं कित्येकांना तर त्या त्या पक्षाचें अखिल भारतीय पुढारीपणहि लाभलें. लोकशाही स्वराज्यपक्षानें अगोदरच हिंदुमहासभेशीं हातमिळवणी केली होती. त्यामुळें फेरनाफेरवाल्यांचा झगडा संपतो न संपतो तोंच राष्ट्रसभेंतील गांधीवाद्यांना जातीय आणि वर्गीय अशा दोन्ही मत-प्रणालींशीं एकदम सामना देणें भाग पडलें.

महाराष्ट्रांतील काँग्रेससंघटनेंतहि निरनिराळ्या प्रवृत्तींचे व परंपरेचे लोक एकत्र आले होते. त्यांत गांधीवादाशीं पूर्णपणें समरस झालेल्यांची संख्या फार थोडी होती. परंतु त्यांनीं आपल्या कार्यक्षमतेनें व अन्यन्यभावानें काँग्रेसश्रेष्ठींचा विश्वास संपादन केला होता. म्हणून महाराष्ट्रांतील राष्ट्रसभेचीं सूत्रें बराच काळपर्यंत गांधीवाद्यांच्याच हातीं राहिलीं. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं सरकारशीं निर्भयतेनें झगडणारी एकमेव संस्था म्हणून केवळ राष्ट्रीयत्वाच्या भूमिकेवरूनहि पुष्कळांनीं राष्ट्रसभेच्या राजकारणांत भाग घेतला होता. सुशिक्षित मध्यमवर्गांतील जे कार्यकर्ते होते, त्यांच्या मनावर टिळकांच्या व आगरकरांच्या वाङ्मयाचे संस्कार झाले होते. त्यामुळें त्यांना गांधींच्या विचारसरणींतील गूढता, अंतःप्रेरणा, सहिष्णुता, साधनशुचिता इत्यादि गोष्टी रुचल्या नाहींत. बहुजनसमाजाला जे काँग्रेसनेते जवळचे वाटत होते, ते जोतीराव फुले यांच्या सत्यशोधक चळवळींतून राष्ट्रसभेकडे वळले होते. सामाजिक जीवनांतील अंतर्गत प्रश्न सोडविण्यास युक्तिवादाचा व आत्मक्लेशाचा मार्ग पुरा पडणार नाहीं अशी त्यांची भावना होती. अनत्याचारीपणाची आवश्यकता त्यांना पटली होती; परंतु वर्ग-

समन्वयाच्या व हृदयपरिवर्तनाच्या तत्त्वांवर त्यांचा विश्वास बसला नाहीं. म्हणून महात्माजींचें नेतृत्व स्वीकारून महाराष्ट्रांत लक्षावधि लोक काँग्रेसच्या झेंड्याखालीं जरी जमा झाले, तरी निर्भेळ गांधीवादी विचारप्रणालि येथें मुळींच रुजली नाहीं.

: ६ :

# जातिवाद आणि वर्गवाद

राष्ट्रसभेनें चालू केलेल्या स्वातंत्र्यचळवळीच्या लाटा हळुहळू भारतांतील सर्व प्रांतांत पसरल्या; आणि क्रमाक्रमानें त्या भिन्न भिन्न जाती व वर्ग यांच्यापर्यंत जाऊन पोहोंचल्या. निरनिराळ्या थरांतील लोकांना आपापल्या सामाजिक व राजकीय हक्कांची जाणीव होऊं लागली; आणि सत्तांतराचा काळ नजीक येऊं लागतांच अल्पसंख्य व बहुसंख्य समाजांत, आणि पुढारलेल्या व मागसलेल्या जातींत राजकीय सत्तेंतील भागीदारीसाठीं रस्सीखेच सुरू झाली. सार्वभौम लोकसत्ताक राज्याची स्थापना हें राष्ट्रसभेचें ध्येय होतें. परंतु लोकसत्ताक राज्यपद्धति यशस्वी होण्यासाठीं जरूर असणाऱ्या स्वातंत्र्य, समता, एकात्मता इत्यादि तत्त्वांचा आपल्या समाजव्यवस्थेमध्यें अभाव होता. गेलीं अनेक शतकें आपलें समाजजीवन गटागटांतून विभागलेलें असल्यानें निरनिराळ्या धर्मांच्या व जातीच्या लोकांत परस्परांबद्दल अविश्वास व दुजाभाव उत्पन्न झाला होता. त्यामुळें भावी जबाबदार राज्यपद्धतींत बहुसंख्य जमातीच्या हातांत सर्व सत्ता एकवटली जाऊन आपल्या हक्कांवर व हितसंबंधांवर गदा येईल, अशी अल्पसंख्य गटांना भीति वाटली; आणि त्यांनीं ब्रिटिश सरकारकडे घटनात्मक संरक्षणाची व खास सवलतींची मागणी

केली. हिंदु समाजांतील निरनिराळे वर्गहि सुधारणेच्या वेगवेगळ्या अवस्थेंत होते. आदिवासी, अस्पृश्य, कुणबी, मराठा व ब्राह्मण इत्यादिकांच्या शैक्षणिक व आर्थिक पातळींत पुष्कळच तफावत होती. मध्ययुगांतील साचेबंद समाजव्यवस्थेमुळें निर्माण झालेली ही सांस्कृतिक व सांपत्तिक विषमता इंग्रजी राजवटीमध्येंहि बराच काळपर्यंत तशीच कायम राहिली. तेव्हां पुढारलेल्या जातींकडे स्वतंत्र हिंदुस्थानांतील सत्तेची मक्तेदारी जाऊं नये म्हणून मागासलेल्या जातींनीं इंग्रजांच्या मदतीनें जादा हक्क मिळविण्याची खटपट आरंभिली. याप्रमाणें हिंदी राजकारणांत जातिनिष्ठेचा वरचष्मा होऊं लागतांच एकराष्ट्रीयत्वाची भावना कमजोर होत चालली. निरनिराळ्या जातींमधील ह्या विषमतेची, स्पर्धेची व हितविरोधाची ब्रिटिशांना आपलें आसन टिकविण्यासाठीं पुष्कळच मदत झाली. १९०९ सालीं स्वतंत्र मतदारसंघ देऊन त्यांनीं मुसलमानांना हिंदूंपासून कायमचें विभक्त केलें. १९१९ च्या मॉंटेग्यु–चेम्सफर्ड सुधारणान्वयें प्रांतिक विधिमंडळांत मराठ्यांना व तत्सम जातींना राखीव जागा देऊन त्यांनीं ब्राह्मण-ब्राह्मणेतरवादाला तीव्रता आणली; आणि १९३२ च्या जातीय निवाड्यानें स्पृश्यास्पृश्यांमध्यें फूट पाडण्याचा व्यूह रचला. अल्पसंख्याकांचें हितसंरक्षण करणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे. म्हणून राज्यघटनेंतील विवाद्य प्रश्नांवर सर्व जातींमध्यें एकमत होऊन स्वराज्याची एकमुखी मागणी जोंपर्यंत आपल्यापुढें येत नाहीं, तोंपयत आपण हिंदुस्थानांतून निघून जाणें इष्ट नाहीं अशी ठराविक सबब पुढें करून इंग्रजांनीं सत्तादानाच्या बाबतींत दिरंगाई चालविली होती. सर्व जातींच्या पुढाऱ्यांशीं वाटाघाटी करून एक संयुक्त आघाडी निर्माण करण्याचा राष्ट्रसभेनें अनेकदां प्रयत्न करून पाहिला. पण ब्रिटिशांच्या भेदनीतीमुळें आणि कॉंग्रेसच्या संघटनेंतील व कार्यपद्धतींतील मूलभूत दोषांमुळें हा उपक्रम कधींच तडीस गेला नाहीं. खुद्द राष्ट्रसभेची भूमिका ही तत्त्वतः जरी धर्म-निरपेक्षतेची होती, तरी तिच्यांतील बहुतेक पुढाऱ्यांचा सामाजिक दृष्टिकोन धर्माधिष्ठित मध्ययुगीन मूल्यांवरच आधारलेला होता. नव्या जाणिवा पत्कर-तांना राष्ट्रवादाच्या ह्या प्रवर्तकांनीं जुने संस्कार सोडले नाहींत. म्हणून राष्ट्रीय भावनेचा परिपोष झाला तरी, धर्मश्रद्धा व जातिनिष्ठा यांची

समाजजीवनांतील हुकमत कमी झाली नाहीं. औद्योगिक क्षेत्रांतील निरनिराळ्या जातींचे तात्कालिक हितसंबंध निरनिराळे असल्यानें नव्या जमान्यांतील आर्थिक स्पर्धेमधूनहि जातिभावनेचें संवर्धन झालें. राज्यकर्त्यांच्या कावेबाज व मतलबी धोरणानें निरनिराळ्या गटांतील ही तेढ वाढत गेली; व तिच्यांतूनच जातिवादाच्या ह्या बिकट व तापदायक समस्येचा जन्म झाला. हिंदु–मुसलमान, ब्राह्मण–ब्राह्मणेतर व स्पृश्य–अस्पृश्य अशा तिहेरी झगड्यांतून हा जातीयतेचा प्रश्न आजतागायत धुमसत राहिला आहे. मात्र त्या त्या जातींचा सामाजिक दर्जा, आर्थिक परिस्थिति आणि सांस्कृतिक परंपरा ह्यांच्या अनुषंगानें यांतील प्रत्येक झगड्याचें स्वरूप वेगवेगळें झालें आहे.

## हिंदु–मुसलमान

हिंदु–मुसलमान प्रश्न आजच्या स्वरूपांत गेल्या शतकाच्या अखेरीसच प्रथम निर्माण झाला. हिंदुस्थानांत मुसलमानांच्या स्वाऱ्यांना सुरवात झाल्यापासून हिंदु व मुसलमान राजांमध्यें सारख्या लढाया चालू होत्या. आपल्या सैनिकांत चेव उत्पन्न करण्यास दोन्ही बाजूंच्या सेनानींना तेव्हां धर्मश्रद्धेचा बराच उपयोगहि झाला हें खरें. परंतु त्याकाळीं लहानमोठ्या सरंजामदारांमध्यें सदोदित चालू असणाऱ्या झगड्यांहून या लढायांचें स्वरूप तत्त्वतः वेगळें नव्हतें. शिवाय खेड्यापाड्यांतील जनतेच्या दैनंदिन जीवनाशीं या लढ्याचा प्रत्यक्ष संबंध येत नव्हता. म्हणून सत्ताधारी वर्गातील या वैमनस्यामुळें ग्रामजीवनांतील हिंदु–मुसलमानांच्या सहकार्यांत कधीं अडथळा आला नाहीं. तेव्हां नुसत्या पूर्वेतिहासाच्या आधारानें आजच्या जातिवादाची मीमांसा करणें बरोबर नाहीं. गेल्या दीडशें वर्षांतील घटना, चळवळी व विचारधारा यांच्यामध्येंच या प्रश्नाचें मूळ आपणांस शोधावें लागेल.

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत ब्रिटिशांनीं प्रथम बंगाल प्रांतांत आपले पाय रोवले; आणि नंतर एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीस मुंबई व मद्रास हे प्रांत काबीज केले. म्हणून इंग्रजी राज्याविषयीं सहानुभूति बाळगणारा मध्यमवर्ग या प्रांतांत आधीं निर्माण झाला. इंग्रजी राजवटीपूर्वी ह्या सर्व प्रांतांतील वरिष्ठ वर्ग बव्हंशीं हिंदु होता. म्हणून या नवोदित मध्यमवर्गातहि

हिंदूंचें प्रमाण अधिक राहिलें. इंग्रजी शिक्षणामधून या वर्गाला इंग्लंडमधील औद्योगिक संस्कृति, लोकसत्ताक शासनपद्धति आणि आधुनिक विचारप्रवाह यांची ओळख आली. तेव्हां साहजिकच त्या बाबतींत इंग्रजांचें अनुकरण करण्यास ते प्रवृत्त झाले. तत्कालीन लोकजीवनावर धर्माचा जबरदस्त पगडा असल्यामुळें ह्या मध्यमवर्गातील पुढाऱ्यांना सामाजिक प्रगतीसाठीं प्रथम धर्मसुधारणेची आवश्यकता भासली, आणि 'ब्राह्मसमाज', 'मानवधर्मसभा', 'परमहंसमंडळी' अशा संस्था काढून त्यांनीं त्या दिशेनें पावलें टाकलीं. उत्तरेकडील प्रांत इंग्रजांनीं मागाहून जिंकले. त्यामुळें नव्या राजवटीचे फायदे स्पष्टपणें दिसून येण्यास तेथें बराच वेळ लागला. उत्तरेंत मुसलमानांचें साम्राज्य अधिक काळ टिकल्यानें तेथील सत्ताधारी वर्गात मुसलमान बहुसंख्य होते. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं मुसलमानांमध्येंहि वहाबी चळवळीसारख्या धर्मसुधारणेच्या चळवळी झाल्या; पण त्याकाळीं त्यांच्यावर इंग्रजी शिक्षणाचे संस्कार झालेले नव्हते. म्हणून वहाबी चळवळींत युरोपीय संस्कृतीच्या अनुकरणाची प्रेरणा दिसून येत नाहीं. मध्ययुगीन इस्लामच्या पुनरुज्जीवनाचा तो उत्स्फूर्त पण अत्यंत प्रतिगामी स्वरूपाचा उपक्रम होता. स्वकीय सरंजामदार आणि परकीय व्यापारी यांच्या पिळवणुकीनें संत्रस्त झालेल्या दलित वर्गात वहाबी चळवळ झपाट्यानें पसरली. मात्र तिच्यामुळें निर्माण झालेल्या सार्वत्रिक असंतोषाचा इंग्रजविरोधी संस्थानिकांनीं व सरंजामदारांनीं बंडाच्या काळांत भरपूर उपयोग करून घेतला. बंगाल व मुंबई या प्रांतांतील पुढारलेल्या वर्गाला ब्रिटिशांविषयीं सहानुभूति असल्यामुळें तेथें या बंडाचे पडसाद उमटले नाहींत. म्हणून सुरवातीच्या काळांत ब्रिटिश सरकारनें दक्षिणेंतील राजनिष्ठ हिंदु मध्यमवर्गाला सवलती देऊन उत्तरेंतील इंग्रजविरोधी मुसलमानांना दडपून टाकण्याचें धोरण अवलंबिलें.

इंग्रजांची सत्ता शस्त्रबलानें उलथून टाकण्याची आशा मावळल्यावर नव्या परिस्थितीशीं जुळतें घेणें मुसलमानांतील वरिष्ठ वर्गानाहि भाग पडलें. तेव्हां हर प्रयत्नानें ब्रिटिश राज्यकर्त्यांची कृपा संपादन करून हिंदी राज्ययंत्रांत जास्तींत जास्त प्रवेश करून घेण्याचा त्यांनीं निश्चय केला; आणि त्याच्या सिद्धीसाठीं इंग्रजी विद्या व आचारविचार आत्मसात् करून

घेण्याच्या मार्गास ते लागले. सर सय्यद अहमद हे मुसलमानांतील या उगवत्या नवशिक्षित मध्यमवर्गाचे प्रतिनिधि होत. 'हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्य ही आतांपर्यंत जगांत घडलेल्या घटनांतील एक अत्यद्भुत घटना होय'. 'ह्या राज्याच्या स्थैर्यावरच मुसलमानांच्या जीविताची व मालमत्तेची सुरक्षितता अवलंबून आहे'† अशी त्यांची श्रद्धा होती. म्हणून इंग्रज सरकारशीं एकनिष्ठ राहण्याचा त्यांनीं आपल्या धर्मबांधवांना उपदेश केला; आणि त्यांच्या राजनिष्ठेबद्दल ग्वाही देऊन नोकरशाहीच्या मनांत मुसलमान समाजाबद्दल सहानुभूति उत्पन्न केली. 'हिंदुस्थानांत जर कोणती भाषा शिकणें श्रेयस्कर असेल तर ती इंग्रजीच होय' § अशी खात्री पटल्यामुळें इंग्रजी शिक्षणाच्या प्रसारासाठीं त्यांनीं अलीगड विद्यालयाची स्थापना केली. कालांतरानें मुस्लीम पुनरुत्थानाचें केंद्र बनलेल्या अलीगड विद्यापीठांत या शैक्षणिक चळवळीची परिणति झाली.

याप्रमाणें १८७० च्या सुमारास उत्तरेकडील मुसलमान मध्यमवर्ग ब्रिटिशांचीं स्तुतिस्तोत्रें गाऊं लागला. पण या पूर्वीच मुंबई व बंगाल ह्या प्रांतांतील हिंदु मध्यमवर्गात राजकीय जागृतीला व सांस्कृतिक पुनरुज्जीवनाला प्रारंभ झाला होता. इंग्रजी संस्कृतीच्या प्रथमदर्शनानें आलेली स्तिमितता नाहींशी झाल्यावर सुशिक्षितांच्या स्वाभिमानानें पुन्हां उचल खाल्ली. सरकारी नोकरींतून स्वतःचा उत्कर्ष साधण्याची शक्यता कमी होऊं लागतांच स्वतंत्र कर्तृत्वाला ज्यांत वाव आहे अशा निरनिराळ्या क्षेत्रांत पदार्पण करण्याची महत्त्वाकांक्षा लोकांत जागृत झाली. सामाजिक व औद्योगिक प्रगतीसाठीं त्यांना राजकीय हक्कांची आवश्यकता वाटूं लागली. तेव्हां सरकारपुढें लोकांच्या अडचणी व मागण्या सनदशीरपणें मांडून त्यांची दाद लावून घेण्यासाठीं पुढारलेल्या वर्गांनीं राजकीय चळवळ सुरू केली; व तिच्यांतूनच पुढें भारतीय राष्ट्रवादाचा उदय झाला. कांहीं सुशिक्षित मुसलमानहि प्रथम उत्साहानें या चळवळींत सामील झाले. पण प्रबोधनाच्या

† Sir Sayyid Ahmad Khan–from *Modern Islam in India* by Wilfred Cantwell Smith, pp. 20, 15.

§ ibid, p. 15.

पहिल्या अवस्थेंत परकीय सरकारवर पूर्णपणें विसंबून राहणाऱ्या उत्तरेकडील मुसलमानांच्या पुढाऱ्यांना ही गोष्ट रुचली नाहीं.

तसें पाहिलें तर ब्रिटिश अधिकाऱ्यांनींच राष्ट्रसभेच्या स्थापनेस प्रोत्साहन दिलें होतें. पण तिची चळवळ जसजशी प्रभावी बनत चालली, तसतशी सरकारची सहानुभूति लुप्त होऊन तिची जागा साशंकतेनें घेतली. राष्ट्रवादी हिंदूंकडून सरकारची मेहेरनजर स्वाभाविकपणेंच राजनिष्ठ मुसलमानांकडे वळली. सुरवातीच्या काळांतील राज्यकर्त्यांचा उदारमतवाद आतां मागें पडला; आणि 'फोडा व झोडा' धोरणामागील संधिसाधु वृत्ति प्रबळ झाली. तेव्हां राष्ट्रसभेच्या मागण्यांवर जातीयतेचा आरोप करून तिच्याविषयीं त्यांनीं मुसलमानांच्या मनांत बुद्धिपुरस्सर दुजाभाव निर्माण केला. सर सय्यद अहमदसारखे जबाबदार व विचारवंत नेतेहि आपल्या अनुयायांना राष्ट्रसभेपासून अलिप्त राहण्याचा उपदेश करूं लागले. हिंदु समाजांतील राष्ट्रवादी प्रवक्त्यांनींहि वैदिक परंपरा, औपनिषदीय तत्त्वज्ञान, महाराष्ट्रधर्म यांच्या अभिमानावर आपल्या ध्येयवादाची उभारणी केल्यामुळें सुशिक्षित मुसलमान भावनेनें त्यांच्या विचारसरणीशीं समरस होऊं शकले नाहींत. उलट दयानंद, विवेकानंदप्रभृति हिंदु तत्त्वचिंतकांच्या धर्तीवर इस्लामचें पुनर्मूल्यमापन करून त्यांतून आधुनिक युगाशीं सुसंगत असणाऱ्या कल्पना काढून दाखविण्याचा मध्यमवर्गीय मुसलमान लेखकांनींहि खटाटोप केला. स्वातंत्र्य समता, बुद्धिवाद, लोकशाही इत्यादि कल्पना इस्लामशीं विसंगत नाहींत. उलट या कल्पनांवरच मुसलमान धर्म अधिष्ठित झालेला आहे. युरोपीय खिस्ती समाज तमोयुगांत खितपत पडलेला असतांना राजाचीं प्रजाविषयक कर्तव्यें, समाजांतील समता आणि बंधुभाव इत्यादि गोष्टींवर भर देऊन इस्लामनेंच आधुनिक लोकसत्ताक राज्यपद्धतीची मुहूर्तमेढ रोवली आहे असा अमील अली, हाली इत्यादि मुसलमान लेखकांचा दावा होता. व्यक्तिस्वातंत्र्य व बुद्धिप्रामाण्य यांसारखीं नवीं तत्त्वें स्वीकारतांना हिंदु व मुसलमान या दोन्ही जमातींनीं पुनरुज्जीवनवादाची कांस धरल्यामुळें त्यांच्यांतील ऐतिहासिक भेदभाव व भांडणें नष्ट होऊं शकलीं नाहींत. प्रत्यक्षांतहि दोन्ही समाजांतील मध्यमवर्गांचे हितसंबंध परस्परविरोधी होते. उत्तरेकडील उगवत्या मुसलमान

मध्यमवर्गाला नोकरीच्या व व्यापाराच्या क्षेत्रांत आधींच दृढमूल झालेल्या हिंदु मध्यमवर्गाची स्पर्धा पावलोपावलीं नडत होती. हिंदु-मुसलमानांतील कलहाग्नीला या तापदायक स्पर्धेमुळें अधिकच इंधन मिळालें. १८९० नंतर राष्ट्रसभेमध्यें जहाल प्रवृत्ती हळुहळू मूळ धरूं लागल्या. यावेळीं इंग्रजांच्या मुत्सद्दीगिरीमुळें हिंदु-मुसलमानांतील विरोधानें उग्र रूप धारण केलें; व १८९३ पासून जातीय दंग्यांचा उपद्रव सुरू झाला.

## मुस्लीम लीगची स्थापना

राष्ट्रीय चळवळीच्या दडपणाखालीं हिंदी लोकांना कांहीं प्रमाणांत राजकीय हक्क देण्यास इंग्रज सरकार जेव्हां प्रवृत्त झालें, तेव्हां त्या सत्तेंत भरपूर वांटा मिळविण्यासाठीं मुसलमानांनाहि स्वतंत्र राजकीय संघटनेची गरज भासूं लागली. ऑक्टोबर १९०६ मध्यें आगाखानांच्या नेतृत्वाखालीं मुस्लीम शिष्टमंडळानें लॉर्ड मिंटो यांची भेट घेऊन मुसलमानांसाठीं स्वतंत्र मतदार संघाची मागणी केली. त्यानंतर व्हाइसरॉय साहेबांच्या प्रोत्साहनानें व शिष्ट-मंडळांतील पुढाऱ्यांच्या प्रयत्नानें १९०६ सालच्या अखेरीस मुस्लीम लीगचा जन्म झाला.

सुरवातीस लीगमध्यें मोठमोठे जमीनदार व सरकारी अधिकारी यांचें प्राबल्य असून बहुतेक पुरोगामी कार्यकर्ते व विचारवंत तिच्यापासून अलिप्त होते. पण मुसलमानांतील मध्यमवर्गीय तरुणांच्या आकांक्षा वाढूं लागल्यावर ब्रिटिश राजवटीबद्दलचा त्यांचा भ्रम नाहींसा झाला; व त्यांच्यांतील जहाल प्रवृत्ति जोरदार होऊं लागल्या. सनदशीर मार्गानें कां होईना पण कांहीं तरी प्रत्यक्ष चळवळ करण्याची त्यांना आवश्यकता वाटली. १९१३ सालीं लीगची पुनर्घटना होऊन आगाखान, अमीर अली यांसारखे जुने पुढारी मागें पडले आणि राजनिष्ठेला बाध न आणतां स्वराज्याचे हक्क मिळविण्याची लीगनें घोषणा केली. अशा प्रकारें ध्येयामध्यें एकवाक्यता झाल्यावर कॉंग्रेस व लीग ह्या संस्था जवळ येऊं लागल्या. एकाच ठिकाणीं एकाच वेळीं त्यांचीं अधि-वेशनें भरविण्याची प्रथा सुरू झाली. या सलोख्याची व सहकार्याची परिणति १९१६ च्या लखनौ करारांत झाली. या करारानें विभक्त मतदारसंघाचें तत्त्व कॉंग्रेसनें मान्य केलें; आणि मुसलमान अल्पसंख्य असलेल्या

प्रांतांत लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षां अधिक प्रमाणांत त्यांना कायदेमंडळांत जागा देण्यास तिनें आपली संमति दिली. आपापसांतील मतभेद समजुतीनें मिटविण्याचा आणि एकजुटीच्या जोरावर परकीयांना विरोध करून स्वराज्य मिळविण्याचा दोन्ही संस्थांनीं संकल्प केला.

महायुद्धाच्या अखेरीस साऱ्या हिंदुस्थानांतील असंतोष वाढत होता. खिलाफत प्रकरणामुळें झालेल्या मुसलमानांच्या अपेक्षाभंगाची त्यांत भर पडली. जनतेच्या प्रक्षुब्ध भावनांना वळण लावून सुसंघटितपणें सरकारशीं झगडण्याचें सामर्थ्य राजाश्रयाखालीं संथपणें वाटचाल करणाऱ्या मुस्लीम लीगमध्यें नव्हतें. म्हणून ती कांहीं काळ बाजूस पडली; आणि अलीबंधूंच्या तडफदार नेतृत्वाखालीं खिलाफत कमिटीची स्थापना झाली. सरकारवर लोकमताचें दडपण आणण्यासाठीं या कमिटीच्या पुढारीपणाखालीं मुसलमानांनीं गांधीप्रणीत असहकाराचा मार्ग स्वीकारला. धर्मभावनेनें सरकारशीं झगडण्यास प्रवृत्त झालेल्या मुसलमानांबद्दल सहानुभूति दाखवून त्यांना साथ करण्याचें राष्ट्रसभेनें ठरविल्यावर पंजाब, खिलाफत व स्वराज्य यांच्यासाठीं एक देशव्यापी चळवळ उभी करण्यांत आली. या चळवळींतील लोकांचा उत्साह खरोखरीच विलक्षण होता. त्यामुळें जातीजातींतील भेद कांहीं काळ लुप्त होऊन गेले. मशिदींमधून हिंदु नेत्यांचीं प्रवचनें होऊं लागलीं. हिंदु-मुस्लीम ऐक्याच्या घोषणा सर्वत्र दुमदुमूं लागल्या. पण ही एकजूट फार काळ टिकली नाहीं. उलट खिलाफत चळवळीनें मुसलमानांची धर्मभावनाच पोसली गेली. धर्मनिरपेक्ष दृष्टीनें राष्ट्रीयत्वाची जोपासना करण्याचे प्रयत्न झाले नाहींत. म्हणून महात्माजींनीं कायदेभंगाची चळवळ मागें घेतांच सगळीकडे निराशेचें व फुटीरपणाचें वातावरण पसरलें; आणि जातीय दंग्यांना जास्तच ऊत आला. दंगे शमविण्यासाठीं हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांत वाटाघाटी होत. पण मुसलमान पुढारी जादा सवलतींसाठीं अडून बसत. त्यांच्या दुराग्रहानें वाटाघाटी फिसकटल्या कीं निर्वाणीचा मार्ग म्हणून राष्ट्रसभेला प्रत्यक्ष प्रतिकाराचा मार्ग स्वीकारावा लागे. चळवळीच्या वेळीं जातीय संस्था अलिप्त रहात. पण लोकमताच्या दडपणाखालीं राजकीय हक्क प्राप्त होण्याची वेळ आली, कीं जास्त वांटा मिळविण्यासाठीं जातीय दंग्यांची आग भडकविली जाई. चळवळ,

दंगे व वाटाघाटी अशा या चाकोरींतून हिंदी राजकारणाचा प्रवाह अव्याहत चालू राहिला; आणि अनेक अपप्रवृत्तींना वाव मिळून आपलें सार्वजनिक जीवन अंतर्बाह्य दूषित होऊन गेलें.

## हिंदुमहासभेचें राजकारण

दंग्यांचें प्रमाण वाढत चालल्यामुळें आत्मसंरक्षणासाठीं म्हणून दोन्ही जमातींनीं संघटनेला सुरवात केली. मुसलमान समाजांतील ऐक्य व धर्मवेड यामुळें दंग्याच्या काळांत ते पुष्कळदां वरचढ ठरत. त्यांच्या हल्ल्यांस तोंड देण्यास हिंदूंना समर्थ करण्याच्या हेतूनें प्रथम हिंदुसभेची स्थापना झाली. १९०९ सालीं पंजाबमध्यें पहिली प्रांतीय परिषद भरून तिच्यांतून पंजाब हिंदुसभेचा जन्म झाला. हळुहळू इतर प्रांतांतहि तिच्या विचारसरणीचा प्रसार होऊं लागला. १९१५ सालीं हरद्वार येथें अखिल भारतीय हिंदुमहासभेचें पहिलें अधिवेशन भरलें. "अखिल हिंदुसमाज एकजीव करण्यासाठीं त्यांतील सर्व अंगोपांगांना सुसंघटित करणें आणि हिंदु व इतर जातींमध्यें सद्भावना उत्पन्न करून त्यांच्याशीं मित्रत्वानें वागणे" § हें हिंदुमहासभेचें ध्येय होतें. प्रारंभीं ह्या संस्थेकडे विशेष कोणाचें लक्ष गेलें नाहीं. १९२२ नंतर जातीय दंग्यांना जोरानें सुरवात झाली. तेव्हां हिंदु धर्माच्या व समाजाच्या रक्षणासाठीं कांहींतरी प्रत्यक्ष हालचाल करण्याची निकड वाटल्यानें स्वामी श्रद्धानंदांनीं 'शुद्धि' व 'संघटन' या चळवळींची उभारणी केली. लाला लजपतराय, पंडित मदन मोहन मालवीय इत्यादि अव्वल दर्जाच्या पुढाऱ्यांनीं ह्या कार्यक्रमांत उत्साहानें भाग घेतला. श्रद्धानंदांनीं संयुक्त प्रांतांतील हजारों मलकाना रजपुतांना शुद्ध करून हिंदु धर्मांत परत घेतलें. ह्या चळवळीमुळें हिंदुमहासभेच्या कार्याला बरीच प्रसिद्धि मिळाली. मात्र ह्या कार्याचें स्वरूप अजून सामाजिक व सांस्कृतिक असून राजकीय क्षेत्रांतील राष्ट्रसभेचा अधिकार व प्रतिनिधित्व सर्वांना मान्यच होतें. राष्ट्रसभेच्या मंडपांत हिंदुमहासभेचीं अधिवेशनें भरत; आणि राष्ट्रसभेचे मोठमोठे हिंदु व मुसलमान पुढारी त्यांना हजरहि राहात. हिंदूंचें संघटन

§ रा. गो. भिडे—हिंदु महासभेचा इतिहास, पृ. ४९.

हा राष्ट्राच्या संघटनेच्या मार्गावरील एक टप्पा आहे अशा दृष्टीनेंच राष्ट्रीय पुढारी त्यावेळीं हिंदुसभेकडे पाहात होते.

१९२० ची असहकाराची चळवळ मागें घेतल्यावर कॉंग्रेसमध्यें कौन्सिलप्रवेशाच्या प्रश्नावर वाद सुरू झाला. कॉंग्रेसच्या परवानगीनें स्वराज्यपक्ष कायदेमंडळांत प्रविष्ट झाला. पण तेथेंहि सरकारशीं सहकार्य करण्याच्या मुद्यावर त्यांच्यांत दुफळी माजून केळकर, मुंजे इत्यादि पुढाऱ्यांनीं प्रतिसहकारपक्ष काढला. प्रतिसहकारपक्षाचे हे नेतेच हिंदुसभेच्या कार्यांतहि आघाडीवर होते. तेव्हां कॉंग्रेसच्या अधिकृत धोरणाशीं असलेल्या त्यांच्या विरोधाचे पडसाद हिंदुसभेंतहि उठूं लागले. दिल्ली येथील हिंदुसभेच्या अधिवेशनांत तर हिंदूंच्या हितरक्षणार्थ पुढील निवडणुकींत जरूर पडल्यास स्वतंत्र उमेदवार उभे करण्याचा ठराव पास झाला. महासभेनें आपली मूळची सांस्कृतिक भूमिका सोडल्यामुळें मोतिलाल नेहरूंसारख्या कॉंग्रेसनेत्यांनीं तिच्या या नवीन धोरणाचा निषेध केला. परंतु त्याचा विपरीत परिणाम होऊन राष्ट्रसभा व हिंदुसभा यांच्यांतील मतभेदांना अत्यंत अनिष्ट वळण लागलें.

आत्मसंरक्षणार्थ हिंदुमहासभेनें सुरू केलेल्या मोहिमेची मुसलमान समाजांत ताबडतोब प्रतिक्रिया घडून आल्याखेरीज राहिली नाहीं. आतांपर्यंत धर्मांतराबद्दल उदासीन असणाऱ्या हिंदु समाजांतील ही शुद्धिचळवळ हें आपल्या धर्मावर झालेलें आक्रमण होय अशी मुसलमानांनीं समजूत करून घेतली. हिंदु संघटनेच्या व शुद्धीकरणाच्या चळवळीस तोडीस तोड म्हणून त्यांच्यामध्येंहि ‘ तंजीम ’ व ‘ तबलीक ’ अशा चळवळी निघाल्या. त्यामुळें दोन्ही जमातींमध्यें परस्परांबद्दल द्वेषभाव उत्पन्न होऊन त्या एकमेकींपासून कायमच्या दूर गेल्या. उपवास, प्रार्थना, शांतिपरिषदा यांच्या योगानें त्यांची दिलजमाई करण्याचे गांधीजींचे प्रयत्न सिद्धीस गेले नाहींत.

## द्विराष्ट्रवादाचा प्रचार

१९३० सालीं देशामध्यें कायदेभंगाचें जें प्रचंड आंदोलन झालें, त्यामुळें हिंदुमहासभा, मुस्लीम लीग यांसारख्या संकुचित दृष्टीच्या निष्क्रिय संस्था कांहीं काळ गतप्रभ झाल्या; आणि आपल्या जातीचा व धर्माचा

विचार न करतां हजारों तरुणांनीं राष्ट्रसभेच्या हांकेला ओ देऊन प्रतिकाराच्या चळवळींत उत्साहानें भाग घेतला. राष्ट्रीय संग्रामांतील या एकजुटीनें गांगरून गेलेलें ब्रिटिश सरकार यावेळीं जातिवादाच्या मदतीला धांवून आलें. गोलमेज परिषदेमधून जातिनिष्ठ पुढाऱ्यांना प्रतिनिधित्व बहाल करून इंग्रज सरकारनें त्यांच्या पुढारीपणावर राजमुद्रा ठोकली. अहरार पक्ष, कृषक प्रजा पक्ष, मोमीन व शिया परिषदा किंवा खुदाई खिदमतगार आणि खाकसार अशा मुसलमानांच्या अनेक राजकीय संस्था त्यावेळीं अस्तित्वांत होत्या. पण त्यांना डावलून इंग्रज सरकारनें लीगला हाताशीं धरलें. सरकारच्या कृपादृष्टीमुळें लीगचें वजन वाढूं लागल्यावर तिच्या मागण्याहि चढत चालल्या; आणि काँग्रेस–लीग तडजोड जवळ जवळ अशक्य होऊन बसली. तरीहि १९३७ पर्यंत लीगचें धोरण एकंदरींत प्रतिगामी असल्यामुळें १९३५ च्या कायद्यानुसार झालेल्या प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुकांत तिला मतदारांचा मुळींच पाठिंबा मिळाला नाहीं. त्यानंतर मात्र महमद अल्ली जीना यांच्या नेतृत्वाखालीं लीग अधिकाधिक सुसंघटित, क्रियाशील व प्रातिनिधिक बनत गेली. सर्वसामान्य मुसलमानांना आकर्षून घेणारा चढाईचा कार्यक्रम आंखण्यांत आला. राष्ट्रसभेची बरोबरी करण्याच्या इर्षेनें १९४० सालीं स्वतंत्र मुस्लीम राष्ट्राची मागणी पुढें आली. राष्ट्रसभेंतील तरुण जहाल गटानें केलेल्या जनतासंपर्काच्या ठरावाबाबत काँग्रेसश्रेष्ठींनीं फारसा उत्साह न दाखविल्यामुळें राष्ट्रीय वृत्तीच्या अनेक मुसलमान युवकांची निराशा झाली होती. आपल्या आक्रमक धोरणानें लीगनें त्यांना आकर्षून घेतलें. या सर्व घडामोडींतून हिंदुस्थानांत एका स्वतंत्र मुस्लीम राष्ट्रवादास आकार येऊं लागला. हळुहळू सर्व प्रांतांतील मुसलमानांनीं पाकिस्तानची मागणी उचलून धरली. अखेर तिला ब्रिटिश सरकारची मान्यता मिळून १९४७ सालीं देशाची फाळणी झाली; आणि येथें दोन स्वतत्र आणि सार्वभौम राष्ट्रें अस्तित्वांत आलीं.

ज्या कारणांनीं १९३७ नंतर मुस्लीम लीगची लोकप्रियता वाढली, तींच कारणें हिंदुमहासभेच्या वाढीलाहि पोषक ठरलीं. राष्ट्रीय चळवळीपासून मुसलमानांना वेगळें काढण्याच्या हेतूनें इंग्रज सरकारनें १९३२ च्या जातीय निवाड्यांत त्यांना जादा हक्क दिले होते. या निर्णयामागील ब्रिटिशांचा डाव

राष्ट्रसभेनें ओळखला. परंतु बहुसंख्य मुसलमानांचीं मनें वेधून घेणारा कोणताच कार्यक्रम तिच्यापाशीं नसल्यानें या निर्णयाचा एकदम निषेध करणें तिला श्रेयस्कर वाटलें नाहीं. म्हणून विरोधहि नाहीं आणि संमतिहि नाहीं अशी तटस्थतेची गुळमुळीत भूमिका काँग्रेसनें स्वीकारली. अशा वेळीं हिंदूंच्या हितसंरक्षणाची जबाबदारी स्वतःवर घेऊन हिंदुसभेनें जातीय निर्णयाला तीव्रतेनें विरोध करण्यांत पुढाकार घेतला. अल्पसंख्याकांच्या हितरक्षणाच्या नांवाखालीं सरकार बहुसंख्य जमातींच्या न्याय्य हक्कांवर घाला घालीत आहे असा तिनें आवाज उठविला. राष्ट्रसभेच्या धोरणांतील अनिश्चितता आणि निष्क्रियता यांना कंटाळलेल्या कांहीं लोकांनीं त्याचें मनःपूर्वक स्वागत केलें. सावरकर स्थानबद्धतेंतून सुटून आल्यावर हिंदुसभेच्या उद्दिष्टांना राजकीय ध्येयाची जोड मिळाली. मुस्लीम लीगनें पाकिस्तानची मागणी केल्यावर फाळणीला विरोध हें हिंदुसभेचें घोषवाक्य ठरलें. मात्र पहिल्यापासून हिंदुमहासभेची भूमिका आक्रमक नसून संरक्षक स्वरूपाची होती. ‘ हिंदुस्थान हिंदूंचें राष्ट्र आहे ’ असें तिचे पुढारी म्हणत. पण अल्पसंख्याकांना रास्त हक्क देण्यास त्यांची ना नव्हती. मात्र राजकीय सत्ता इंग्रजांच्या हातांत एकवटली असल्यामुळें त्यांच्यापासून ती हस्तगत करण्यासाठीं झगडणें हें वास्तविक हिंदुमहासभेचें आद्य कर्तव्य होतें. परंतु तसें न करतां काँग्रेसच्या मुसलमानधार्जिणेपणावरच नुसती टीका करीत राहिल्यानें तिचा सरकारवर किंवा बहुजनसमाजावर प्रभाव पडला नाहीं. म्हणून काँग्रेस व लीग यांच्यामध्यें वाटाघाटी चालू असतांना मुसलमानांचें पारडें जड होऊं नये ह्याबद्दल खबरदारी घेण्यांतच तिनें आपली सारी शक्ति खर्च केली. हिंदूंच्या आक्रमकतेचा डांगोरा पिटतांना हिंदुमहासभेच्या घोषणांचा लीगला आधार मिळाला; आणि मुसलमान पुढाऱ्यांच्या हेकेखोरपणामुळें हिंदुसभेच्या प्रचारास अनुकूल वातावरण निर्माण होत गेलें. अशा रीतीनें ह्या दोन्ही संस्था परस्परांना उपकारक ठरल्या; आणि राष्ट्रीयत्वाच्या भावनेला शबलता आणण्यास त्यांचे प्रयत्न कारणीभूत झाले.

## महाराष्ट्र आणि हिंदुमहासभा

महाराष्ट्रांत मुसलमान अतिशय अल्पसंख्य असल्यानें लीगच्या राज-

कारणाला येथें महत्त्व येण्याचें कांहीं कारण नव्हतें. पण विशिष्ट परिस्थितीमुळें व परंपरेमुळें हिंदुमहासभेची विचारसरणी इतर प्रांतांपेक्षां महाराष्ट्रांतच अधिक फैलावली. नजीकच्या भूतकालामध्यें महाराष्ट्रानें मुसलमानांची राजवट नेस्तनाबूद करून हिंदुपदपातशाहीची स्थापना केली होती. इस्लामच्या आक्रमणाला पायबंद घालण्याचें काम महाराष्ट्रच पुन्हा अंगावर घेऊं शकेल असा येथील व कित्येकदां इतर प्रांतांतीलहि पुढाऱ्यांना विश्वास वाटणें स्वाभाविक होतें. हिंदु संस्कृतीच्या अभिमानावर आणि मराठेशाहींतील पराक्रमाच्या व वैभवाच्या स्मृतीवर राष्ट्रवादाची उभारणी करणारी विचारसरणीहि चिपळूणकर–टिळकांच्या नेतृत्वाखालीं येथें बरीच मान्यता पावली होती. शिवाय गांधीजींच्या सुधारणावादाला व कायदेभंगाला विरोध करणाऱ्या टिळक संप्रदायांतील प्रतिगामी गटालाहि आपल्या भूमिकेच्या समर्थनासाठीं एकाद्या सुसंबद्ध विचारप्रणालीची आवश्यकता भासत होती. म्हणून हिंदूंच्या हितसंबंधांचें संरक्षण करण्याची जबाबदारी स्वतःवर घेऊन केळकर–सावरकरांनीं आपल्या कॉंग्रेसविरोधाला वैचारिक अधिष्ठान देण्याची खटपट केली. महाराष्ट्रांतील उच्चवर्णीय मध्यमवर्गामध्यें त्यांना बरेच अनुयायी मिळाले.

१९३० च्या आर्थिक मंदीनंतर येथील वर्गकलह अधिकाधिक तीव्रतर होऊं लागला. ब्राह्मणेतरांमधील जागृतीबरोबर ब्राह्मणांचें सामाजिक वर्चस्व संपुष्टांत येत होतें. तसेंच कामगारचळवळीमधून समाजवादाचेहि वारे वाहूं लागले होते. अशा वेळीं आपले परंपरागत हक्क शाबूत राखण्यासाठीं स्वतंत्र संघटना उभारण्याची वरिष्ठ वर्गाला गरज भासूं लागली. याच सुमारास जर्मनींत हुकुमशाहीचा उदय झाला होता. बहुसंख्य जनतेची सामाजिक समतेची मागणी संघटित लष्करी सामर्थ्याच्या बळावर दडपून टाकणें शक्य आहे असें हिटलर-मुसोलिनींनीं जगाच्या निदर्शनास आणून दिलें होतें. महाराष्ट्रांतील उच्चवर्णीय मध्यमवर्गीयांना लोकशाहीचें वावडें असल्यामुळें जर्मनींतील या उपक्रमामुळें त्यांना आशा उत्पन्न झाली; आणि एकचालकानुवर्तित्वाच्या तत्त्वावर उभारलेल्या 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघा'बद्दल त्यांना विलक्षण आत्मीयता वाटली. व्यक्तिवातंत्र्य, बुद्धिनिष्ठा, सहिष्णुता इत्यादि लोकशाहीच्या मूलतत्त्वांऐवजीं बलसंवर्धन, विभूतिपूजा, शिस्तपालन इत्यादि मूल्यांचा संघानें उदोउदो केला.

मानवाच्या सर्वांगीण विकासासाठीं खटपट करण्याऐवजीं शिस्तीच्या व सुव्यवस्थेच्या नांवाखालीं त्याला एका ठराविक साच्यांत कोंडण्याची त्यानें महत्त्वाकांक्षा बाळगली. परंतु दलितांचें संख्याबल, शरीरसामर्थ्य आणि त्यांच्यांतील विचारजागृति यांना घाबरणाऱ्या उच्चवर्णीयांना बहुजनसमाजाची चळवळ दडपून टाकण्यासाठीं तिचा आधार घ्यावासा वाटला. म्हणून ते मोठ्या संख्येनें संघामध्यें सामील झाले. आपलें डळमळणारें आसन कसेंबसें टिकविण्यासाठीं धडपडणाऱ्या संस्थानिक सरंजामदारांसारख्या जुन्या वर्गांना मध्ययुगीन मूल्यांची जोपासना करणारी ही विचारसरणी विलोभनीय वाटली. म्हणून त्यांनींहि राष्ट्रीय स्वयंसेवक संघाला सहानुभूति दाखविली. मात्र मुसलमानांशीं झगडण्याऐवजीं महाराष्ट्रांतील पुरोगामी शक्तींशीं लढण्यांतच महासभा आणि संघ यांनीं आपलें बळ उपयोगांत आणलें; आणि त्यांच्यांतील हुकुमशाही प्रवृत्तीचा परिणाम जातीय संघर्ष तीव्रतर करण्यांत झाला.

### ब्राह्मण–ब्राह्मणेतर

हिंदु–मुस्लीम प्रश्नाप्रमाणें ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादहि गेल्या शंभर वर्षांतील येथील सामाजिक, आर्थिक व राजकीय परिस्थितीचाच परिपाक आहे. जन्मसिद्ध जातिव्यवस्था हें आपल्या समाजव्यवस्थेचें एक पुरातन वैशिष्ट्य आहे. जाति आणि व्यवसाय यांच्यांतील शास्त्रविहित व अविभाज्य संबंधामुळें फार पूर्वीपासून येथील समाजजीवन स्थितिशील व साचेबंद बनलें होतें. खालच्या जातींतील बुद्धिमान् व महत्त्वाकांक्षी तरुणांची नेहमींच कुचंबणा होत होती; आणि वरिष्ठ जातींच्या सामाजिक व सांस्कृतिक मक्तेदारीबद्दल त्यांना वेळोवेळीं वैषम्य वाटत होतें. वारकरी संतांच्या वाङ्मयांतहि जाति-संस्थेंतील या अन्यायाची व विषमतेची बोंचणी आपणांस आढळून येते. परंतु जातिसंस्थेव्यतिरिक्त दुसरा पर्याय त्या काळीं उपलब्ध नसल्यामुळें जन्मसिद्ध उच्चनीचभावाबद्दल नापसंती दाखविणाऱ्या उदारतेच्या कल्पनांना प्रत्यक्ष सामाजिक व्यवहारांत फारसा थारा मिळाला नाहीं.

शिवाजीच्या काळांत येथील समाजजीवनाला नवा आकार येऊं लागला. परकीयांशीं लढून राजकीय सत्ता काबीज करण्यांत सर्व जातींनीं सहकार्य केलें. निरनिराळ्या जातींच्या लोकांशीं वागतांना शिवछत्रपतींनीं निःपक्षपातीपणाचें

व सहिष्णुतेचें धोरण ठेवल्यामुळें सर्वांच्याच मनांत मराठी राज्याबद्दल निष्ठा व आपुलकी उत्पन्न झाली. स्वराज्याचें साम्राज्यांत रूपांतर झाल्यावर मात्र जातीजातींतील हें सख्य फार काळ टिकलें नाहीं. पेशवाईच्या उत्तरार्धांत राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक सत्ता ब्राह्मणांच्या हातांत एकवटली. आणि आपल्या जातीच्या हितासाठीं त्यांनीं तिचा बेसुमार उपयोग करून घेतल्यामुळें इतर जातींना ब्राह्मणांबद्दल अप्रीति वाटूं लागली. जातीजातींतील सहकार्याचे व एकजुटीचे बंध शिथिल झाले; आणि स्वार्थबुद्धीचा अतिरेक होऊन अंतर्गत यादवीला ऊत आला. पुढें पेशव्यांच्या दरबारांतील अंतःकलह आणि शिंदे, होळकर वगैरे सरदारांतील बेबनाव व स्पर्धा हीं वाढत गेल्यामुळें मराठेशाहीला उतरती कळा लागली. मात्र बहुसंख्य जनता राज्यसत्तेबद्दल उदासीन असल्या-मुळें हें जातीय राजकारण वरिष्ठ वर्गापुरतें मर्यादित राहिलें. सर्व समाजाला व्यापून टाकणारा जातिवादाचा सामाजिक प्रश्न त्यांतून उद्भवला नाहीं.

इंग्रजांच्या सत्तेखालीं येथील आर्थिक व सामाजिक जीवनांत एक मोठें स्थित्यंतर घडून आलें. पण पूर्वीपासून ज्यांच्या पाठीशीं विद्येची व विचारांची परंपरा होती अशा उच्चवर्णीयांनाच नव्या परिस्थितीचा ताबडतोब फायदा घेतां आला. त्यामुळें ब्राह्मण, सारस्वत, प्रभु या पांढरपेशा जातीच सामाजिक व राजकीय क्षेत्रांत प्रथम पुढें आल्या. इंग्रजी शिक्षण घेतलेल्या ह्या जातींतील तरुणांनीं सरकारी राज्ययंत्रांत अधिकाराच्या जागा पटकावल्या; आणि स्वतःची तुंबडी भरण्यासाठीं शेतकरी व कारागीर यांच्या पिळवणुकींत इंग्रज सरकारला साहाय्य केलें. म्हणून बहुजनसमाजाला त्यांच्याबद्दल एक प्रकारचा अविश्वास व दुजाभाव वाटूं लागला. भाषा, पोषाख आणि आचारविचार यांतहि शहरांतील ह्या मध्यमवर्गानें परकीयांचें अनुकरण केल्यामुळें बहुजनसमाज व मध्यमवर्ग यांच्यांतील अंतर वाढत गेलें. इंग्रजांची शासनपद्धति आणि समाजसंस्था यांच्या अध्ययनामुळें एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत सुशिक्षितांमध्यें विचारमंथनाला सुरवात झाली. सामाजिक प्रगतीच्या मार्गाबद्दल या पिढींतील विचाराग्रणींत जो संग्राम झाला, त्यांत बुद्धिवाद व सुधारणावाद यांचा पराभव झाला; आणि वर्णव्यवस्था व वैदिक तत्त्वज्ञान यांच्या आत्यंतिक अभिमानावर राष्ट्रवादाची उभारणी

झाली. एतिहासिक कालांत तत्त्वज्ञान, वाङ्मय व धर्मशास्त्र यांच्या अध्ययनांत आणि संवर्धनांत उच्चवर्णीयांनींच प्रामुख्यानें भाग घेतला होता. म्हणून सांस्कृतिक पुनरुज्जीवनामध्येंहि कळत नकळत वर्णवर्चस्वाची भावनाच पोसली गेली. त्यामुळें सुशिक्षितांच्या नेतृत्वाखालीं चाललेली राजकीय चळवळ बराच काळपावेतों सर्वसामान्य जनतेपर्यंत जाऊन पोहोंचली नाहीं; आणि पांढरपेशा वर्ग व बहुजन समाज यांच्यांतील अंतर कायमच राहिलें.

## जोतिराव फुले आणि सत्यशोधक समाज

सरकारी नोकऱ्या आणि शिक्षणसंस्था यांमधून सुशिक्षित वर्गाची जरी कांहीं प्रमाणांत सोय झाली, तरी आर्थिक संक्रमणाबरोबर शेतकऱ्यांची परिस्थिति सारखी खालावत होती. दारिद्य व अन्याय यांच्याविरुद्ध नेटानें झगडा करण्याऐवजीं नशिबावर हवाला ठेवून प्राप्त परिस्थितीचे आघात निमूटपणें सहन करण्याची, या कष्टाळू लोकांना अनेक शतकांच्या मानसिक गुलामगिरीमुळें सवय जडली होती. इंग्रजी शिक्षण व खिस्ती धर्मोपदेशकांचे धर्मप्रसाराचे प्रयत्न यांमधून बहुजनसमाजांतील कांहीं व्यक्तींना शूद्रातिशूद्रांच्या या वाढत्या दैन्यावस्थेची जाणीव होऊं लागली. सामाजिक विषमता व आर्थिक पिळणूक यांच्याबद्दलची खंत आणि चीड आधुनिक महाराष्ट्रांत जोतिराव फुले यांच्या लिखाणांतून प्रथम प्रगट झाली आहे. 'शूद्रां'च्या गुलामगिरीचें खरें स्वरूप उघड करून तिचें निर्मूलन करण्याचा त्यांनीं चंग बांधला होता. जोतिराव फुले यांच्या समाजसुधारणेच्या प्रेरणेंत श्रमजीवी वर्गाच्या आशाआकांक्षा व रागद्वेष प्रतिबिंबित झाले आहेत. त्याकाळीं बहुजनसमाजाला राजकीय सत्तेची मुळींच अपेक्षा नसल्यानें राजकारणाची त्यांनीं उपेक्षा केली तर त्यांत आश्चर्य नाहीं. बहुजनसमाजाच्या जिव्हाळ्याच्या सामाजिक व आर्थिक प्रश्नांचा फुले, आणि भालेकरप्रभृति त्यांचे सहकारी यांनीं आत्मीयतेनें परामर्श घेतला; आणि ते सोडविण्यासाठीं खालच्या थरांतील लोकांना जागृत व संघटित बनविण्याचा अगदीं ओबडधोबड स्वरूपांत कां होईना पण चिकाटीनें प्रयत्न केला. त्यांच्या 'सत्यशोधक' चळवळीला सुरवातीस बराच पाठिंबा मिळाला. पण त्यांचा तडफदार व मूलगामी दृष्टिकोन पचविण्याइतकी त्यांच्या

अनुयायांची अद्याप तयारी झालेली नसल्यानें फुल्यांच्या मृत्यूनंतर सत्यशोधक चळवळ एकदम थंडावली.

विसाव्या शतकाच्या प्रारंभीं ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळीस परत तोंड फुटलें. बडोदा व कोल्हापूर येथील संस्थानिकांनीं शाळा, वसतिगृहें व शिष्यवृत्त्या यांच्या द्वारां ब्राह्मणेतरांच्या शिक्षणाला प्रोत्साहन दिलें; व संस्थानांतील अधिकारपदावर त्यांची नेमणूक करून व निरनिराळ्या खात्यांत त्यांना नोकऱ्या देऊन त्यांच्या आर्थिक व सामाजिक उत्कर्षाचा मार्ग मोकळा केला. राजसत्तेच्या जोरावर कोल्हापुरास शाहुमहाराजांनीं ब्राह्मण-विरोधी आक्रमक धोरण आंखलें. ब्राह्मणांच्या बरोबरीनें सामाजिक स्थान मिळविण्यासाठीं आपल्या घरचे संस्कार वेदोक्त पद्धतीनें करण्याचा त्यांनीं आग्रह धरला; आणि त्यांच्या इच्छेप्रमाणें पौरोहित्य करण्याचें नाकारल्यावरून त्यांचे उपाध्याय श्री. राजोपाध्ये यांचें इनाम त्यांनीं जप्त केलें. हें वेदोक्त प्रकरण महाराष्ट्रांत बरेंच गाजलें; व दोन्ही बाजू हट्टास पेटल्यामुळें ब्राह्मण व मराठा यांच्या संबंधांत थोडासा कडवटपणाहि आला. त्याचप्रमाणें ब्राह्मण शंकराचार्यांना प्रतिस्पर्धी म्हणून शाहुछत्रपतींनीं क्षात्रजगद्गुरूचें धर्मपीठ स्थापन केलें; व ब्राह्मणशाहीचा बीमोड करण्यासाठीं प्रत्येक जातीचे उपाध्याय तयार करण्याची मोहीम हातीं घेतली. मात्र शाहुमहाराजांनीं जरी ब्राह्मणांविरुद्ध आघाडी उभारली असली, तरी इतर जातींच्या बाबतींत त्यांचा दृष्टिकोन उदार व सर्वसंग्राहक होता. मराठ्यांप्रमाणेंच जैन, मुसलमान, लिंगायत, अस्पृश्य या जातींच्या विद्यार्थ्यांसाठीं वसतिगृहें काढून त्यांच्या शिक्षणालाहि त्यांनीं मदत केली. लग्नासारख्या धार्मिक प्रसंगीं आपल्या परिवारांत त्यांनीं अस्पृश्यांना जागा दिली. इतकेंच नव्हे तर सार्वजनिक ठिकाणीं स्वतःच्या रास्त हक्कासाठीं झगडण्यास त्यांनीं त्यांना उद्युक्त केलें. परंतु शिक्षणप्रसार किंवा अस्पृश्यतानिवारण यांसारख्या विधायक कार्यांतहि त्यांना उच्चवर्णीयांचा मनःपूर्वक पाठिंबा मिळाला नाहीं. त्यामुळें ब्राह्मणेतरांच्या मनांतील ब्राह्मणांबद्दलचा द्वेष वाढतच गेला.

मॉंटेग्यूच्या जाहीरनाम्यानंतर कांहीं अल्पस्वल्प राजकीय हक्क पदरांत पडण्याची जेव्हां आशा दिसूं लागली, तेव्हां ब्राह्मणेतर पुढाऱ्यांचें लक्ष राजकीय

हक्कांकडे वेधलें गेलें. ब्राह्मणेतरांसाठीं स्वतंत्र मतदारसंघ मागण्याच्या उद्देशानें मद्रास इलाख्यांतून एक शिष्टमंडळ पार्लमेंटसभेकडे रवाना करण्यांत आलें होतें. त्याचें अनुकरण करून महाराष्ट्रांतील ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनींहि आपलें म्हणणे ब्रिटिश सरकारला कळविण्याकरितां श्री. भास्करराव जाधव यांना इंग्लंडला पाठविलें. १९१९ च्या कायद्यामध्यें स्वतंत्र मतदारसंघाची मागणी मंजूर झाली नाहीं परंतु मुंबई विधिमंडळांत मराठा व तत्सम जातींसाठीं कांहीं जागा राखून ठेवण्यांत आल्या. निवडणुकीच्या निमित्तानें भास्करराव जाधव, श्रीपतराव शिंदे, बाबुराव व केशवराव जेधे इत्यादि पुढाऱ्यांनीं वृत्तपत्रें, संमेलनें, मेळे व परिषदा यांसारख्या साधनांचा उपयोग करून ब्राह्मणेतरांमध्यें राजकीय जागृति घडवून आणली. १९२०, १९२३ व १९२६ सालीं झालेल्या निवडणुकांत ब्राह्मणेतरांचे प्रतिनिधि कायदेमंडळांत निवडून आले; आणि मुंबई विधिमंडळांत अधिकृतपणें 'ब्राह्मणेतर पक्ष' हि अस्तित्वांत आला. १९२३ नंतर ब्राह्मणेतर पक्षाच्या कांहीं पुढाऱ्यांची मंत्रीपदावर नेमणूक झाली. त्यांच्या प्रेरणेनें मुंबई विधिमंडळानें जोश्यांचीं वतनें नष्ट करण्याचा कायदा पास केला, स्थानिक संस्थांचा मतदारवर्ग व्यापक करून या संस्थांना शिक्षण-विषयक बरेच अधिकार दिले; आणि सरकारी नोकऱ्यांत ब्राह्मणेतरांना कमींत कमी लायकीवर प्रथम प्रवेश देण्यांत यावा या तत्त्वास मंजुरी दिली.

ह्या ब्राह्मणेतर चळवळींत सुशिक्षित मराठा वर्ग अग्रेसर होता. मराठ्यांना पूर्वींपासून आर्थिक व राजकीय सत्तेची परंपरा होती. म्हणून आधुनिक शिक्षणानें त्यांच्या आकांक्षा लवकर जागृत झाल्या. आर्थिक व राजकीय क्षेत्रांत प्रथमच प्रवेश करणाऱ्या या नव्या मध्यमवर्गाला प्रत्येक ठिकाणीं आधींच शिरकाव झालेल्या ब्राह्मण सुशिक्षितांची स्पर्धा सहन करावी लागत होती. तिला तोंड देण्यासाठीं त्यांनीं मराठा संस्थानिकांच्या दातृत्वाचा आधार घेतला. पण सरंजामदारांच्या प्राबल्यामुळें ब्राह्मणेतर चळवळींतील फुलेप्रणीत सुधारणावादाची प्रेरणा नामशेष होऊन तिला केवळ ब्राह्मण-विरोधाचें विपरीत वळण लागलें. भटशाहीवर आघात करतांना क्षात्र-जगद्गुरूची स्थापना करून आणि ब्राह्मण उपाध्यायांऐवजीं इतर जातींचे उपाध्याय तयार करून ईश्वर आणि भक्त, धर्मविधि आणि यजमान यांच्यां-

तील मध्यस्थाची लुडबूड ब्राह्मणेतरांनीं कायम ठेवली. आर्थिक क्षेत्रांत मोठमोठ्या इनामदारांच्या हक्कांवर घाव घालण्याऐवजीं जोशी-कुळकर्ण्या-सारखीं क्षुल्लक वतनें खालसा करण्यांतच त्यांनीं धन्यता मानली. स्वातंत्र्य चळवळीमध्यें ब्राह्मणांचा पुढाकार आहे या सबबीवर तिच्यापासून अलिप्त राहून त्यांनीं इंग्रज सरकारच्या साम्राज्यवादी धोरणाला अप्रत्यक्षपणें उचलून धरलें. बहुजन समाजापुढील आर्थिक व सामाजिक समस्या डावलून ब्राह्मण-शाहीच्या प्रतिकारावरच सर्व लक्ष केंद्रित केल्यामुळें या चळवळींत अनेक आपमतलबी लोकांचा प्रवेश झाला; आणि त्यांच्यापैकीं कित्येकांनीं वैयक्तिक स्वार्थासाठीं बहुजनसमाजांतील जातिभावनेचा उपयोग करून घेतला. अशा संधिसाधु व केवळ निषेधपर धोरणामुळें ब्राह्मणेतर पुढाऱ्यांत सत्तेसाठीं भांडणें सुरू झालीं; आणि अल्पावकाशांतच सत्यशोधक चळवळीचा जोम ओसरला.

## ब्राह्मणेतरांचा काँग्रेसप्रवेश

ब्राह्मणेतरांच्या आकांक्षा न्याय्य होत्या. ब्राह्मण मध्यमवर्गीयांनींहि सुरवातीच्या काळांत सरकारच्या आश्रयानें पावलें टाकलीं होती. पण राजकीय चळवळ आतां व्यापक व लोकाभिमुख होत होती. ब्राह्मणेतरांनीं तिच्यापासून दूर राहाणें आत्मघातकीपणाचें होतें. द्विदल राज्यपद्धतींतील ब्राह्मणेतर मंत्र्यांचा कारभार पाहून ध्येयवादी ब्राह्मणेतर तरुणांना आपली चूक कळून आली. राष्ट्रसभेला शह देण्यासाठीं मागासलेल्या जातींच्या संरक्षणाचा सरकार कितीहि आव आणीत असलें, तरी इंग्रजांच्या हितसंबंधाला बाध येईल असे कोणतेंहि हक्क वा सवलती येथील जनतेला तें स्वखुषीनें देणार नाहीं. तेव्हां आर्थिक व सांस्कृतिक दास्यांतून बहुसंख्य जनतेची सुटका करण्याची पूर्वतयारी म्हणून राजकीय स्वातंत्र्याची गरज आहे हें त्यांनीं ओळखलें. गांधीजींच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रसभेचें स्वरूपहि पालटलें होतें. दलितोद्धार, ग्रामसंघटन इत्यादि कार्य-क्रमामुळें बहुजनसमाजाला तिच्याबद्दल जिव्हाळा वाटत होता. १९३० सालीं राष्ट्रसभेनें कायदेभंगाची चळवळ सुरू केली. तेव्हां केशवराव जेधे यांच्या नेतृत्वाखालीं ब्राह्मणेतर समाज राष्ट्रीय चळवळींत उत्साहानें सामील झाला याच सुमारास प्रतिसहकारवादी आणि असहकारवादी यांच्यांतील मतभेद तीव्रतर होऊन उच्चवर्णीय मध्यमवर्ग राष्ट्रसभेंतून फुटून बाहेर पडला. याप्रमाणें

१९३० नंतरहि ब्राह्मण व ब्राह्मणेतर दोन निरनिराळ्या राजकीय पक्षांत सामील झाल्यानें त्यांच्यामधील तेढ कायमच राहिली. स्वातंत्र्यचळवळीचा प्रचार करतांना राष्ट्रसभेच्या कार्यकर्त्यांनींहि धर्मभावनेचा आधार घेतल्यानें जातिनिष्ठेवर कधींच आघात झाला नाहीं. उलट दैनंदिन कार्यक्रम अंमलांत आणतांना जुन्या प्रवृत्ति व संस्था राबवून घेणें त्यांना अधिक सोयीचें वाटलें. राष्ट्रसभेच्या नेत्यांनीं वास्तववाद व राजकीय संधिसाधुपणा यांचें तारतम्य न राखल्यानें निवडणुकांसाठीं उमेदवार उभे करतांना मतदारांची जातिनिष्ठा जमेस धरणें त्यांना भाग पडलें. त्यामुळें राष्ट्रसभेचा जरी विजय झाला, तरी आमच्या राष्ट्रीय जीवनांतून जातीयतेचें उच्चाटन झालें नाहीं.

ब्राह्मणेतर संख्येनें ब्राह्मणांपेक्षां अधिक होते. कायदेभंगाच्या चळवळीमुळें राष्ट्रसभेच्या सामर्थ्याचा व आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठेचा त्यांना प्रत्यय आला होता. यापुढें या संस्थेच्या द्वारेंच देशाचें भवितव्य ठरणार याबद्दल त्यांना संशय उरला नाहीं. ब्राह्मणेतरांपाशीं संख्याबलाचें हुकमी साधन असल्यामुळें प्रातिनिधिक शासनसंस्थांच्या या युगांत मुसलमानांप्रमाणें स्वतंत्र संघटना उभारण्याची त्यांना गरज वाटली नाहीं. म्हणून राष्ट्रसभेंतील अधिकारपदें काबीज करण्याच्या मार्गास ते लागले. राष्ट्रसभेंतील अंतर्गत राजकारणांत सत्तासंपादनासाठीं त्यांची सतत रस्सीखेंच चालूच राहिली. ब्राह्मणेतरांमधील बहुसंख्य लोक श्रमजीवी असल्यामुळें देशांत हळुहळू प्रसृत होणाऱ्या समाजवादी तत्त्वज्ञानाबद्दल त्यांना आकर्षण वाटलें; आणि त्यांच्या जातिवादांतहि मधूनमधून वर्गवाद डोकावूं लागला. याच वेळीं राष्ट्रसभेच्या बाहेर असलेला ब्राह्मण मध्यमवर्ग लोकशाहीच्या भयानें हुकूमशाहीकडे वळला; आणि काँग्रेसला उघड विरोध करण्याचें धोरण त्यानें स्वीकारलें. त्यामुळें साहजिकच काँग्रेसमध्यें प्रबळ होत चाललेल्या ब्राह्मणेतर वर्गाचा रोष त्यानें ओढवून घेतला.

## अस्पृश्योद्धाराची चळवळ

अस्पृश्यता हा जातिभेद किंवा वर्गकलह यांच्याप्रमाणें नुसता एक सामाजिक प्रश्न नव्हता. आपल्या समाजाला जडलेला तो एक महा भयंकर रोग होता. मनुष्यत्वाची ती अत्यंत क्रूर व अक्षम्य अशी विटंबना होती. म्हणूनच मध्ययुगीन वारकरी संतांच्या वाङ्मयांतहि अस्पृश्यांच्या हीनदीन स्थितीबद्दलची

अनुकंपा आपणांस आढळून येते. अध्यात्माच्या क्षेत्रांत राजा आणि रंक, ब्राह्मण आणि शूद्र असा भेदाभेद नाहीं असें संतांचें सांगणें होतें. 'अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड', 'वैष्णव चांभार धन्य त्याची माता' ह्यासारख्या तुकारामाच्या उद्गारांत भक्तिहीन ब्राह्मणापेक्षां शीलसंपन्न अस्पृश्य निःसंशय श्रेष्ठ आहे अशी आध्यात्मिक समानतेची भूमिकाच अभिप्रेत आहे. परंतु समाजरचना शाश्वत आणि ईश्वरनिर्मित आहे ही कल्पना त्यावेळीं दृढमूल असल्यामुळें अस्पृश्यतेच्या या अन्याय्य व अमानुष रूढीचें समाजजीवनांतून प्रयत्नपूर्वक उच्चाटन केलें पाहिजे असें एकनाथ-तुकारामासारख्या दयाशील संतांनाहि वाटलें नाहीं.

इंग्रजी राजवटींत पाश्चात्य शिक्षणानें लोकांचे संस्कार जेव्हां बदलले, तेव्हां सर्व माणसें तत्त्वतः सारख्या दर्जाचीं आहेत; सामाजिक नीतिनियम हे माणसांनीं बनविलेले आहेत, तेव्हां ते बदलण्याचा त्यांना हक्क आहे इत्यादि विचार येथें नव्यानें प्रसृत होऊं लागले. परंतु एकोणिसाव्या शतकांत समाजाचें धुरीणत्व पांढरपेशा वर्गाकडे होतें; व त्याच्या आकांक्षांशीं व हितसंबंधांशीं अस्पृश्यांच्या प्रश्नाचा प्रत्यक्ष संबंध नव्हता. म्हणून अस्पृश्यतानिवारणाची आवश्यकता त्यांच्यापैकीं अनेकांनीं जरी तत्त्वतः मान्य केली, तरी अस्पृश्योद्धाराच्या प्रश्नाचा त्यांच्या सुधारणावादाच्या चळवळींत अंतर्भाव होऊं शकला नाहीं.

अव्वल इंग्रजींत अस्पृश्यांच्या अडीअडचणींची दखल प्रथम ख्रिस्ती धर्मोपदेशकांनीं घेतली. धर्मप्रसाराच्या हेतूनें का होईना पण दलितांच्या दुःखावर व दुःस्थितीवर तात्कालिक इलाज करून त्यांच्या जीवनाची दुःसहता कमी करण्यासाठीं त्यांनीं परिश्रम घेतले. ह्या कार्याबद्दलची ख्रिस्ती धर्मोपदेशकांची तळमळ व चिकाटी पाहून महाराष्ट्रांतील कांहीं समाजसुधारकांची दयाबुद्धि जागृत झाली. लोकहितवादींनीं आपल्या शतपत्रांतून अस्पृश्यांनाहि इतर जातींच्या बरोबरीचे माणुसकीचे व नागरिकत्वाचे हक्क मिळावेत असें प्रतिपादन केलें आहे. अस्पृश्यांचा शैक्षणिक व सांस्कृतिक दर्जा सुधारणें हाच त्यांना इतर वर्गाच्या बरोबरीला आणण्याचा उपाय होय अशा विचारानें जोतिराव फुले यांनीं महार, मांग इत्यादि लोकांसाठीं पुण्यास

पहिली शाळा काढली. गोवंडे व वाळवेकर यांचें त्यांना या कार्यांत सहकार्य मिळालें. अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याचा प्रारंभ म्हणून फुल्यांनीं आपल्या घरासमोरील हौद अस्पृश्यांना मोकळा केला; आणि त्यांच्याबरोबर सहभोजन करण्यास आपण तयार आहोंत असें वर्तमानपत्रांतून जाहीर केलें. मात्र सत्यशोधक समाजांतील त्यांच्या सहकाऱ्यांना हे इतके आत्यंतिक विचार झेपले नाहींत. ज्योतिबांच्या मृत्यूनंतर कांहीं वर्षांनीं कोल्हापूरचे शाहुछत्रपति यांनीं त्यांचें कार्य पुन्हां हातीं घेतलें. अस्पृश्यांच्या शिक्षणासाठीं त्यांनीं पैसा खर्च केला. संस्थानच्या नोकरींत त्यांचा सामावेश करून घेतला; आणि कोल्हापूर शहरामध्यें उपाहारगृह चालविण्यासहि कांहीं अस्पृश्यांना प्रोत्साहन दिलें.

रानडे, भांडारकर यांच्यासारख्या उदारमतवादी सुधारकांनाहि अस्पृश्यतानिवारणाची तळमळ होतीच. आपल्या देशांतील कोट्यवधि बहिष्कृतांना जोंपर्यंत आपण सामाजिक गुलामगिरींतून मुक्त करीत नाहीं, तोंपर्यंत साम्राज्यवादाबद्दल इंग्रजांना दोष देण्याचा आपणांस नैतिक अधिकार नाहीं असें रानड्यांचें मत होतें. हिंदु समाजांतील जन्मसिद्ध उच्चनीचता नाहींशी करून लोकांत बंधुभावाचा प्रसार करण्याच्या उद्देशानेंच त्यांनीं प्रार्थनासमाजांत प्रवेश केला. या समाजाचे एक प्रचारक विठ्ठल रामजी शिंदे यांनीं तर त्या दिशेनें प्रत्यक्ष कार्याला नेटानें सुरुवात केली. इ. स. १९०६ सालीं त्यांनीं 'डिप्रेस्ड क्लासेस मिशन' ह्या संस्थेची स्थापना केली; आणि अस्पृश्यांसाठीं शाळा व वसतिगृहें काढून त्यांच्यामध्यें जागृति घडवून आणली. सर नारायणराव चंदावरकर व शेट दामोदरदास गोवर्धनदास या दोघांनीं त्यांना या कार्यांत साहाय्य केलें. मात्र ह्या सर्व संस्थांचें कार्य अगदीं प्राथमिक स्वरूपाचें होतें. कांहीं महत्त्वाकांक्षी अस्पृश्य विद्यार्थ्यांना शिक्षण घेण्यास मदत करण्यापलीकडे त्या कार्याची मजल गेली नाहीं.

महायुद्धानंतर हिंदुस्थानांत असंतोषाच्या लाटा उसळत होत्या. अशा वेळीं लोकांना शांत करण्यासाठीं 'हिंदुस्थानांत जबाबदार राज्यपद्धतीची हळुहळू स्थापना करणें हें आपलें उद्दिष्ट आहे. त्यासाठीं प्रातिनिधिक संस्थांच्या विकासाला मदत करण्याचें आपलें धोरण राहील' असें इंग्रजसरकारनें जाहीर केलें. त्यानंतर हिंदुस्थानांतील प्रजेचें मनोगत जाणून घेण्या-

करितां भारतमंत्री मॉंटेग्यु हिंदुस्थानांत आले. तेव्हां इतर जातींच्या पुढाऱ्यांप्रमाणें अस्पृश्य जमातीच्या प्रतिनिधींनींहि त्यांची भेट घेतली; आणि जबाबदार राज्यपद्धतींत स्पृश्य हिंदूंच्या हातांत सर्व सत्ता जाण्याचा धोका असल्यामुळें त्यांच्यापासून आपलें संरक्षण व्हावें अशी सरकारकडे मागणी केली. अस्पृश्यांच्या प्रश्नाबद्दल उदासीन असणाऱ्या राष्ट्रसभेलाहि आतां त्यांच्या पाठिंब्याची आवश्यकता वाटूं लागली. चंदावरकर प्रभृति पुढाऱ्यांच्या खटपटीनें कॉंग्रेस–लीग कराराचा विचार करण्यासाठीं मुंबईस १९१७ सालीं एक अस्पृश्य परिषद भरली. या परिषदेमध्यें दलित वर्गांना लोकसंख्येच्या प्रमाणांत कायदेमंडळांत आपले प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क असावा अशी मागणी करण्यांत आली. त्याबरोबरच कॉंग्रेस-लीग यामधील कराराला पाठिंबा देणारा, आणि धर्म व रूढि यामुळें अस्पृश्यांवर होणारा अन्याय नाहींसा करण्यासाठीं स्पृश्य हिंदूंना राष्ट्रसभेनें प्रवृत्त करावें असें तिला आवाहन करणारा, असे आणखी दोन ठराव मंजूर झाले. अस्पृश्यांच्या या इच्छेला मान देऊन राष्ट्रसभेनें आपल्या कलकत्ता येथील अधिवेशनांत अस्पृश्यता-निवारणाविषयीं एक ठरावहि पास केला. याच सुमारास मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांच्या अनुरोधानें मतदानाच्या हक्काचा विचार करण्यासाठीं जी साऊथबरो कमिटी नेमण्यांत आली होती, तिनें निरनिराळे वर्ग आणि संस्था यांच्या प्रतिनिधींच्या साक्षी घेतल्या. अस्पृश्यांच्या वतीनें कर्मवीर शिंदे व डॉ. आंबेडकर यांनीं तिच्यापुढें आपलीं निवेदनें सादर केलीं. त्याचप्रमाणें १९१८ सालीं सयाजीराव गायकवाड यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबई येथें एक व १९२० सालीं शाहु छत्रपति यांच्या अध्यक्षतेखालीं नागपूर येथें एक अशा दोन अखिल भारतीय अस्पृश्य परिषदा भरल्या. या सर्व परिषदा व अस्पृश्यांच्या राजकीय हक्कासंबंधीं चाललेली चर्चा यांचा दलित वर्गांतील राजकीय जागृतीला बराच उपयोग झाला.

राष्ट्रसभेची चळवळहि १९२० नंतर अधिक लढाऊ व लोकाभिमुख होऊं लागली होती. अस्पृश्यता हें एक पाप आहे, माणसामाणसांतील उच्चनीचभेद हे हिंदुधर्माच्या मूलतत्त्वांशीं विसंगत आहेत असें जाहीर करून गांधीजींनीं अस्पृश्यतानिवारणाला आपल्या विधायक कार्यक्रमांत महत्त्वाचें

स्थान दिलें होतें. जोंपर्यंत बहुसंख्य हिंदु आपल्या कांहीं बांधवांना स्पर्श करणें अपवित्र मानतात, कुत्र्यामांजरांपेक्षांहि त्यांना तुच्छ लेखतात तोंपर्यंत आपल्या देशाला खरेंखुरें स्वराज्य मिळणें मुळींच शक्य नाहीं असें त्यांना वाटत होतें. * मात्र सामाजिक गुलामगिरींतून अस्पृश्यांची मुक्तता होण्यासाठीं देखील राष्ट्राभोंवतींचे पारतंत्र्याचे पाश आधीं तोडले गेले पाहिजेत, राजकीय सत्ता लोकांच्या हातांत आली पाहिजे हें त्यांना समजून आलें. म्हणून समाजसुधारणेची तळमळ असूनहि राजकारणालाच त्यांनीं प्राधान्य दिलें. त्यांच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रसभेनें निःशस्त्र प्रतिकाराचा व सर्वांगीण सुधारणेचा जो कार्यक्रम आंखला त्यामुळें अस्पृश्यांच्या मनांत आपल्या भवितव्याबद्दल नव्या आशा निर्माण झाल्या. आत्मोद्धाराची उत्कंठा त्यांच्यांत उत्पन्न झाली. आंबेडकर, शिवतरकर प्रभृति अस्पृश्य पुढाऱ्यांनीं खेर, नरीमन, चिमणलाल सेटलवाड इत्यादि राष्ट्रवादी कार्यकर्त्यांच्या मदतीनें १९२४ सालीं 'बहिष्कृत-हितकारिणी सभे'ची स्थापना केली. वसतिगृहें, मासिकें, शिष्यवृत्त्या यांच्या द्वारां या संस्थेनें अस्पृश्यांच्या शैक्षणिक विकासाला हातभार लावला. आंबेडकरांच्या धुरीणत्वाखालीं निपाणी, महाड, सोलापूर, मालवण इत्यादि ठिकाणीं अस्पृश्य परिषदा भरल्या; आणि त्यांच्या योगानें दलितांना स्वतःच्या हक्कांसाठीं संघटितपणें झगडण्याची प्रेरणा मिळाली.

१९१९ नंतर मुंबई विधिमंडळामध्यें सरकारनियुक्त सभासद म्हणून कांहीं अस्पृश्य प्रतिनिधींची निवड झाली होती. मागासलेल्या वर्गांत शिक्षणाचा प्रसार व्हावा म्हणून या प्रतिनिधींनीं सरकारकडे सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची मागणी केली. इतर जातींतील सुधारकांची त्यांना सहानुभूति मिळाली; आणि सरकारी शाळा, न्यायालयें, कचेऱ्या, दवाखाने व सार्वजनिक फंडांतून बांधलेल्या किंवा स्थानिक स्वराज्य संस्थांच्या ताब्यांत

---

* So long as the Hindus wilfully regard untouchability as part of their religion, so long as the mass of Hindus consider it a sin to touch a section of their brethren, swaraj is impossible of attainment—Gandhi from *Mahatma* Vol. II, p. 49.

असलेल्या विहिरी, धर्मशाळा आणि पाणवठे या सर्व ठिकाणीं अस्पृश्यांना प्रवेश मिळावा असा ठराव मुंबई विधिमंडळानें मंजूर केला. मात्र खेड्या-खेड्यांतून सवर्ण हिंदूंनीं केलेल्या विरोधामुळें या ठरावाची बराच काळपर्यंत सर्वत्र अंमलबजावणी झाली नाहीं.

वरिष्ठवर्णीयांच्या सद्बुद्धीवर आधारलेले सुधारणेचे प्रयत्न सफल होण्याची आशा नष्ट झाल्यावर राष्ट्रसभेच्या युद्धतंत्राचा वापर करून स्वावलंबनाच्या जोरावर स्वतःच्या हक्कांसाठीं झगडण्याचा अस्पृश्यांनीं निश्चय केला. महाड येथील अस्पृश्य परिषदेनंतर आंबेडकर व त्यांचे अनुयायी यांनीं सामुदायिक रीत्या तेथील तलावाचें पाणी प्राशन केलें; व सार्वजनिक पाणवठ्या-वरील अस्पृश्यांचा हक्क प्रस्थापित केला. हिंदूंच्या मंदिरांतील भेदाभेद नाहींसा होऊन तेथें अस्पृश्यांना प्रवेश मिळावा यासाठीं पुण्यास पर्वतीपुढें व नाशिकमध्यें रामाच्या मंदिरासमोर अस्पृश्यांनीं सत्याग्रह केले. स्पृश्य जमातींतील अनेक सुधारक या सत्याग्रहांत सामील झाले. या परिषदा व हे झगडे यांच्यांतून अस्पृश्यांचा आत्मविश्वास द्विगुणित झाला; आणि राजकीय हक्कांसाठीं झगडण्याची उमेद त्यांच्यांत निर्माण झाली.

१९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीनंतर राजकीय क्षेत्रांत बरीच खळबळ माजली होती. सरकारी पाठिंब्याच्या जोरावर आपल्या जमातीला अधिकाधिक सवलती मिळविण्याची मुस्लीम पुढाऱ्यांची धडपड चालली होती. इंग्रजांना शह देण्यासाठीं लीगशीं तडजोड करणें राष्ट्रसभेच्या पुढाऱ्यांना भाग पडत होतें. अशा वेळीं हिंदु समाजांत दुही माजविण्याच्या हेतूनें सरकारनें गोलमेज परिषदेसाठीं अस्पृश्यांचे वेगळे प्रतिनिधि निवडले, आणि लीगचें अनुकरण करून त्यांनींहि अस्पृश्यांसाठीं स्वतंत्र मतदारसंघाची मागणी केली. गांधीजींचा मुत्सद्दीपणा व करारीपणा यामुळें अस्पृश्यांना हिंदु समाजापासून अलग करण्याचा इंग्रजांचा हा बेत सफल झाला नाहीं. अस्पृश्यसमाज हा हिंदु समाजाचा एक अविभाज्य घटक आहे. त्याला सवर्ण हिंदूंपासून वेगळा काढून या समाजाचीं दोन शकलें पाडण्यास आपण कधींच संमति देणार नाहीं. उलट एकट्यानें विरोध करण्याची जरी आपल्यावर पाळी आली तरी आपले प्राण पणाला लावून आपण विभक्त मतदार संघाच्या तत्त्वाविरुद्ध

झगडूं असें गांधीजींनीं गोलमेजपरिषदेंत जाहीर केलें होतें. त्याप्रमाणें 'जातीय निवाडा' प्रसिद्ध झाल्यावर त्यांनीं प्राणांतिक उपोषण सुरू केलें. तेव्हां गांधीजींचे प्राण वांचविण्यासाठीं लोकमताच्या दडपणाखालीं संयुक्तमतदारसंघ व राखीव जागा या मुद्यांवर राष्ट्रसभेशीं तडजोड करणें आंबेडकरादि अस्पृश्य पुढाऱ्यांना भाग पडलें; आणि हिंदु समाजावरील ही आपत्ति टळली.

पुणें कराराचे वेळीं यापुढें अस्पृश्योद्धाराच्या कार्याला सर्वस्वीं वाहून घेण्याचें गांधीजींनीं आश्वासन दिलें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं लगेच 'हरिजन सेवक संघाची' स्थापना केली; व अस्पृश्यतानिवारणासाठीं हिंदुस्थानभर दौरा काढला. आंबेडकरहि प्रथम हरिजन सेवक संघाच्या कार्यकारिणींत होते. परंतु गांधी व आंबेडकर यांच्या दृष्टिकोनांतील मूलभूत फरकांमुळें त्यांना फार काळ एकत्र काम करतां आलें नाहीं. गांधीजींनीं अस्पृश्यता हा एक केवळ धार्मिक प्रश्न आहे असें मानलें होतें. भक्तिपंथांतील समानता, बंधुभाव, सहिष्णुता इत्यादि तत्त्वें त्यांनीं आत्मसात् केलीं होतीं; आणि सामाजिक व्यवहाराला तीं लागू करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. शास्त्रप्रामाण्यापेक्षां अंतःप्रेरणेवर त्यांचा अधिक भर होता. तिच्याशीं विसंगत असणाऱ्या आचारविचारांचें निर्मूलन करून आपण हिंदु धर्माच्या शुद्धिकरणाचीच खटपट करीत आहोंत असें त्यांचें म्हणणें होतें. आपल्या आश्रमांत त्यांनीं अस्पृश्य कुटुंबांना बरोबरीच्या नात्यानें वागविलें आणि मिश्रविवाहालाहि पाठिंबा दिला. त्याबरोबर आर्थिक क्षेत्रांत स्वयंपूर्ण ग्रामसंस्थेचें पुनरुज्जीवन करण्याची त्यांची इच्छा होती. वर्णव्यवस्थेच्या तत्त्वाप्रमाणें उद्योगधंदे जातीजातींमधून वंशपरंपरेनें चालू राहिल्यास आपल्या आर्थिक जीवनांत स्पर्धेऐवजीं सहकार्याची भावना निर्माण होईल असा त्यांना विश्वास वाटत होता. म्हणून उच्चनीचभावाच्या कल्पनेवर जरी त्यांनीं प्रहार केले, तरी वर्णाश्रमधर्म कायम ठेवण्याची उत्सुकता त्यांनीं वारंवार प्रगट केली आहे.‡ आर्थिक बाबतींतील या अवास्तव व स्वप्नाळू

---

‡ I do not believe the caste system, even as distinguished from Varnashram, to be an 'odious and vicious dogma'....Such being my faith, I have always differed from those distinguished countrymen, Dr. Ambedkar

विचारसरणीमुळें गांधीजींना मूलगामी सामाजिक क्रांतीची भूमिका कधींच घेतां आली नाहीं. शिवाय हिंदुस्थानची विशिष्ट परिस्थिति लक्षांत घेऊन त्यांनीं आपल्या जीवितकार्यांत राजकीय चळवळीला अग्रस्थान दिलें होतें. राजकीय हक्कांसाठीं इंग्रजांशीं झगडतांना आपआपला संकुचित स्वार्थ कांहीं काळ बाजूस ठेवून सर्व जातींनीं एकत्र येण्याची निकड होती. प्रत्येक जमातीच्या प्रश्नाला फुटीरपणें तीव्रता येत गेल्यास समाजांत यादवी माजण्याचा संभव होता. तेव्हां अस्पृश्यतेसारखे अंतर्गत सामाजिक प्रश्न उच्चवर्णीयांची विवेकबुद्धि जागृत करूनच सोडविणें गांधीजींना अधिक श्रेयस्कर वाटलें. म्हणून अस्पृश्यां-मधील राजकीय जागृतीचें महत्त्व जरी त्यांना कळलें होतें, तरी धार्मिक पातळी-वरूनच तो प्रश्न सोडविण्याची त्यांनीं पराकाष्ठा केली.§ मंदिरप्रवेशासारख्या प्रश्नाच्या बाबतींतहि सत्याग्रहापेक्षां हृदयपरिवर्तनावरच ते विसंबून राहिले. म्हणून हरिजन सेवक संघाचें कार्य नेहमीच मर्यादित क्षेत्रांत व मंदगतीनें चालू राहिलें. शाळा, वसतिगृहें व वाचनालयें यांच्यासारख्या शैक्षणिक संस्था आणि सार्वजनिक हळदीकुंकू वगैरे समारंभ एवढ्यावरच त्याच्या कार्यकर्त्यांनीं शेवटीं समाधान मानलें.

अस्पृश्यतेच्या प्रश्नाचें स्वरूप केवळ धार्मिक नसून एकंदर हिंदु समाजव्यवस्थेशीं तें निगडित आहे असें आंबेडकरांचें मत होतें. म्हणून नुसत्या अस्पृश्यतानिवारणावर ते संतुष्ट राहिले नाहींत. सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रांत अस्पृश्यांना इतर जातींच्या बरोबरीनें हक्क मिळावेत अशी त्यांची इच्छा

---

among them, who have held that the untouchability will not go without destruction of Varnashram Dharma. ibid Vol. III, p. 237.

§ I would, therefore, respectfully urge those who do not appreciate the purely religious character of the movement to retire from it....the removal of untouchability may produce, indeed it will produce great political consequences, but it is not a political movement. It is a movement purely and simply of purification of Hinduism– ibid Vol. III, p. 225.

होती. म्हणून अस्पृश्यांच्या सर्वांगीण प्रगतीच्या आड येणाऱ्या हिंदु धर्मकल्पनांवर त्यांनीं निकराचा हल्ला चढविला. शास्त्रप्रामाण्य व जातिनिष्ठा यांवर आधारलेली जुनी समाजव्यवस्था नष्ट होऊन स्वातंत्र्य, समता व बंधुभाव यांचा अंगीकार करणारी नवी समाजरचना जेव्हां अस्तित्वांत येईल तेव्हांच खऱ्या अर्थानें अस्पृश्यता नाहींशीं होईल असा आंबेडकरांच्या म्हणण्याचा आशय होता. सामाजिक व्यवहाराला धर्माचें अधिष्ठान असावें हें त्यांना मान्य होतें. पण अन्यायमूलक चालीरीतींना आधार देणाऱ्या हिंदु धर्मशास्त्रांस प्रमाण मानण्यास ते मुळींच तयार नव्हते. या शास्त्रग्रंथांतील सामाजिक गुलामगिरीचा निषेध व्यक्त करण्यासाठींच त्यांनीं महाड परिषदेंत जाहीरपणें ‘मनुस्मृति’ जाळली. सामाजिक व्यवहारांत त्यांची दृष्टि पूर्णपणें भौतिकवादी होती. म्हणून मंदिरप्रवेशासारख्या कार्यक्रमाला त्यांनीं विशेष महत्त्व दिलें नाहीं. अन्न, वस्त्र, शिक्षण, वैद्यकीय मदत इत्यादि गोष्टी हक्कानें मिळविण्यासाठीं झटण्याचा त्यांनीं आपल्या अनुयायांना उपदेश केला. * हे मूलगामी आर्थिक व सामाजिक प्रश्न वरिष्ठ वर्गाच्या समजूतदारपणानें सुटतील अशी त्यांना मुळींच आशा नव्हती. म्हणून त्यांनीं अस्पृश्यांना स्वावलंबनाचा व सत्तासंपादनाचा आदेश दिला. सामाजिक हक्क स्थापित करण्यासाठीं अस्पृश्यांनीं प्रथम सामुदायिक सत्याग्रहाचें हत्यार उपसलें. इंग्रज सरकारकडून राजकीय हक्क मिळण्याची जेव्हां आशा वाटूं लागली, तेव्हां अस्पृश्यांचे प्रतिनिधि अस्पृश्यांनींच निवडावे असा त्यांनीं आग्रह धरला; आणि कधीं

* The object of the temple entry movement is good. But you should care more for your material good than for spiritual food. You do not get food to eat, clothes to wear, opportunities for educating your children, and medical help for want of money. You should, therefore, be watchful of the political gains, and you must develop your strength and struggle for gaining material advancement in life." Ambedkar—from Dhananjay Keer: *Dr. Ambedkar, Life and Mission* p. 210.

ब्रिटिश सरकारची सहानुभूति संपादन करून तर कधीं हिंदुस्थानांतील निरनिराळ्या पक्षांना चुचकारून तो तडीस नेण्याचा प्रयत्न केला.

आंबेडकरांचे विचार याप्रमाणें जरी क्रांतिकारक असले, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत सतत व सुसंगतपणें त्यांना क्रांतिकारक भूमिका कधींच घेतां आली नाहीं. म्हणूनच अनेकदां त्यांनीं सांघिक धर्मांतराच्या पोकळ आणि हास्यास्पद घोषणा केल्या. सामाजिक क्रांतीची तळमळ असूनहि राजकीय क्षेत्रांत त्यांनीं इंग्रजांवर पूर्ण भरंवसा टाकला. सर्व वर्गांना व जातींना एकत्र आणून राष्ट्रसभेनें स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं चालविलेल्या चळवळींत त्यांनीं भाग घेतला नाहीं. उलट जात्यंध मुसलमान पुढाऱ्यांप्रमाणेंच राष्ट्रसभेला विरोध करून ब्रिटिशांच्या मदतीनें तात्कालिक सवलती मिळविण्याचा त्यांनीं मार्ग स्वीकारला. त्यामुळें इतर जातींना अस्पृश्यांच्या आक्रमक चळवळीविषयीं सहानुभूति वाटली नाहीं. 'पुणें करारानंतर' फक्त अस्पृश्यांच्या मतावर कायदेमंडळांत निवडून येणें शक्य नव्हतें. म्हणून अस्पृश्य पुढाऱ्यांना अधिक व्यापक भूमिका घ्यावी लागली. तेव्हां त्यांनीं कामगारचळवळीकडे आपला मोर्चा वळविला; व १९३६ सालीं 'स्वतंत्र मजूर पक्षा'ची स्थापना केली. परंतु तेथेंहि जातीय विचारसरणीमुळें त्यांना पूर्णपणें वर्गवादी धोरण आंखतां आलें नाहीं. १९३७ च्या निवडणुकांत स्वतंत्र मजूर पक्षाला फारसें यश मिळालें नाहीं. युद्धकाळामध्यें राष्ट्रीय पुढाऱ्यांशीं कांहीं प्रमाणांत तडजोड करण्याची सरकारची तयारी दिसूं लागली. अशा प्रकारें राजकीय चळवळीच्या दडपणाखालीं वाटाघाटींचा समय येऊन ठेपतांच अस्पृश्य पुढाऱ्यांनीं वर्गवादी भूमिका सोडून देऊन पुन्हां जातिवादाकडे धांव घेतली; व दहा वर्षांनंतर अखिल भारतीय अस्पृश्य परिषदेचें पुनरुज्जीवन करून १९४२ सालीं 'दलित फेडरेशन'ची स्थापना केली. अस्पृश्यांच्या चळवळीचा आशय वस्तुतः क्रांतिकारक असूनहि या संकुचित व संधिसाधु धोरणामुळें दलित फेडरेशनच्या कार्यामधून हिंदुस्थानांतील पुरोगामी शक्तींचें पोषण होऊं शकलें नाहीं. स्वातंत्र्य-लढ्यापासून अलिप्त राहिल्यामुळें व्यापक ध्येयवाद व खंबीर तत्त्वनिष्ठा यांची अस्पृश्यांच्या चळवळीला जोड मिळाली नाहीं. सर्वसामान्य लोकांना स्फूर्ति देणाऱ्या सुसंबद्ध सामाजिक तत्त्वज्ञानाच्या

अभावीं पक्षाची शिस्त व खंबीरपणा टिकविण्यासाठीं अनुयायांची अंधश्रद्धा व विभूतिपूजा यांच्यावरच अस्पृश्यांच्या पुढाऱ्यांना विसंबून राहावें लागलें. अस्पृश्य वर्गाचे नेते व अनुयायी यांच्यांतील बौद्धिक तफावत लक्षांत घेतां ही विभूतिपूजा स्वाभाविक आहे हें खरें; परंतु या आत्यंतिक विभूतिपूजेमुळें दलित वर्गांतील कार्यकर्त्यांच्या बौद्धिक विकासाला वाव मिळाला नाहीं. म्हणून मिळालेल्या राजकीय हक्कांचा उपयोग करून घेण्यास ते असमर्थ ठरले.

अस्पृश्य जमात हा हिंदु समाजाचाच एक भाग होता. सवर्ण हिंदूंच्या पूर्वपरंपरेशीं तो अनेक शतकांच्या सामाजिक व सांस्कृतिक सहजीवनानें जखडलेला होता. राष्ट्रसभेनेंहि अस्पृश्यांच्या बाबतींत स्वीकारलेलें धोरण मुसलमानांच्या बाबतींत तिनें घेतलेल्या भूमिकेपेक्षां अधिक उदारतेचें व समजूतदारपणाचें होतें. ब्राह्मणेतर पक्ष व हिंदुमहासभा यांच्या पुढाऱ्यांनींहि अस्पृश्यचळवळीबद्दल अनेकदां सक्रिय सहानुभूति दाखविली होती. शिवाय बहुसंख्य हरिजनांचें दारिद्र्य, अज्ञान व पूर्वसंस्कार यांमुळें मुस्लीम लीग इतकें सामर्थ्य दलित फेडरेशनला प्राप्त होणें कधींच शक्य नव्हतें. म्हणून इंग्रजांच्या भेदनीतीला अस्पृश्यांच्या बाबतींत यश आलें नाहीं. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर नव्या लोकसत्ताक राज्यघटनेप्रमाणें अस्पृश्यांना इतर वर्गांच्या बरोबरीचे हक्क मिळाले आहेत. म्हणून इतर श्रमजीवी वर्गाप्रमाणेच आर्थिक व सामाजिक क्षेत्रांतील अस्पृश्यांची पिळवणूक अजूनहि चालू असली, तरी राजकीय दृष्ट्या अस्पृश्यांचा वेगळा प्रश्न आतां शिल्लक उरलेला नाहीं.

## वर्गवादाचा उदय

समाजांतील खालच्या थरांना आपल्या सामाजिक व राजकीय हक्कांची व संघटित सामर्थ्याची जाणीव होऊं लागतांच ज्याप्रमाणें एकीकडे जातिवाद प्रबळ होत गेला, त्याप्रमाणें दुसरीकडे वर्गवादाचाहि प्रसार होऊं लागला. व्यक्तिवाद व बुद्धिवाद यांच्याप्रमाणें वर्गवादाचें हें नवें तत्त्वज्ञानहि यूरोपांतूनच हिंदुस्थानांत आलें. पाश्चात्यांच्या सामाजिक जीवनांत भांडवलदारीनें ज्या समस्या निर्माण केल्या त्यांतून वाट काढण्यासाठीं एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत वर्गवादी विचारसरणी तेथें जन्मास आली. पहिल्या महायुद्धापर्यंत भारतांत भांडवलशाहीचा पुरेसा विकास न झाल्यानें आपल्या

विचारसृष्टींत वर्गवादाचे पडसाद त्याकाळीं कुठेंच उठले नाहींत. महायुद्धानंतर मात्र हिंदुस्थानच्या समाजजीवनांत भांडवलदार व कामगार हे दोन वर्ग प्रामुख्यानें पुढें आले; आणि त्यांच्या आकांक्षांचा व हितसंबंधांचा हिंदुस्थानच्या राजकारणावर हळुहळू प्रभाव पडूं लागला. यापैकीं भांडवलदार वर्गाला मुख्यतः परकीयांच्या स्पर्धेला तोंड द्यावें लागत होतें. तेव्हां आपल्या औद्योगिक हितसंबंधांच्या सुरक्षिततेसाठीं त्यानें राष्ट्रवादाची बाजू घेतली, आणि वेळोवेळीं राष्ट्रसभेच्या कार्यास भरपूर द्रव्यसाहाय्य देऊन तिच्या प्रतिष्ठेचा व चळवळींचा स्वतःच्या फायद्यासाठीं उपयोग करून घेतला. गांधीप्रणीत विधायक कार्यक्रमाचें व लोकशिक्षणाचें लक्ष्यकेंद्र ग्रामोद्धार हेंच असल्यामुळें शहरांतील कामगारवर्गाच्या गरजांची व गाऱ्हाण्यांची राष्ट्रसभेनें आपल्या कार्यक्रमांत विशेष दखल घेतली नाहीं. म्हणून आपल्या दैनंदिन जीवनांतील आर्थिक प्रश्न सोडविण्यासाठीं कामगारांना निराळ्या संघटना बांधून स्वतंत्र मार्ग चोखाळावा लागला. कामगारवर्गातील सहजस्फूर्त वर्गभावनेला व प्रतिकारबुद्धीला सामाजिक पुनर्घटनेसाठीं आवश्यक असलेल्या नव्या मूल्यांची जोड देण्याचें काम हिंदी कम्युनिस्ट पक्षानें केलें; आणि स्वातंत्र्य व समता यांच्या स्थापनेसाठीं चाललेल्या आंतरराष्ट्रीय लढ्याशीं येथील कामगारचळवळीचा संबंध जोडला.

महायुद्धांतील अमानुष संहार आणि त्यानंतरचीं आर्थिक अरिष्टें यांमुळें युरोपमध्यें व्यक्तिवादाच्या लोकप्रियतेला ओहोटी लागली होती. अनिर्बंध व्यक्तिस्वातंत्र्य आणि अनियंत्रित स्पर्धा यांनीं समाजाचे प्रश्न सुटण्याऐवजीं अधिकाधिक बिकट व गुंतागुंतीचे होत जातात असा तेथें सर्वांना अनुभव आला होता. म्हणून सामाजिक हिताच्या दृष्टीनें व्यक्तिस्वातंत्र्यावर बंधनें घालणाऱ्या विचारप्रवाहांना युरोपांत बरीच मान्यता मिळाली. हिंदुस्थानांतील लोक मात्र अध्यात्मवादी संस्कारांतून अद्याप पूर्णपणें बाहेर पडले नव्हते. म्हणून आत्यंतिक व्यक्तिवादामुळें युरोपांत झालेले भयंकर दुष्परिणाम पाहून त्यांना आपला पूर्वपरंपरागत अध्यात्मवादच अधिक श्रेष्ठ व शाश्वत वाटला. त्यामुळें मनुष्याच्या अंतःप्रेरणेला व सहजप्रवृत्तींना संयमाची आणि सेवेची जोड देऊन व्यक्तिविकास आणि समाजहित

यांचा मेळ घालणाऱ्या गांधीवादी विचारसरणीस त्यांनीं उचलून धरलें. मात्र आधुनिक शास्त्रांच्या अध्ययनानें बुद्धिवादाचे संस्कार झालेल्या कांहीं तरुणांना गांधीवादांतील गूढता व कर्मठपणा हीं पसंत पडलीं नाहींत. युरोपमध्यें चाललेल्या साम्यवादाच्या नव्या प्रयोगाकडे त्यांनीं आपली दृष्टि वळविली. १९१७ मध्यें रशियांत पहिली कामगार क्रांति यशस्वी झाली होती. भांडवलशाहीचा नायनाट करून श्रमिकांच्या साहाय्यानें वर्गविहीन समाजरचना अस्तित्वांत आणण्याची ईर्षा बाळगणारा कम्युनिस्ट पक्ष तेथें अधिकारारूढ झाला होता. रशियांतील कम्युनिस्ट पक्षाच्या ह्या यशामधून अनेक राष्ट्रांतील दलित वर्गांना स्वतःच्या हक्कांसाठीं लढण्याची प्रेरणा मिळाली; आणि वर्गवादी तत्त्वज्ञानाचा झपाट्यानें प्रसार होऊं लागला. आंतरराष्ट्रीय कामगारक्रांति घडवून आणण्याच्या उद्देशानें लेनिनप्रभृति साम्यवादी पुढाऱ्यांनीं १९१९ सालीं कम्युनिस्ट इंटरनॅशनलची स्थापना केली. हिंदुस्थानच्या राजकीय जीवनांतहि या घडामोडींचे प्रतिध्वनि उमटल्याखेरीज राहिले नाहींत. कम्युनिस्ट इंटरनॅशनलपासून स्फूर्ति घेऊन वर्गवादाचा उघडपणें पुरस्कार करणाऱ्या कम्युनिस्टपक्षाची येथें १९२३ मध्यें स्थापना झाली.

### वर्गवादाचा आशय

अनियंत्रित राजसत्ता, बेजबाबदार पोपशाही आणि सर्वंकष रूढिवाद यांच्याविरुद्ध झगडून सामान्य लोकांना स्वातंत्र्य, समता व बंधुभाव यांचा लाभ करून देण्यासाठीं १७८९ सालीं फ्रान्समध्यें राजक्रान्ति झाली. पण त्यानंतर जी नवी अर्थव्यवस्था युरोपमध्यें अंमलांत आली, ती पाहिल्यावर बहुसंख्य लोकांचा भ्रमनिरास होण्यास बिलकुल वेळ लागला नाहीं. आर्थिक स्वातंत्र्याच्या अभावीं कायदा व राज्यघटना यांनीं दिलेले मूलभूत हक्क शेवटीं नाममात्रच ठरले. औद्योगिक क्रांतीनंतर उत्पादनाचीं साधनें कांहीं थोड्या धनिकांच्या हातांत केंद्रित होऊन बहुसंख्य लोकांना मजुरीसाठीं त्यांच्यावर अवलंबून राहाण्याची पाळी आली; आणि एका बाजूला अर्धपोटी राहाणारे लक्षावधि कामगार व दुसऱ्या बाजूला डामडौलांत राहाणारे मूठभर भांडवलदार हें नित्याचें दृश्य होऊन बसलें. एकमेकांच्या नरडीचा घोट घेण्यास उद्युक्त झालेलीं युद्धपिपासु राष्ट्रें युरोपच्या

रंगभूमीवर थैमान घालूं लागलीं. तेव्हां फ्रेंच राज्यक्रांतीमधील ध्येयें साकार करण्यासाठीं निर्घृण स्पर्धा, अनिर्बंध व्यक्तिस्वातंत्र्य व राष्ट्रीय सार्वभौमत्व यांवर जनहिताच्या दृष्टीनें सामाजिक नियंत्रण असावें असें प्रतिपादन करणारें समाजवादी तत्त्वज्ञान युरोपमध्यें उदयास आलें. सासीमाँ, ओवेन, फूरियर इत्यादि विचारवंतांनीं भांडवलशाहीचे दोष चव्हाट्यावर मांडून उत्पादन साधनांची सामुदायिक मालकी, सहकारी उत्पादन इत्यादि तत्त्वांचा पुरस्कार केला. ओवेनसारख्या कांहीं ध्येयवादी धनिकांनीं सहकारी तत्त्वांवर खेडीं उभारण्याचा प्रयत्न करून पाहिला; पण तो मुळांतच अपेशी ठरला. भांडवल-शाहीच्या विकासाबरोबर तिच्यांतील वर्गीय संबंध अधिकाधिक स्पष्ट होत होते. इंग्लंडसारख्या देशांत कामगार-संघटना अस्तित्वांत येत होत्या. अशा वेळीं ब्रिटिश अर्थशास्त्र व जर्मन तत्त्वज्ञान यांच्या आधारानें कार्ल मार्क्स व फ्रेडरिक एंगल्स यांनीं सामाजिक विकासक्रमाचे नियम शोधून काढले; आणि समाजवादाच्या भावनाप्रधान व स्वप्नाळू मनोवृत्तीला शास्त्रीय अधिष्ठान मिळवून दिलें. वर्गकलह व वर्गीय हितसंबंध ही समाजविकासाच्या मागील प्रेरक शक्ति आहे. उत्पादनसाधनांच्या विकासाच्या प्रत्येक अवस्थेंत निरनिराळे वर्ग समाजांत जन्मास येतात. ह्या वर्गांचे हितसंबंध परस्परविरोधी असल्यामुळें त्यांच्यामध्यें नेहमीं कलह चालू असतो. ज्या वर्गांचीं धोरणें व आकांक्षा समाजाच्या प्रगतीला पोषक असतात तेच वर्ग ह्या झगड्यांत अखेर विजयी होतात. भांडवलशाही समाजालाहि हाच नियम लागू आहे. मध्ययुगाच्या अखेरीस शहरांत राहून व्यापार करणारा एक महत्त्वाकांक्षी मध्यमवर्ग जुन्या समाजव्यवस्थेंतून जन्मास आला. सरंजाम-दारांशीं झगडून स्वतःच्या फायद्यासाठीं त्यानें उत्पादनशक्तींची वाढ केली; आणि भांडवलशाहीची स्थापना केली. मात्र स्पर्धा व करार यांवर आधारलेल्या या नव्या अर्थव्यवस्थेंतहि श्रमजीवी वर्गाची पिळणूक चालूच राहिली. उत्पादनसाधनांपासून ज्याची पूर्ण फारकत झालेली आहे, स्वतःच्या श्रमशक्तीशिवाय ज्याच्याजवळ विकण्यासारखें दुसरें कांहीं नाहीं असा कामगारवर्ग भांडवलशाहीच्या प्रगतीबरोबर सर्वत्र निर्माण होत आहे, आणि उत्पादनसाधनांच्या केंद्रीकरणामुळें तो अधिकाधिक संघटित होत आहे.

हा कामगारवर्ग भांडवलशाहीला नेस्तनाबूद करून उत्पादनाचीं साधनें समाजाच्या मालकीचीं करील; आणि समाजांतील इतर वर्गांनाहि बंधमुक्त करून स्वातंत्र्य व समता यांवर आधारलेल्या नव्या वर्गविहीन समाजाची स्थापना करील असा १८४८ मधील मार्क्स-एंगल्सच्या कम्युनिस्ट जाहीरनाम्याचा आशय होता. चारदोन धनिकांच्या औदार्यानें व सहानुभूतीनें समाजवाद अस्तित्वांत येणार नाहीं. त्यासाठीं कामगारवर्गानें संघटितपणें शासनसंस्था हस्तगत करणें आवश्यक आहे असें त्यांचें मत होतें. म्हणून त्यांनीं सर्व देशांतील कामगारांना एका झेंड्याखालीं एकत्र येण्याचा आदेश दिला.

सन अठराशें पन्नासनंतर युरोपांतील बहुतेक देशांत कारखानदारीची वेगानें वाढ होऊं लागली, आणि त्याबरोबरच कामगारांच्या संघटनांच्या जोरावर समाजवादाच्या दिशेनें वाटचाल करणारे समाजवादी पक्ष प्रत्येक देशांत स्थापन झाले. अशा प्रकारें साध्य-साधनांची निश्चिति झाल्यावर क्रांतीच्या तंत्राची चर्चा सुरू झाली. सनदशीर मार्गाची कास धरणारा इंग्लिश फेबियन, संपासारख्या आर्थिक उपायांवर केवळ अवलंबून राहणारा फ्रेंच सिंडिकॅलिस्ट व सशस्त्र क्रांतीचा पुरस्कार करणारा रशियन बोल्शेविक असे निरनिराळे पंथ समाजवाद्यांमध्यें उत्पन्न झाले. क्रांतीच्या तंत्रावर संघटनेचें स्वरूप अवलंबून असल्यामुळें सशस्त्र क्रांतीचा पाठपुरावा करणाऱ्या लेनिनसारख्या पुढाऱ्यांनीं निवडक व क्रियाशील कार्यकर्त्यांची कणखर व शिस्तबद्ध संघटना उभी केली. सरकारवर जनमताचें दडपण आणून सामाजिक सुधारणा करण्याचें ज्यांचें धोरण होतें त्यांनीं लोकशाहीच्या तत्त्वावर आपल्या पक्षाची बांधणी केली. अशा प्रकारें पहिल्या महायुद्धापूर्वींच युरोपीय समाजव्यवस्थेंत समाजवाद ही एक प्रभावी शक्ति होऊन बसली होती. महायुद्धानंतर रशियामध्यें लेनिनच्या नेतृत्वाखालीं कम्युनिस्ट पक्ष विजयी होऊन आपलीं ध्येयें प्रत्यक्षांत उतरविण्याची समाजवाद्यांना प्रथमच संधि मिळाली. क्रांतीच्या यशामुळें आतांपर्यंत युरोपपुरतें मर्यादित राहिलेलें समाजवादी तत्त्वज्ञान पौरस्त्य देशांत पसरूं लागलें. आशियांतील इतर देशांप्रमाणें हिंदुस्थानांतहि समाजवादाची ही लाट येऊन थडकली; व तिच्यामधूनच येथें वर्गवादी तत्त्वज्ञानाचा प्रसार झाला.

## हिंदी राष्ट्रवाद आणि भांडवलदारी हितसंबंध

हिंदुस्थानांतहि कारखानदारीच्या उगमाबरोबर पोटासाठीं केवळ मजुरीवर अवलंबून असणारा कामगारवर्ग शहरांमध्यें जन्मास आला. अतिश्रम, अल्प मजुरी, गलिच्छ वसति व बकाली राहाणी यांचा त्रास इतर देशांतल्या-प्रमाणें येथील मजुरांनाहि सहन करावा लागला. पण भारतांतील इतर लोकसंख्येच्या मानानें ते अत्यल्प असल्यामुळें समाजधुरीणांचें प्रथम त्यांच्या गाऱ्हाण्यांकडे लक्ष गेलें नाहीं. राष्ट्रवादी चळवळीचें नेतृत्व त्याकाळीं मध्यम वर्गाकडे होतें. इंग्रजी शिक्षणाच्या संस्कारामुळें कांहीं उदारमतवादी मूल्यें त्यांनीं पत्करलीं; व स्पर्धा, व्यवसायस्वातंत्र्य, करार इत्यादि तत्त्वांचा पुरस्कार केला. राष्ट्राच्या भरभराटीस पोषक म्हणून उगवत्या कारखानदारीचेंहि त्याकाळच्या समाजाग्रणींनीं स्वागत केलें. संरक्षक जकाती, हुंडणावळीचे दर इत्यादि बाबतींतील भांडवलदारांच्या मागण्यांना राष्ट्रसभेनें पाठिंबा दिला. मात्र भांडवलशाहींतील कामगारांच्या पिळवणुकीचें खरें स्वरूप माहीत नसल्यामुळें कामगारांचा प्रश्न त्यांना समजूं शकला नाहीं. ब्रिटिश सरकारवर इंग्लंडमधील कारखानदारांचें वजन होतें. साहजिकच राष्ट्रसभेच्या मागण्यांना त्यांनीं वाटाण्याच्या अक्षता लावल्या. सरकारी मदतीच्या अभावीं पहिल्या महायुद्धापर्यंत येथें भांडवलशाहीची विशेष वाढ झाली नाहीं; व वर्गविरोधा-लाहि फारशी तीव्रता आली नाहीं.

महायुद्धाच्या काळांत युध्यमान् राष्ट्रांची वसाहतींच्या बाजारांतील स्पर्धा कमी झाली. त्याचा हिंदी कारखानदारवर्गाला नेमका फायदा मिळाला. युद्धकाळांत हिंदुस्थानांतील अनेक धंद्यांची वाढ होऊन युद्धाच्या अखेरीस येथील भांडवलदारवर्ग सुसंघटित, सामर्थ्यवान् व जागरूक बनला. आपल्या वाढत्या आकांक्षा पुऱ्या करण्यासाठीं राजकीय सत्ता मिळविण्याची त्यानें महत्त्वाकांक्षा बाळगली; आणि देशांतील राष्ट्रसभेची लोकप्रियता ध्यानांत घेऊन तिच्या चळवळीला उघडपणें पाठिंबा दिला. युद्धअखेरीस इंग्लंडमधील भांडवलशाहीलाहि उतरती कळा लागली होती. अमेरिका, जपान इत्यादि राष्ट्रांची आंतरराष्ट्रीय बाजारपेठेंतील स्पर्धा

मारक ठरल्यामुळें वसाहतींवर अधिकाधिक अवलंबून राहाण्याची इंग्लंडवर पाळी आली होती. म्हणून अरेरावीपणाचें वर्तन सोडून देऊन हिंदी कारखानदारांना बरोबरीच्या नात्यानें वागविणें इंग्रज सरकारला भाग पडलें. दडपशाहीच्या जोडीला मधूनमधून सवलतींची व सामोपचाराची भाषा सुरू झाली. हिंदुस्थानांत निर्माण झालेला असंतोष कमी करण्यासाठीं हिंदुस्थान-सरकारच्या व्यापारविषयक धोरणांत ढवळाढवळ न करण्याचें भारतमंत्र्यांनीं आश्वासन दिलें. १९२० च्या असहकारितेच्या चळवळीनंतर हिंदी बाजार-पेठेंत ब्रिटिश मालाशीं ज्याची प्रत्यक्ष स्पर्धा नाहीं अशा साखर, कापड, आगपेट्या इत्यादि धंद्यांना मर्यादित संरक्षण देण्यांत आलें.

राष्ट्रीय चळवळीच्या दडपणाखालीं मिळालेल्या या संरक्षणामुळें भांडवलदारांच्या जो फायदा झाला त्याचा वांटा कामगारांना देण्याची त्यांनीं कधींच तयारी दाखविली नाहीं. उलट राष्ट्रीय एकजुटीच्या नांवाखालीं कामगार चळवळ दडपून टाकण्याचाच त्यांनीं सदैव प्रयत्न केला. गांधीवादी अर्थ-कारणांतील स्वप्नाळूपणा येथें त्यांना उपकारक ठरला. सामाजिक दुःखांना सामाजिक संस्थांपेक्षां व्यक्तीची सुखलालसाच अधिक कारणीभूत आहे असें गांधीजींचें निदान असल्यामुळें बहुजनसमाजाच्या दारिद्र्याबद्दल त्यांनीं कोणत्याहि एका वर्गाला जबाबदार धरलें नाहीं. स्वार्थसाधु धनिकांचें हृदयपरिवर्तन करून सामाजिक संपत्तीचे विश्वस्त या नात्यानें वागण्यास त्यांना प्रवृत्त करण्याची व अशा रीतीनें आर्थिक प्रश्न सोडविण्याची त्यांनीं अपेक्षा धरली होती. त्यांच्या नेतृत्वाखालीं तत्कालीन राजकीय प्रश्नांवर भर देऊन आर्थिक विषमतेचा प्रश्न स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत पुढें ढकलण्याचें धोरणच राष्ट्रसभेनें अवलंबिलें होतें. म्हणून लढाऊ कामगार संघटना बांधण्याची तिला गरज वाटली नाहीं. अहमदाबाद लेबर असोसिएशनसारख्या ज्या संस्था गांधीजींच्या प्रेरणेनें स्थापन झाल्या, त्यांनींहि कामगारांना वर्गकलहाऐवजीं वर्गसमन्वयाचीच शिकवण दिली. मजूरसंघटनेकडे दुर्लक्ष केल्यामुळें कामगार वर्गावर राष्ट्रसभेचा विशेष प्रभाव पडला नाहीं. म्हणून हा वर्ग स्वातंत्र्य-चळवळीपासून बव्हंशीं अलिप्तच राहिला.

## श्रमिकांच्या चळवळीची पूर्वपीठिका

नव्या स्पर्धाप्रधान अर्थव्यवस्थेमुळें ग्रामीण जीवनाची जी वाताहत झाली, तिची प्रतिक्रिया महाराष्ट्रांत प्रथम सन १८७४–७५ मधील शेतकऱ्यांच्या दंग्यानें झाली. या दंग्यामध्यें कर्जबाजारी कुळांनीं सावकारांचीं दप्तरें जाळून आपल्या हातांतून निसटणारे जमिनीचे मालकी हक्क शाबूत ठेवण्याचा प्रयत्न केला. आर्थिक पिळणूक व सामाजिक दास्य यांचा जाच दुःसह झाल्यानें बहुजनसमाजांत धुमसणारा असंतोष तीव्रतेनें व्यक्त करून त्याला तात्त्विक अधिष्ठान देण्याचें कार्य जोतिराव फुल्यांच्या सत्यशोधक समाजानें केलें. जोतिरावांचा रोख मुख्यतः शूद्रांच्या सामाजिक व सांस्कृतिक गुलामगिरीविरुद्ध होता हें खरें. पण सामाजिक विषमता नाहींशी करण्यास वरिष्ठ वर्गाची सहानुभूति पुरेशी पडणार नाहीं, दलित वर्गातील लोकांनीं स्वतःच्या हक्कांसाठीं स्वतःच संघटितपणें व हिरिरीनें झगडलें पाहिजे याची त्यांनींच प्रथम बहुजनसमाजाला शिकवण दिली. त्यांच्या सहकाऱ्यांनीं श्रमजीवी वर्गाचीं गाऱ्हाणीं वेशीवर टांगलीं. कृष्णराव भालेकरांनीं आपल्या पोवाड्यांतून दारिद्र्यानें गांजलेल्या व दुष्काळानें पीडलेल्या शेतकऱ्याचें हृदयद्रावक चित्र रेखाटलें. नारायण मेघाजी लोखंडे यांनीं मुंबईतील कामगारवर्गाच्या प्रश्नांत मन घातलें. त्यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबईस वीस हजार कामगारांची एक प्रचंड सभा भरविण्यांत आली; व कामगारांच्या मागण्यांचा एक अर्ज हिंदुस्थान सरकारकडे सादर केला गेला. १८९० सालीं लोखंड्यांनीं मुंबईस बॉम्बे मिल हॅन्डस् असोसिएशन या हिंदुस्थानांतील पहिल्या कामगारसंघटनेची स्थापना केली. याच वेळीं सोराबजी बेंगाली यांच्यासारख्या कांहीं उदारमतवादी गृहस्थांनीं कामगारांच्या हितासाठीं सरकारनें कायदे करावे अशी मागणी केली होती. या चळवळीचा थोडाबहुत परिणाम झाला. पण त्यापेक्षांहि हिंदी कारखानदारीच्या वाढीला पायबंद घालण्यास उत्सुक असणाऱ्या इंग्रज कारखानदारांचें सरकारवर जास्त दडपण पडलें. १८९० सालीं कामगारांच्या परिस्थितीची पाहणी करण्यासाठीं हिंदुस्थानसरकारनें एक कमिशन नेमलें. या कमिशनच्या शिफारशी जमेस

धरून १८९१ सालचा कामगारकायदा करण्यांत आला; आणि कामगारांच्या कांहीं मागण्या त्यांच्या पदरांत पडल्या.

हिंदु-मुसलमानांचे दंगे, लोखंडे ह्यांचा मृत्यु, प्लेग आणि दुष्काळ यांमुळें एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं मुंबईतील कामगारचळवळ हळुहळू थंडावत गेली. पण आर्थिक परिस्थिति सुधारूं लागतांच कामगारसंघटनांनाहि पुन्हा जीवन मिळालें. टिळकांच्या शिक्षेनंतर सार्वत्रिक हरताळ पाडून मुंबईच्या कामगारवर्गानें आपल्या राजकीय जाणिवेची व संघटित सामर्थ्याची सरकारला थोडी चुणूक दाखविली. बॉंबे पोस्टल युनियन, कामगार हितवर्धक सभा, सोशल सर्व्हिस लीग यासारख्या संस्था या काळांत स्थापन झाल्या; आणि गिरणीमालकांकडे मध्यस्थी करून कामगारांच्या गाऱ्हाण्यांची दाद लावण्याची त्यांनीं खटपट केली. मात्र महायुद्धाच्या अखेरपर्यंत हिंदुस्थानांतील कामगार चळवळ बाल्यावस्थेंतच होती. बहुतेक कामगारसंघटना कामचलाऊ व तात्कालिक स्वरूपाच्या असून लढाऊ धोरण आंखण्याचें त्यांच्यामध्यें सामर्थ्य नव्हतें. कामगारांची अल्पसंख्या, अज्ञान, दारिद्य आणि संकटकालीं खेड्यां-कडे परतण्याची वृत्ति यांमुळें कामगारवर्गाच्या अडीअडचणी सरकार आणि गिरणीमालक यांच्या कानावर घालण्यापलीकडे या संघटनांची प्रगति झाली नाहीं.

## कम्युनिस्ट पक्ष आणि कामगार चळवळ

युद्धकालांतील औद्योगिक प्रगति, स्वराज्य संघाच्या चळवळीमुळें झालेली लोकजागृति आणि रशियांतील कामगारक्रांतीनें निर्माण केलेल्या अपेक्षा यांमुळें जगांतील इतर देशांप्रमाणें हिंदुस्थानांतहि संपाची वावटळ उठली. गिरणीमालकांनीं युद्धकाळांत मिळविलेल्या नफ्याचा कांहीं भाग आपल्या पदरांत पडावा म्हणून कामगारांनीं संपाचें शस्त्र हातीं घेतलें. या संपांतून मुंबई, सोलापूर इत्यादि शहरांमध्यें अनेक कामगार संघटना जन्मास आल्या. आंतरराष्ट्रीय मजूर संघाच्या स्थापनेनंतर तर या उत्साहाला अधिकच भरती आली; आणि १९२० सालीं अखिल भारतीय ट्रेड युनियन कॉंग्रेसची स्थापना झाली. तेव्हांपासून १९२९ पर्यंत संपाची प्रवृत्ति सारखी

बळावत होती. १९३० सालच्या जागतिक मंदीनें कामगार चळवळीला ज़ोराचा फटका बसला; पण ही मंदीची लाट ओसरतांच कामगार संघटनांचें कार्य पूर्ववत् सुरू झालें.

दोन महायुद्धांतील काळांत कामगारचळवळीवर बव्हंशीं कम्युनिस्ट पक्षाचें वर्चस्व होतें. त्याच्या नेतृत्वाखालीं तिला लढाऊ व आक्रमक वळण लागलें. पक्षाच्या सुरवातीपासूनच सरकार व भांडवलदार यांच्या दुहेरी विरोधाला त्याला तोंड द्यावें लागलें. कानपूर व मीरत येथील राजद्रोहाचे खटले, सन १९२२ व १९३४ मधील औद्योगिक कलहाचे कायदे, १९२९ चें नागरिक संरक्षण बिल इत्यादि उपायांनीं कम्युनिस्टांना दडपून टाकण्याची सरकारनें शिकस्त केली. पण कामगारचळवळीचा जोर त्यामुळें कमी झाला नाहीं. कामगारांच्या संघटित शक्तीच्या दडपणाखालीं कामाचे तास, ट्रेड युनियन संघटनेस मान्यत, अपघातापासून संरक्षण, स्त्रिया व मुलें यांची रोजगारी, कर्जनिवारण इत्यादि प्रश्नांबद्दल हिंदुस्थानसरकारनें कायदे केले. चळवळींतील कार्यकर्त्यांचा उत्साह, कार्यक्षमता व कळकळ, आणि पक्षाची कडवी शिस्त व खंबीर संघटना यामुळें अनेक आपत्ती सोसाव्या लागूनहि कम्युनिस्ट पक्षाचें कामगारांवरील वजन बराच काळपर्यंत कायम राहिलें.

## कम्युनिस्ट पक्ष—तंत्र आणि तत्त्वज्ञान

आंतरराष्ट्रीय भांडवलशाहीविरोधी युद्धाची एक आघाडी म्हणून वर्गवादी विचारवंत आणि कम्युनिस्ट इंटरनॅशनल यांनीं पहिल्यापासून वसाहतींच्या स्वातंत्र्यचळवळीला सहानुभूति दाखविली होती. सर्व देशांत कामगारांचें राज्य प्रस्थापित करण्याचा त्यांनीं विडा उचलला असल्यामुळें हिंदुस्थानांतहि ब्रिटिशांच्या साम्राज्यशाहीला त्यांचा विरोध होता. म्हणून सुरवातीपासून सरकारनें या चळवळीची कधीं गय केली नाहीं. ब्रिटिश सरकारच्या दडपशाहीला बळी पडणाऱ्या ध्येयवादी तरुणांबद्दल सर्वसामान्य जनांना प्रथम बरीच आत्मीयता वाटली. मात्र वर्गवादी तत्त्वज्ञानाबद्दल अजून येथील लोकांच्या मनांत जिज्ञासेपेक्षां कुतूहलच अधिक होतें. १९३० च्या मंदीनें कामगारांची व मध्यमवर्गाची आर्थिक स्थिति खूपच खालावली. त्यामुळें

वर्गवादाचा प्रभाव वाढूं लागला; आणि खुद्द राष्ट्रसभेमध्येंहि वर्गवादाचा पुरस्कार करणाऱ्या निरनिराळ्या गटांची स्थापना झाली. राष्ट्रसभा भांडवलदारांच्या आहारीं गेली आहे अशा भावनेनें १९३० सालच्या कायदेभंगाच्या चळवळीपासून कम्युनिस्ट कार्यकर्ते फटकून राहिले. याच वेळीं जर्मनीमध्यें हुकूमशाहीचा उदय होऊन जगावर एका आगामी संकटाच्या भयंकर छाया पसरत होत्या. कम्युनिस्टांनीं यावेळीं सर्व डाव्या गटांना एकत्र आणून हुकूमशाहीविरोधी आघाडी स्थापन करण्याचा यत्न केला. मात्र रशिया व जर्मनी यांच्यामध्यें अनाक्रमणाचा तह झाल्यावर त्यांनीं आपला पवित्रा बदलला; आणि दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं साम्राज्यवादी राष्ट्रांचें बाजारपेठांसाठीं चाललेलें हें युद्ध आहे अशी भूमिका घेऊन त्याला विरोध करण्याचें धोरण अवलंबिलें. युद्धप्रयत्नांत अडथळा आणण्यासाठीं हिंदुस्थानांतल्या अनेक शहरांत कामगारवर्गाचे संपहि त्यांनीं घडवून आणले. त्यानंतर जेव्हां रशिया युद्धांत पडला, तेव्हां फॅसिझमला हाणून पाडण्यासाठीं लोकशाही राष्ट्रांनीं चालविलेलें हें लोकयुद्ध आहे असा प्रचार त्यांनीं सुरू केला; आणि हिंदुस्थानसरकारच्या युद्धकार्यांत उत्साहानें भाग घेतला. अशा वेळीं ब्रिटिशांची अडवणूक केल्यास अप्रत्यक्षपणें फॅसिझमला मदत केल्यासारखें होईल या भीतीनें १९४२ सालच्या स्वातंत्र्य-लढ्याला त्यांनीं विरोध केला. त्यांच्या आदेशावरून हिंदुस्थानांतील कामगार-वर्गहि बव्हंशीं चळवळीपासून अलिप्त राहिला. या धोरणामुळें येथील राष्ट्रवादी आणि कम्युनिस्ट यांच्यामध्यें एक अभेद्य भिंत निर्माण झाली; आणि राष्ट्रवादी परंपरेंतून पुढें आलेल्या कार्यकर्त्यांचा रोष कम्युनिस्टांना पत्करावा लागला.

ब्रिटिशांच्या साम्राज्यशाहीशीं झगडत असतांनाच भारतीय राष्ट्रवादांतील अंतर्विरोध उलगडून दाखविण्याचें कार्य येथें कम्युनिस्टांना करावयाचें होतें. परकीय सत्तेशीं सामना देण्यासाठीं राष्ट्रवाद्यांनीं देशांतील सर्व वर्गांना एकत्र आणलें होतें. परंतु त्यांच्या निरनिराळ्या हितसंबंधांचें ऐक्य व विरोध यांचें बरोबर तारतम्य राखून टिकाऊ एकजूट साधण्याऐवजीं तात्पुरत्या तडजोडीवरच त्यांनीं भर दिला. तथापि राष्ट्र हें एकजिनसी नाहीं. आर्थिक व सामाजिक विषमतेमुळें समाजजीवन दुभंगलेलें आहे. भांडवलदार व कामगार, जमीनदार

व शेतकरी यांचे संबंध पूर्णपणें एक नाहींत, किंबहुना कांहीं बाबतींत परस्पर-विरोधीच आहेत. राष्ट्रीय ऐक्याची ऐसपैस घोषणा करून या अंतर्गत विरोधाकडे जर आपण डोळेझांक केली, आपल्या प्रतिस्पर्ध्यांचें सामर्थ्य जर आपण ओळखलें नाहीं, तर सत्ताधारी वर्गाचा जुलूम वाढतच जाईल; आणि जनतेनें साम्राज्यवाद्यांविरुद्ध लढून मिळविलेली सत्ता शेवटीं मूठभर भांडवल-दारांच्याच हातांत पडेल. भांडवलदारवर्ग संघटित, स्थार्थसाधु व आपल्या हिताबद्दल जागरूक आहे, तर जनता अज्ञानी, दुबळी आणि असंघटित आहे. म्हणून नुसते ब्रिटिश लोक हिंदुस्थानांतून निघून गेल्यानें लोकांच्या मानेवरील जोखड नाहींसें होण्याचा संभव नाहीं ही गोष्ट कम्युनिस्टांनीं वारंवार स्पष्ट केली; आणि भांडवलदारांच्या आहारीं न जातां कामगारांना स्वतंत्र धोरण आंखतां यावें म्हणून त्यांच्या आर्थिक व राजकीय हक्कांची जाणीव करून देऊन त्यांनीं त्यांच्या लढाऊ संघटना उभारल्या.

हिंदुस्थानांतील मोठमोठ्या शहरांमध्यें कामगार चळवळ उभी करण्यांत कम्युनिस्टांना बऱ्याच प्रमाणांत यश मिळालें हें खरें. परंतु भारतीय राष्ट्रसभा ही भांडवलदारांची बटीक आहे अशा भ्रमानें काँग्रेसप्रणीत साम्राज्यशाही-विरोधी आंदोलनापासून फटकून राहाण्याची वृत्ति कम्युनिस्ट चळवळीला शेवटीं घातक ठरली. वास्तविक पाहतां हिंदुस्थानसारख्या परतंत्र व अप्रगत राष्ट्रांत भांडवलशाही ही एका मर्यादित अर्थानें पुरोगामी शक्ति होती. सन १९२० पासून भांडवलदार स्वातंत्र्यचळवळींत आघाडीवर होते. रूढिवादाशीं झगडून व्यक्तिप्रेरणेचें महत्त्व स्थापित करतांना आणि विधायक कार्यक्रमा-मधून सामाजिक सुधारणेची मुहूर्तमेढ रोवतांना गांधीजींना त्यांनीं साहाय्य केलें होतें. त्यांच्या पाठिंब्यामुळें राष्ट्रीय चळवळीची व्याप्ति आणि सामर्थ्य वाढत गेलें. तडजोड आणि वाटाघाटी यांवर त्यांचा भर असल्यामुळें संपूर्णपणें क्रांतिकारक धोरणाला त्यांनीं पाठिंबा दिला नाहीं हें खरें. पण तरीहि त्यांच्या वर्चस्वाबरोबर प्रतिगामी वृत्तीचे संस्थानिक बाजूस सारले गेले. संकुचित दृष्टीच्या मध्यमवर्गीयांना दुय्यम स्थान पत्करावें लागलें. शिवाय राष्ट्रसभेमध्यें भांडवलदारांप्रमाणें अनेक दलित वर्गहि सामील झाले होते. ग्रामोद्योगाच्या कार्यक्रमामधून राष्ट्रसभेनें शेतकऱ्यांशीं संबंध जोडला.

अस्पृश्यतानिवारणासारख्या सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करून समाजांतील खालच्या थरापर्यंत राष्ट्रीयत्वाचें लोण नेऊन पोहोंचविलें. आतांपर्यंत शेकडों वर्षे सुप्त स्थितींत असलेल्या खेड्यांना सत्याग्रहाच्या चळवळीनेंच जागें केलें. शेतकीविषयक कार्यक्रम, राष्ट्रीय नियोजन इत्यादि ठरावांमधून त्यांच्या आकांक्षा पूर्ण करण्याची राष्ट्रसभेनें जबाबदारी स्वीकारली. खेड्यापाड्यांतील ह्या बहुसंख्य जनतेच्या क्रांतिकारक शक्तीची कम्युनिस्टांना ओळख पटली नाहीं. म्हणून शेतकरी वर्गाकडे त्यांनीं पाठ फिरविली, व मार्क्सवादाचा ठोकळेबाजपणें अर्थ लावून शहरांतील एकट्या कामगार-वर्गालाच क्रांतिकारक ठरविलें. एवढ्या मोठ्या अवाढव्य देशांत हा वर्ग अत्यल्प होता. दारिद्र्य आणि अज्ञान यामुळें त्याच्या शक्तींची खची होत होती. सार्वत्रिक संप पुकारून अर्थव्यवस्था खिळखिळी करण्याइतकी अजून त्याच्यांत ताकद नव्हती. अशावेळीं कामगारवर्गाची हुकूमशाही, सोव्हिएटची स्थापना ह्या घोषणा कोणाला पटणार ? कामगारक्रांतीची पूर्वतयारी म्हणून संपूर्ण स्वातंत्र्य व धर्मातीत लोकशाही हीच त्यावेळीं हिंदुस्थानसारख्या परतंत्र देशाची पहिली गरज होती. पण राष्ट्रसभेला वेळीअवेळीं भांडवल-दारधार्जिणी म्हणून नांवें ठेवतांना येथील सामाजिक संबंधांतील ही गुंतागुंत कम्युनिस्टांनीं ध्यानांत घेतली नाहीं. म्हणून सामाजिक सुधारणेचा हव्यास असूनहि अनेक पुरोगामी शक्तींची सहानुभूति ते गमावून बसले.

आंतरराष्ट्रीय समाजवादी चळवळीलाहि राष्ट्रवाद व समाजवाद यांच्या परस्परसंबंधांचें यथार्थ आकलन झालेलें नाहीं. मार्क्सच्या वेळेपासून समाजवाद्यांनीं आंतरराष्ट्रीय सहकार्य हें आपलें ब्रीद मानलें होतें. ज्यांच्या प्राथमिक गरजा देखील भागलेल्या नाहींत, प्रचलित समाजव्यवस्थेंत ज्यांना कोणतेहि सामाजिक किंवा राजकीय हक्क नाहींत त्यांना आपलें राष्ट्र, आपल्या राजकीय संस्था यांबद्दल कां म्हणून प्रेम वाटावें असा मार्क्सचा स्पष्ट सवाल होता. क्रांतिकारक प्रवृत्ति दडपून टाकण्यांत निरनिराळ्या देशांतील सत्ताधारी वर्ग परस्परांना मदत करीत असल्यामुळें सर्व देशांतील कामगारांनींहि एकत्र येऊन भांडवलशाहीविरोधी आघाडींत सामील व्हावें असें त्यांचें म्हणणें होतें. याच भूमिकेवरून मार्क्सप्रभृति समाजवादी

तत्त्वचिंतकांनीं राष्ट्राराष्ट्रांतील युद्धांनाहि विरोध केला. युरोपांतील तत्कालीन परिस्थिति लक्षांत घेतां त्यांचें म्हणणें संपूर्णपणें खरें होतें. पण एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस अनेक देशांच्या राज्यघटनेंत कामगारांना भांडवलदारांच्या बरोबरीनें राजकीय हक्क मिळाले. त्यांच्या जोरदार संघटनांचा सरकारी धोरणावर हळुहळू प्रभाव पडूं लागला. त्यामुळें राष्ट्रीय धोरण व कामगारांचे हितसंबंध यांतील तफावत कांहीं प्रमाणांत कमी होऊं लागली. प्रत्येक देशांतील सामाजिक संस्था व परिस्थिति निराळी असल्यामुळें देशाच्या राजकारणावर प्रभाव पाडण्यासाठीं प्रत्यक्षांत राष्ट्रवादी धोरण स्वीकारणें प्रत्येक देशांतील समाजवादी पक्षाला भाग पडलें. पहिल्या महायुद्धामध्यें तर बहुतेक देशांतील समाजवाद्यांनीं आपआपल्या सरकारला मदत करून आंतरराष्ट्रवादाच्या तत्त्वाला पुष्कळच मुरड घातली. पण तरीहि तत्त्व आणि व्यवहार यांच्यांतील ही फारकत उघडपणें मान्य करण्यास त्यांची तयारी नसल्यामुळें राष्ट्रवाद व समाजवाद यांच्या परस्परसंबंधाचें त्यांनीं शास्त्रशुद्ध विवेचन केलें नाहीं.

लेनिनसारखे कांहीं अपवादात्मक समाजवादी पुढारी मात्र युद्धकालांतहि आंतरराष्ट्रीय क्रांतीच्या तत्त्वाशीं एकनिष्ठ राहिले. कामगारक्रांतीची पूर्व-तयारी म्हणून रशियाचा युद्धांत पराजय होणें अवश्य आहे असें लेनिनचें मत होतें. युरोपांतील उद्योगप्रधान देशांत कामगारक्रांति घडून आल्याशिवाय रशियासारख्या आर्थिक व सांस्कृतिक दृष्ट्या मागासलेल्या देशांत समाजवाद यशस्वी होऊं शकणार नाहीं अशी अनेक कम्युनिस्ट नेत्यांची कल्पना होती. म्हणून सन १९१७ नंतरहि युरोपांतील देशांत समाजवादी क्रांति घडवून आणण्याचे त्यांनीं प्रयत्न केले; व त्या उद्देशानें कम्युनिस्ट इंटरनॅशनलची स्थापना केली. परंतु १९२३ नंतर अमेरिकन भांडवलाच्या मदतीनें युरोपांतील राष्ट्रांत आर्थिक तेजी व राजकीय शांतता नांदूं लागली. तेव्हां परिस्थितीच्या दडपणाखालीं नजीकच्या काळांतील आंतरराष्ट्रीय क्रांतीची आशा सोडून देऊन ‘एका देशांत समाजवादाची स्थापना’ हें ध्येय कम्युनिस्ट क्रांतिकारकांना आपल्या डोळ्यापुढें ठेवावें लागलें. आंतरराष्ट्र-वादाच्या तत्त्वाप्रमाणें सर्व राष्ट्रांतील लोक तत्त्वतः सारखे आहेत, आणि आर्थिक व सांस्कृतिक विकासाचा प्रत्येक राष्ट्राला समान हक्क

आहे अशी त्यांची विचारप्रणाली होती. म्हणून सत्ताग्रहणानंतर झारच्या साम्राज्यांतील सर्व राष्ट्रकांना रशियाच्या दास्यांतून त्यांनीं मुक्त केलें; व स्वयं-निर्णयाच्या तत्त्वानुसार परस्परांच्या हितासाठीं परस्परांशीं सहकार्य करणाऱ्या स्वतंत्र राष्ट्रकांच्या संघराज्याची म्हणजेच सोव्हिएट युनियनची स्थापना केली. मात्र जागतिक राजकारण राष्ट्राराष्ट्रांतील चढाओढीच्या तत्त्वावर चालत असल्यामुळें आंतरराष्ट्रीय सहकार्याचें हें धोरण सोव्हिएट युनियनच्या बाहेर त्यांना प्रत्यक्षांत उतरवितां आलें नाहीं. उलट समाजवादाच्या प्रसारासाठीं या स्पर्धेमध्यें राष्ट्रवादी भूमिका घेऊन सोव्हिएट युनियनच्या हितसंबंधांचें संरक्षण करणें त्यांना भाग पडलें. पण कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे अग्रणी या नात्यानें इतर राष्ट्रांतील कामगारचळवळींना मार्गदर्शन करण्याचें कार्यहि त्यांनीं शिरावर घेतलें होतें. या दोन जबाबदाऱ्यांतील अंतर्विरोध सोडविणें पुष्कळदां त्यांना कठिण होऊन बसलें. अशा वेळीं सोव्हिएट युनियनसमोरील प्रश्नांना त्यांनीं जास्त महत्त्व दिलें तर तें साहजिकच आहे. पण त्यामुळें इतर देशांतील कामगारचळवळींचें मात्र त्यांना बिनचूक मार्गदर्शन करतां आलें नाहीं. कम्युनिस्ट इंटरनॅशनलमध्यें सत्तेचें केंद्रीकरण असल्यामुळें शिस्तीच्या नांवाखालीं देशादेशांतील कम्युनिस्ट पक्षांनीं वरिष्ठांच्या हुकुमांची अंधपणें अंमलबजावणी केली. त्यामुळें त्यांच्या चळवळींत एक प्रकारचा साचेबंदपणा शिरला. हिंदुस्थानांतील कम्युनिस्ट पक्ष याला अपवाद नव्हता. आपल्या देशाची ऐतिहासिक परंपरा, राजकीय परिस्थिति आणि लोकांची मनोवृत्ति यांचा स्वतंत्रपणें अभ्यास करण्याऐवजीं कांहीं सर्वसामान्य सिद्धान्तांचें व घोषणांचें पुनःपुन्हा चर्वितचर्वण करण्यांतच येथील कम्युनिस्टांनीं आपली बरीचशी शक्ति खर्च केली. म्हणून येथील सामाजिक जीवनांत त्यांचा पक्ष उपरा ठरला. त्यामुळेंच मार्क्सवादी कार्यपद्धतीचा अवलंब करून त्यांनीं येथील अर्थकारणांत जरी थोडाबहुत प्रभाव पाडला, तरी आपल्या सामाजिक जीवनांत त्यांना समाजवादी मूल्यें रुजवितां आलीं नाहींत. त्यांच्या त्यागाचा, शौर्याचा व संघटनाकौशल्याचा भारताच्या स्वातंत्र्यलढ्याला व्हावा तितका उपयोग झाला नाहीं, आणि स्वातंत्र्यचळवळी-मुळें झालेल्या लोकजागृतीचा समाजवादी चळवळीला पूर्णपणें फायदा मिळाला

नाहीं. उलट साम्राज्यसत्ता व कम्युनिस्ट यांचा अहिनकुलवत् विरोध असतांहि त्यांच्या संकुचित दृष्टीमुळें व चुकीच्या धोरणामुळें त्यांच्याबद्दल लोकमत कलुषित होऊन ते देशद्रोही ठरले.

## राष्ट्रसभा आणि जवाहरलाल नेहरू

कम्युनिस्टांची चळवळ जरी सबंध देशांत स्वतंत्रपणें मूळ धरूं शकली नाहीं, तरी त्यांच्या प्रयत्नानें मुंबई, सोलापूर, यासारख्या औद्योगिक शहरांतील मजूर वर्गांत लढाऊ वृत्ति निर्माण झाली. १९२८–२९ या काळांतील सार्वत्रिक संपामुळें कामगारांच्या वाढत्या सामर्थ्याचा सरकारला व लोकांना एकदमच प्रत्यय आला. राष्ट्रीय लढ्यांत बहुजनसमाजानें फार मोठ्या प्रमाणांत भाग घ्यावा अशी कॉंग्रेसची अपेक्षा असेल तर तिनें शेतकऱ्यांच्या आणि मजुरांच्या आर्थिक अडचणींची त्वरित दखल घेणें जरूर आहे याची राष्ट्रसभेंतील कांहीं विचारवंतांना जाणीव होऊं लागली. राजकीय स्वातंत्र्याच्या व लोकशाहीच्या ध्येयाला आर्थिक सुरक्षिततेच्या व समतेच्या तत्त्वांची जोड देऊन राष्ट्रवाद आणि समाजवाद यांचा समन्वय करूं पाहणारी एक जोरदार विचारप्रणाली राष्ट्रसभेंत उदयास आली. जवाहरलाल नेहरु हे या विचारप्रणालीचे प्रमुख प्रवक्ते होत. १९२० पासूनच किसान चळवळींत त्यांनीं लक्ष घातलें होतें. आपल्या जीवनकार्यांत राष्ट्रीय प्रश्नांना जरी त्यांनीं अग्रस्थान दिलें, तरी त्यांच्या आंतरराष्ट्रीय पार्श्वभूमीचा त्यांना कधीं विसर पडला नाहीं. युरोपच्या दौऱ्यावर असतांना ब्रुसेल्स येथें भरलेल्या दडपलेल्या राष्ट्रांच्या परिषदेस ( Congress of oppressed nationalities ) ते भारतीय राष्ट्रसभेचे प्रतिनिधि म्हणून हजर राहिले. परिषदेनंतर तेथें स्थापन झालेल्या साम्राज्य-विरोधी संघाचें ( League against Imperialism ) त्यांनीं मनःपूर्वक स्वागत केलें. हिंदुस्थानांत परत आल्यावर मद्रास कॉंग्रेसपुढें त्यांनीं स्वातंत्र्याचें ध्येय, महायुद्धाची आपत्ति, साम्राज्यविरोधी संघाशीं सहकार्य इत्यादि विषयक ठराव मांडले, आणि ते बिनविरोध मंजूर झाले. आपला राष्ट्रवाद संकुचित व स्वयंकेंद्रित होऊं नये अशी त्यांना उत्कंठा होती. त्या दृष्टीनें स्वातंत्र्य हा शब्द त्यांना संदिग्ध व असमाधानकारक वाटत होता. म्हणून स्वातंत्र्याबरोबर समाजवादाचाहि प्रचार त्यांनीं चालू ठेवला.

अपल्या क्रांतिकारक भूमिकेमुळें त्यांनीं हिंदी तरुणांचीं मनें वेधून घेतलीं; आणि युवकसंघाच्या चळवळीस चालना दिली. एका वर्षांत चार प्रांतिक परिषदांचे ते अध्यक्ष झाले; आणि १९२९ मध्यें त्यांना ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेसचें अध्यक्षपद मिळालें. सनदशीर प्रवृत्तीच्या जुन्या पुढाऱ्यांची सद्दी संपली; आणि जवाहरलाल व सुभाषचंद्र यांच्याकडे लोक आशेनें बघूं लागले. ह्या सर्व गोष्टी ध्यानांत घेऊनच महात्माजींनीं लाहोर कॉंग्रेसच्या अध्यक्षपदासाठीं जवाहरलाल नेहरूंच्या नांवाचा आग्रह धरला.

राष्ट्रसभेच्या व्यासपीठावरील आपल्या पहिल्याच अध्यक्षीय भाषणांत नेहरूंनीं लोकसत्ता आणि समाजवाद यांवर आपली दृढ श्रद्धा असल्याची घोषणा केली. देशांतील सर्व वर्गांच्या सहकार्यानें संपूर्ण स्वातंत्र्य हस्तगत करणें हेंच राष्ट्रसभेचें आजचें उद्दिष्ट आहे. त्यामुळें समाजवादी कार्यक्रमाचा ताबडतोब स्वीकार करणें तिला शक्य होणार नाहीं हें खरें. परंतु बहुजनसमाजाचें पिढ्यान्‌पिढ्याचें दारिद्र्य नष्ट करून सामाजिक पुनर्घटनेचें आपलें ध्येय जर खरोखरच सिद्धीस न्यावयाचें असेल तर जगांत सर्वत्र झपाट्यानें प्रसृत होणाऱ्या समाजवादी तत्त्वज्ञानाचा आपणांस स्वीकार करावा लागेल. सध्यां आपल्यापुढें तीन मुख्य प्रश्न आहेत. अल्पसंख्याक जाती, संस्थानें आणि किसानकामगार. यांपकीं तिसरा प्रश्न काय तो मूलगामी व महत्त्वाचा आहे. शेतकऱ्यांच्या व मजुरांच्या प्रश्नांना जर आपण नेटानें हात घातला, तर बाकीच्या दोन्ही प्रश्नांतील गुंतागुंत पुष्कळच कमी होईल. कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं कॉंग्रेस ही सर्वांची संस्था आहे. भांडवलदार आणि मजूर, जमीनदार आणि शेतकरी, यांच्या बाबतींत तिनें समबुद्धि राखली पाहिजे. पण या युक्तिवादांत बिलकुल तथ्य नाहीं. शेतकरी व कामगार यांच्यावर आजतागायत होत असलेला जुलूम इतका जबर आहे कीं तटस्थतेच्या नांवाखालीं त्याकडे डोळेझांक करणें म्हणजे अप्रत्यक्षपणें अन्यायाचा कैवार घेण्यासारखें आहे. तसेंच आजकाल धनिकांच्या बाबतींत विश्वस्ताची एक नवी कल्पना पुढें येऊं पहात आहे. तिचा स्पष्ट अर्थ हा आहे कीं मजुरांचें हिताहित ठरविण्याचा अधिकार स्वयंनियुक्त विश्वस्तांच्या-मालकांच्या हातीं राहिला पाहिजे. वस्तुतः विश्वस्त म्हणून जर कोणाला निवडावयाचें असेल

तर निःशंकपणें राष्ट्रलाच निवडलें पाहिजे. कोणत्याहि एका व्यक्तीला किंवा गटाला निवडणें योग्य नाहीं. कांहीं इंग्रजांची अजूनहि अशी प्रामाणिक समजूत आहे कीं आपण भारताचे विश्वस्त आहोंत. पण या विश्वस्तांनीं आमच्या मातृभूमीची कोण दुर्दशा करून टाकली आहे. तेव्हां हा प्रश्न दयाबुद्धीचा नसून हक्काचा आहे हें जाणून काँग्रेसनें मजूरसंघटनांचें अधिकाधिक सहकार्य मिळविलें पाहिजे. असें झालें तरच तिला बळकटी येऊन साम्राज्यसत्तेशीं सामना देण्यास ती समर्थ होईल असा त्यांचा या भाषणाचा इत्यर्थ होता. § नेहरूंच्या जागरुकतेमुळें व प्रभावामुळें राष्ट्रसभेच्या ठरावांना हळुहळू निराळें वळण लागलें. १९३१ च्या अधिवेशनांत मूलभूत हक्कांचा व आर्थिक धोरणाचा ठराव पास झाला; आणि १९३६ च्या काँग्रेसमध्यें शेतकीविषयक कार्यक्रमाच्या ठरावास मंजुरी मिळाली याचें श्रेय जवाहरलालनांच द्यावें लागेल. उत्पादन साधनांची सामुदायिक मालकी, आर्थिक नियोजन इत्यादि साम्यवादी तत्त्वांचा त्यांनींच हिंदवासीयांना प्रथम परिचय करून दिला. शेतकऱ्यांच्या व कामगारांच्या चळवळीशीं ते स्वतः समरस झाले; इतकेंच नव्हे तर त्यांच्या जीवनाची भौतिक व सांस्कृतिक पातळी उंचावणें हेंच कोणत्याहि सामाजिक चळवळीचें उद्दिष्ट असलें पाहिजे असें लोकांच्या मनावर बिंबविण्याचा त्यांनीं अव्याहत प्रयत्न केला. त्यांच्याच सूचनेवरून राष्ट्रसभेनें एक 'राष्ट्रीय नियोजन समिति' नेमून स्वातंत्र्योत्तर काळांतील आर्थिक योजनेची स्थूलमानानें रूपरेषा आंखली. स्वदेशांतील चळवळीबरोबर इतर राष्ट्रांतील स्वातंत्र्यलढ्यांकडेहि नेहरूंचें लक्ष होतें. हिंदुस्थानांतील राष्ट्रीय चळवळ ही जागतिक स्वातंत्र्यसंग्रामाची एक आघाडी आहे या मुद्यावर त्यांचा विशेष भर होता. ¶ म्हणूनच हिंदी राष्ट्राच्या आकांक्षांची

§ Jawaharlal Nehru : *India and the World*, pp. 27-30.

¶ India's immediate goal can therefore only be considered in terms of the ending of the exploitation of her people. Politically, it must mean independence and the severance of the British connection, which means imperialist dominion; economically and socially it must mean the ending of all special class privileges and

जगाला ओळख करून देण्याची आणि निरनिराळ्या राष्ट्रांत चाललेल्या सामाजिक क्रांतीच्या प्रयोगांचें महत्त्व हिंदुस्थानांतील लोकांना समजावून देण्याची कामगिरी त्यांनीं कसोशीनें पार पाडली. राष्ट्रीय चळवळींतील एकजूट टिकविण्यासाठीं जरी त्यांनीं कॉंग्रेसमधील ज्येष्ठ नेत्यांशीं वारंवार जुळतें घेतलें, तरी तत्त्वप्रतिपादनांत त्यांनीं नेहमीच सडेतोडपणा ठेवला. जगाचे व भारताचे प्रश्न समाजवादानेंच सुटतील याबद्दल त्यांना मुळींच संदेह नव्हता. पण समाजवादाच्या कल्पनेसंबंधीं आपल्या लोकांच्या मनांत खूप गोंधळ आहे असें त्यांना दिसून आलें. म्हणून 'समाजवाद ही एक विशिष्ट अर्थव्यवस्था आहे. मी जेव्हां समाजवाद हा शब्द वापरतों, तेव्हां तो मोघम मानवतावादी अर्थानें न वापरतां शास्त्रीय काटेकोरपणानेंच वापरतों असा त्यांनीं बुद्धिपुरःसर खुलासा केला आहे. †

अशा प्रकारें नेहरूंनीं लेख, भाषणें, ठराव आणि विचारविनिमय यांच्या द्वारें राष्ट्रसभेच्या धोरणाला समाजवादी वळण लावण्याची पराकाष्ठा केली. राष्ट्रसभेची चळवळ ही मुख्यतः सत्ताग्रहणावरच केंद्रित झाली असल्यामुळें आश्वासनपर ठरावांची अंमलबजावणी करण्याचा प्रश्न एकदम उपस्थित होण्याचा संभव नव्हता. म्हणून नेहरूंचें व्यक्तिमत्त्व व लोकप्रियता लक्षांत घेऊन कॉंग्रेस-मधील उजव्या गटाच्या कार्यकर्त्यांनीं विशेष घासाघीस न करतां या ठरावांतील तत्त्वांना मान्यता दिली. राष्ट्रसभेच्या कार्यक्रमास मुक्तहस्तानें साह्य करणारा हिंदी भांडवलदार वर्ग चांगलाच सुसंघटित होता. उलट तिच्यावर दडपण

---

vested interests. The whole world is struggling to this end; India can do no less, and in this way the Indian struggle for freedom lines up with the world struggle. " ibid, p. 60.

† " I am convinced that the only key to the solution of the world's problems and of India's problems lies in Socialism, and when I use this word I do so not in a vague humanitarian way but in the scientific, economic sense. Socialism is, however, something even more than an economic doctrine; it is a philosophy of life and as such also it appeals to me. " ibid, p. 82.

आणूं इच्छिणाऱ्या कामगारसंघटना अजून बाल्यावस्थेंत होत्या. प्रांतिक स्वायत्ततेच्या काळांत कॉंग्रेस मंत्रिमंडळांनीं कांहीं लोकहिताचे कायदे पास केले खरे; परंतु त्यामुळें कॉंग्रेससंस्थेचा आशय बिलकुल बदलला नाहीं, तिच्यांतील धनिकांचें वर्चस्व कमी झालें नाहीं, किंवा कॉंग्रेसकार्यकर्त्यांच्या आचारविचारांतील मध्ययुगीन मूल्यांचेंहि उच्चाटन झालें नाहीं. सर्वसामान्य जनतेंत समाजवादाबद्दल कुतूहल निर्माण करण्यांत मात्र नेहरूंना बरेंच यश लाभलें.

## कॉंग्रेस समाजवादी पक्ष

सन १९३२ ची कायदेभंगाची चळवळ मागें घेतल्यानंतर राष्ट्रसभेंतील जुनें नेतृत्व हळुहळू पुन्हा सनदशीरपणाकडे झुकूं लागलें. राजकारणांतून निवृत्त होऊन गांधीजी पूर्वीप्रमाणें विधायक कार्यक्रमांत मग्न झाले. त्यामुळें जहाल मनोवृत्तीच्या नव्या पिढींत राष्ट्रसभेची मतप्रणालि व कार्यक्रम याबद्दल असमाधान उत्पन्न झालें. आत्मक्लेशाच्या जोरावर वरिष्ठ वर्गाचा हृदयपालट घडवून आणून सामाजिक व आर्थिक समस्या सोडवूं पाहणारा गांधीजींचा सत्याग्रहाचा मार्ग त्यांना अपुरा वाटूं लागला. जागतिक मंदीच्या पार्श्वभूमीवर रशियांतील पहिल्या पंचवार्षिक योजनेचें यश जास्तच उठून दिसत होतें. म्हणून नुसत्या राजकीय स्वातंत्र्यावर संतुष्ट न राहतां समाजसत्तावादाचें ध्येय डोळ्यापुढें ठेवून वर्गसंघटनेचा पुरस्कार करणाऱ्या कॉंग्रेस समाजवादी पक्षाची १९३४ सालीं स्थापना झाली. संपूर्ण स्वातंत्र्याची प्राप्ति आणि समाजवादी व्यवस्थेची स्थापना असें दुहेरी उद्दिष्ट ह्या पक्षानें आपल्या घटनेंत नमूद केलें आहे. त्यापैकीं स्वातंत्र्य-संपादनाची जबाबदारी राष्ट्रसभेनेंच शिरावर घेतली होती. मात्र ब्रिटिश साम्राज्यांतून फुटून बाहेर पडल्याशिवाय भारतास खरेखुरें स्वातंत्र्य मिळणार नाहीं असा समाजवादी पक्षाचा ठाम निर्णय होता. गेल्या पन्नास वर्षांत कॉंग्रेसनें केलेल्या अनेक राजकीय चळवळींमुळें तिच्याबद्दल लोकांच्या मनांत निष्ठा उत्पन्न झालेली होती. तेव्हां राष्ट्रसभेच्या निशाणाखालींच साम्राज्यशाहीशीं अखेरचा लढा देतां येईल हें या पक्षाच्या पुढाऱ्यांना

कळून चुकलें होतें. म्हणून काँग्रेसमध्यें राहूनच आपल्या मतप्रणालीला लोकमत अनुकूल करून घेण्याचें त्यांनीं ठरविलें. मात्र परकीयांचें राजकीय व आर्थिक आक्रमण थोपवून एतद्देशीय वरिष्ठ वर्गांनीं चालवलेल्या बहुजन समाजाच्या पिळणुकीस आळा घालावयाचा असेल तर राष्ट्रसभेंतील डाव्या प्रवृत्ति जोरकस करून काँग्रेसचें एका मोठ्या साम्राज्यशाहीविरोधी आघाडींत रूपांतर करणें जरूर आहे. त्यासाठीं कनिष्ठ मध्यमवर्ग, शेतकरी व कामगार यांना मार्क्सप्रणीत समाजवादाची दीक्षा देऊन वर्गवादी पायावर त्यांच्या संघटना उभारल्या पाहिजेत व राष्ट्रसभेंत त्यांचा समावेश करून घेतला पाहिजे असें त्यांचें मत होतें. त्यासाठीं श्रमजीवी वर्गाच्या हातांत सत्ता मिळवून तिच्या बळावर पोलाद, कापड, ताग, रेल्वे, जलवाहतुक, बँका आणि विमाकंपन्या इत्यादि महत्त्वाच्या उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण करणें, परदेशी व्यापाराचा मक्ता सरकारकडे घेणें, संस्थानिकांचीं राज्यें, जमीन-दारांच्या जमिनी व इतर सत्ताधारी वर्गांचे वंशपरंपरागत अधिकार नुकसान-भरपाई न देतां खालसा करणें, जमिनीचें फेरवांटप करून सामुदायिक शेतीला प्रोत्साहन देणें, आणि प्रत्येकाला व्यवसायाची आणि उपजीविकेची हमी देणें इत्यादि बाबींचा त्यांनीं आपल्या कार्यक्रमांत समावेश केला होता. तसेंच मुद्रण, भाषण व संघटना यांवरील निर्बंध दूर व्हावेत, राष्ट्रविरोधी व कामगारविरोधी कायदे रद्द करण्यांत यावेत, विनाचौकशी तुरुंगांत डांबलेल्या राजकीय कैद्यांची मुक्तता करावी, आणि लष्करी खर्चांत कपात करण्यांत यावी अशा त्यांच्या किमान मागण्या होत्या. अधिकारस्वीकारानंतर काँग्रेसमध्यें बळावत चाललेल्या सनदशीरपणाच्या प्रवृत्तीला कसून विरोध करून निकराच्या स्वातंत्र्यसंग्रामासाठीं जनतेची तयारी करण्याचा आणि प्रांतिक राज्यकारभारांत मिळालेल्या सत्तेचा वरिष्ठ वर्गाच्या दडपणाखालीं दुरुपयोग होऊं नये म्हणून आपल्या सामाजिक व राजकीय हक्कांची लोकांना सतत जाणीव करून देण्याचा त्यांनीं प्रयत्न केला.

हिंदुस्थानांतील मार्क्सवादी गटांना एकत्र आणून त्यांच्या दैनंदिन कार्यक्रमांतील सहकार्यातून एक संयुक्त समाजवादी पक्ष उभारण्याची काँग्रेस समाजवादी पक्षाच्या पुढाऱ्यांना उत्कंठा होती. म्हणून पहिल्यापासून त्यांनीं

काँग्रेसमध्यें समाविष्ट झालेल्या किंवा काँग्रेसबाहेर असलेल्या समाजवादी प्रवृत्तीच्या सर्व कार्यकर्त्यांना आपल्या पक्षांत सामावून घेण्याचें किंवा त्यांच्या पक्षाबरोबर एकदिलानें काम करण्याचें धोरण आंखलें. डाव्यांच्या एकजुटी-साठीं केलेल्या या आवाहनाचें तत्परतेनें स्वागत करून रॉयिस्ट व कम्युनिस्ट अशा दोन्ही मताचे बरेच कार्यकर्ते त्यांना येऊन मिळाले. परंतु मार्क्सवादाच्या तत्त्वावर सर्वांची श्रद्धा असली तरी त्यांच्या धोरणांत व कार्यपद्धतींत खूपच तफावत असल्यामुळें त्यांना फार काळ सलोख्यानें एकत्र नांदतां आलें नाहीं. सद्यस्थितींत राष्ट्रसभेंत डाव्यांनीं स्वतंत्र पक्ष म्हणून काम करणें संघटनेच्या व मतप्रचाराच्या दृष्टीनें इष्ट नाहीं असें रॉय यांचें मत होतें. पण समाजवादी पक्षास तें न मानवल्यामुळें रॉय यांचे अनुयायी या आघाडींतून प्रथम बाहेर पडले. कम्युनिस्टांचें राष्ट्रसभेच्या बाबतींतील धोरण घरसोडीचें होतें. राष्ट्रसभे-मध्यें प्रतिष्ठा मिळविण्याचा खात्रीचा उपाय म्हणून त्यांनीं काँग्रेस समाजवादी पक्षांत प्रवेश केला. पण राष्ट्रसभा ही भांडवलदारधार्जिणी आहे असा त्यांचा ग्रह कायम असल्यानें ते व काँग्रेसनिष्ठ समाजवादी यांच्यामध्यें परस्पर-विश्वासाचें वातावरण कधींच निर्माण झालें नाही. तरी देखील १९३४ पासून ४० पर्यंत कम्युनिस्टांशीं सहकार्य करण्याचें हें धोरण त्यांनीं कसेबसें चालू ठेवलें. त्यानंतर मात्र समाजवादी पक्षांच्या एकजुटीची कल्पना फलद्रूप होण्याची बिलकुल शक्यता नाहीं अशी काँग्रेस समाजवादी पक्षाची खात्री पटली; आणि समाजवादाच्या प्रसारासाठीं स्वतंत्रपणें काम करण्याचा त्यांनीं निश्चय केला.

१९४२ च्या चळवळींत राष्ट्रसभेंतील सर्व जुने पुढारी पकडले जातांच स्वातंत्र्यलढ्याच्या नेतृत्वाची जबाबदारी या नव्या कार्यकर्त्यांवर येऊन पडली. भूमिगत प्रचारानें सर्वसामान्य जनतेचा पाठिंबा मिळवून सार्वत्रिक उठावणी करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. मोर्चे-मिरवणुका यांसारखीं निदर्शनें करून किंवा वाहतुकीच्या मार्गांत अडथळे आणून जनतेच्या प्रक्षुब्ध भावनांना त्यांनीं वाट करून दिली. मात्र योजनाबद्ध कार्यक्रमाचा अभाव, निषेधपर कृत्यांवर भर आणि संघटनेंतील शिथिलता यांमुळें ही चळवळ दडपून टाकण्यास ब्रिटिश सरकारला फार प्रयास पडले नाहींत. सरकारच्या

दडपशाहीमुळें जरी सामुदायिक प्रतिकाराची चळवळ लवकरच संपुष्टांत आली, तरी ह्या पक्षाच्या बऱ्याच कार्यकर्त्यांनीं वैयक्तिक साहसाचीं व शौर्याचीं अनेक कृत्यें करून स्वातंत्र्यलढ्याचें सातत्य कायम राखलें; आणि अत्यंत प्रतिकूल परिस्थितींतहि जनतेंत नैराश्य व विकलता पसरूं दिली नाहीं.

समाजवादी कार्यकर्त्यांचा हा निर्भयपणा, स्वार्थत्याग आणि पराक्रम यामुळें त्यांच्या पक्षाबद्दल लोकांच्या मनांत आपुलकी उत्पन्न झाली; परंतु पक्षाच्या संघटनेच्या व प्रगतीच्या दृष्टीनें या लोकप्रियतेचा त्यांना उपयोग करून घेतां आला नाहीं. साम्राज्यशाहीच्या टांचेखालीं चिरडल्या जाणाऱ्या राष्ट्रांची पहिली गरज राजकीय स्वातंत्र्य आहे. त्यासाठीं निरनिराळे वर्ग आणि प्रवृत्ति यांनीं आपले मतभेद कांहीं काळ बाजूला ठेवून परकीय शत्रूविरुद्ध स्वातंत्र्य-चळवळींत सहकार्य करावयास हवें हें त्यांचें म्हणणें रास्त होतें. पण भिन्न हितसंबंध व मनोवृत्ति असलेल्या वर्गांमधील ही एकजूट सत्तांतरानंतर तशीच टिकून राहणें शक्य नव्हतें. अशा वेळीं बहुसंख्य जनतेच्या त्यागामुळें हातीं आलेली राजकीय सत्ता कांहीं मूठभर धनिकांना स्वतःच्या हितासाठीं राबवितां येऊं नये म्हणून वर्गवादी पायावर बहुजनसमाजाच्या कार्यक्षम संघटना उभारणें जरूर होतें. पण स्वातंत्र्यपूर्व काळांतील ह्या जबाबदारीची समाजवादी पक्षाच्या नेत्यांना जाणीव असूनहि त्यांच्या विचारांतील व कार्यपद्धतींतील विस्कळीतपणामुळें ती त्यांना पार पाडतां आली नाहीं. त्यांच्यापैकीं बहुतेकांवर गांधीजींच्या अध्यात्मनिष्ठ मानवतावादाचे संस्कार होते. दैनंदिन कार्यांत शिस्तपालनासाठीं जुन्या नेतृत्वाशीं वारंवार जुळतें घेणें त्यांना भाग होतें. म्हणून वर्गसमन्वयाच्या पलीकडे जाऊन स्वतंत्रपणें वर्गवादी धोरण अवलंबिणें त्यांना शक्य झालें नाहीं. त्यामुळें शेतकरी व कामगार हे दोन्ही वर्ग या पक्षापासून अलिप्त राहिले. त्यांच्या वर्गवादी धोरणामुळें जमीनदार व भांडवलदार त्यांच्याबद्दल साशंक होते. म्हणून राष्ट्रसभेतील अंतर्गत झगड्यांत आपल्या मागें कोणतीहि स्वतंत्र शक्ति त्यांना उभी करतां आली नाहीं. शिवाय सर्वोदयवाद आणि समाजवाद यांच्यांतील नेमका भेद स्पष्ट करण्याची त्यांनीं खबरदारी घेतली नाहीं. समाजवादाची परिभाषा जरी सदोदित त्यांच्या तोंडीं असली, तरी कृतीच्या बाबतींत जहाल

राष्ट्रवाद्यांहून ते कोणत्याच दृष्टीनें वेगळे नव्हते. म्हणून आपल्या मतांची व मार्गांची श्रेष्ठता लोकांना पटवून देऊन राष्ट्रसभेंत बहुमत मिळविण्यांत ते अपेशी ठरले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तर अल्पमतवाल्यांचा पक्ष म्हणून राष्ट्रसभेंतून बाहेर पडण्याची त्यांच्यावर पाळी आली.

## राष्ट्रसेवादल

दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभीं महाराष्ट्रांतील मध्यमवर्गीयांचा लोकशाहीवरील विश्वास ढळून ते हुकूमशाहीच्या विजयाकडे आशेनें पाहूं लागले. त्यामुळें राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या प्रसाराला बराच जोर चढला. संघस्वयंसेवकांचा उत्साह, शिस्तप्रियता, आणि बेगुमानपणा पाहून कॉंग्रेसपुढाऱ्यांचीं मनें चिन्ताक्रान्त झालीं. हुकूमशाहीकडे झुकणाऱ्या संघाच्या या प्रतिगामी प्रवृत्तीस आळा घालण्यासाठीं राष्ट्रसभेंतील कांहीं समाजवादी कार्यकर्त्यांनीं सन १९४१ मध्यें 'राष्ट्र सेवा दला'ची स्थापना केली. तत्पूर्वी 'हिंदुस्थानी सेवादल' आणि 'कॉंग्रेस सेवादल'यांच्या निमित्तानें राष्ट्रसभेमध्यें स्वतंत्र स्वयंसेवक संघटना काढण्याचे कांहीं प्रयत्न झाले होते. पण तरुणांच्या शिस्तबद्ध संघटनेमध्यें हिंसक प्रवृत्ति बळावून राष्ट्रसभेच्या अहिंसेच्या तत्त्वाला कदाचित बाध येईल अशा भीतीनें कॉंग्रसश्रेष्ठींनीं या संघटनांना कधीं उत्तेजन दिलें नाहीं. पण तरुणांमध्यें जातिवादाचा व लोकशाहीविरोधी तत्त्वांचा फैलाव होत असलेला दिसून येतांच राष्ट्रसभेच्या नेत्यांना राष्ट्रवादी स्वयंसेवक संघटनेची आवश्यकता पटूं लागली; आणि १९४२ सालीं महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें राष्ट्रसेवादलाच्या कार्याला अधिकृतपणें मान्यता दिली. धर्मातीत राष्ट्रवादाच्या व जनसेवेच्या कल्पना विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबवून त्यांना राष्ट्रकार्यास प्रवृत्त करण्याकडे राष्ट्रसेवादलानें विशेष लक्ष पुरविलें. १९४२ सालीं राष्ट्रसभेच्या आदेशानुसार जी स्वातंत्र्यचळवळ सुरू झाली, तिच्यामध्यें सेवादलाच्या बऱ्याच सैनिकांनीं बेधडक उडी घेतली. त्यामुळें सेवादलाच्या कार्यास पुष्कळच उठाव मिळाला; आणि महाराष्ट्रांतल्या अनेक शहरांमध्यें सेवादलाच्या शाखा स्थापन झाल्या. सांघिक कवाईत व गीतें, अभ्यासमंडळें आणि शिबिरें इत्यादि कार्यक्रमांतून तरुण पिढीच्या

मनावर राष्ट्रीय संस्कार घडविण्याची दलाच्या कार्यकर्त्यांनीं खटपट केली. परंतु कॉंग्रेसमधील वरिष्ठ नेत्यांचा रोष ओढवून घेण्याची दलप्रमुखांची इच्छा नव्हती. म्हणून सेवादलाच्या कार्यक्रमास निश्चितपणें समाजवादी तत्त्वज्ञानाची बैठक देण्याचें त्यांनीं कटाक्षानें टाळलें. त्यामुळें या संस्थेच्या नित्यनैमित्तिक कार्यक्रमास आधुनिक कर्मकांडाचें स्वरूप प्राप्त झालें. म्हणून विद्यार्थीवर्गात राष्ट्रीयत्वाची व लोकाभिमुखतेची भावना निर्माण होण्यास कांहीं प्रमाणांत जरी सेवादल कारणीभूत झालें, तरी ही संस्था महाराष्ट्रीय तरुणांच्या विचारांस नवें वळण लावण्यास असमर्थ ठरली.

## सत्याग्रही समाजवाद

कॉंग्रेस समाजवादी पक्षाच्या सभासदांनीं आपल्या तत्त्वज्ञानाच्या प्रसारासाठीं फारसे परिश्रम घेतले नाहींत, तरी त्यांच्या भूमिकेची सहानुभूतीनें व समरसतेनें चिकित्सा करणारे महाराष्ट्रांतील एक थोर विचारवंत आचार्य जावडेकर यांनीं राष्ट्रवाद व समाजवाद यांचा समन्वय साधण्याचा निष्ठेनें प्रयत्न केला. भारतीय राजकारणांतील तत्त्वचर्चेची उणीव जावडेकरांनीं आपल्या विचारप्रवर्तक लेखनानें अंशतः भरून काढली आहे. १९२० नंतरच्या काळांत जुन्या परंपरेंतील कांहीं पुढारी गांधीजींच्या अनुयायांवर अंधश्रद्धेचा व प्रवाहपतितत्वाचा आरोप करीत होते. युक्तिवादानें या आक्षेपांचें खंडन करून आपल्या मतप्रणालीची तर्कशुद्ध मांडणी करण्याऐवजीं ग्रंथगत ज्ञानाची व विचारविनिमयाची उपेक्षा करण्याची वृत्ति गांधीवाद्यांमध्यें बळावत होती. अशा वेळीं जावडेकरांनीं राज्यशास्त्र व तत्त्वज्ञान यांमधील सिद्धान्तांच्या प्रकाशांत आधुनिक भारतांतील राजकीय चळवळींचें व सामाजिक प्रवृत्तींचें परिशीलन केलें; आणि गांधीवादांतील मौलिकता व प्रगमनशीलता लोकांच्या निदर्शनास आणून दिली. गांधीवादांतील गूढता व कर्मठपणा हीं त्यांच्या बुद्धिनिष्ठेस मानवली नाहींत; उलट समाजवादाची शास्त्रशुद्ध विचारसरणी त्यांना अधिक निर्दोष व श्रेयस्कर वाटली. मात्र जुने अध्यात्मवादी संस्कार अजिबात सोडून देणें त्यांना शक्य झालें नाहीं. म्हणून समाजवादांतील वस्तुनिष्ठा, ऐतिहासिक दृष्टि व वर्गविहीन समाजरचनेचें उद्दिष्ट आणि गांधीवादांतील आत्मप्रामाण्य, साधनशुचिता व सर्वोदय यांचा मेळ घालून त्यांनीं सत्याग्रही

समाजवादाचें नवें तत्त्वज्ञान मांडलें. पण या दोन्ही विचारप्रणालींतील मूलभूत विरोधाकडे त्यांनीं डोळेझांक केल्यामुळें त्यांच्या विवेचनांत शास्त्रशुद्धतेपेक्षां स्वप्नाळूपणाच जास्त आला आहे. देशांतील राजकीय वातावरण या समन्वयशील सदिच्छावादाला पोषकच होतें. पण कॉंग्रेस कार्यकर्त्यांमधील तत्त्व-जिज्ञासेच्या अभावामुळें जावडेकरांना येथें फारसे अनुयायी मिळाले नाहींत.

## मानवेंद्रनाथ रॉय

हिंदुस्थानांतील वर्गवादी पक्षांमध्यें मानवेंद्रनाथ रॉय यांच्या ‘ रॅडिकल डेमोक्रॅटिक पक्षा’चीहि आपणांस गणना करावी लागेल. रॉय १९३० सालीं हिंदुस्थानांत परत आले. तत्पूर्वी कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे एक पुढारी म्हणून त्यांनीं निरनिराळ्या देशांतील समाजवादी चळवळींत अनेक वर्षें काम केलें होतें. १९२० सालीं भरलेल्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या दुसऱ्या परिषदेंत ‘वसाहतींतील राष्ट्रवादी चळवळी’ हा विषय चर्चेला निघाला होता. त्यावेळीं साम्राज्यवादी राष्ट्रें व वसाहती या दोन ठिकाणच्या भांडवलदार वर्गांतील हितविरोधामुळें वसाहतींतील भांडवलदारवर्ग तेथील स्वातंत्र्य-संपादनाच्या चळवळींत आघाडीवर राहील असें मत लेनिननें मांडलें होतें. रॉय यांनीं लेनिनच्या या मताला विरोध केला. पहिल्या महायुद्धानंतर बदललेल्या जागतिक परिस्थितींत साम्राज्यवादी राष्ट्रें आणि वसाहती यांमधील भांडवलदारवर्गांच्या हितसंबंधांतील विरोध हळुहळू कमी होत आहे. म्हणून परतंत्र राष्ट्रांतील कारखानदारवर्ग साम्राज्यशाहीशीं समझोता करून सत्तेमध्यें वांटा मिळवील; आणि स्वदेशांतील पुरोगामी शक्ति दडपून टाकण्याचा प्रयत्न करील असें रॉय यांचें म्हणणें होतें. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या त्या अधिवेशनांत लेनिन व रॉय या दोघांचेहि प्रबंध मान्य केले गेल्यामुळें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळींत भांडवलदारवर्गाचें नेमकें स्थान कोणतें हा प्रश्न अनिर्णीतच राहिला. त्यानंतर १९२७ सालीं या बाबतींत अधिक संशोधन करण्यासाठीं इंटरनॅशनलच्या पुढाऱ्यांनीं एक समिति नेमली. तिच्यापुढें रॉय यांनीं सादर केलेला निबंध ‘ निर्वसाहतीकरणाचा सिद्धान्त ’ या नांवानें प्रसिद्ध आहे.

लेनिननें आपल्या ‘ साम्राज्यशाही ’ या पुस्तकांत जे सिद्धान्त मांडले आहेत, त्यांना धरूनच रॉयनीं आपल्या विचारांची जुळणी केली होती. भांडवलदारी अर्थव्यवस्थेच्या विकासाबरोबर कारखानदारवर्गाच्या हातांत भांडवलाचा संचय होत जातो. हें अतिरिक्त भांडवल देशांतच राहिल्यास भांडवलदारांच्या आपापसांतील स्पर्धेमुळें नफ्याचे दर कमी कमी होत जाण्याचा धोका असतो. तो टाळण्यासाठीं साम्राज्यवादी राष्ट्रांतील भांडवलदार या सांठलेल्या अतिरिक्त भांडवलाची वसाहतीमध्यें निर्यात करतात. अशा रीतीनें भांडवलशाहीचा अंतर्गत ऱ्हास थोपवून धरण्याची त्यांची धडपड असते. वसाहतींमध्यें कच्च्या मालाचें उत्पादन वाढविण्यासाठीं आणि दळणवळणाचीं साधनें बांधून बाजारपेठा निर्माण करण्यासाठीं या भांडवलाचा उपयोग केला जातो. परंतु आपल्या देशांतील मालाशीं स्पर्धा करील असा पक्का माल साम्राज्यवादी राष्ट्रें वसाहतींमध्यें कधींच पैदा होऊं देत नाहींत. वसाहतींतील लोकांची पिळणूक करून आपली सत्ता टिकवून धरणें हेंच त्यांच्या आर्थिक व्यवहाराचें मुख्य सूत्र असतें, असे विचार लेनिननें या आपल्या वरील पुस्तकांत प्रतिपादिले आहेत.

युद्धपूर्वकालांतील साम्राज्यवादी राष्ट्रांच्या आर्थिक व राजकीय धोरणाची लेनिननें केलेली ही मीमांसा रॉयना संमत होती. परंतु पहिल्या महायुद्धामुळें निर्माण झालेल्या परिस्थितींत साम्राज्यवादी राष्ट्रें आणि त्यांच्या वसाहती यांचे परस्परसंबंध बदलले आहेत. युद्धकालांत व तदनंतर इंग्लंडमध्यें भांडवलाचा होणारा संचय व त्याची निर्यात ही हळुहळू कमी होऊं लागली आहे. तसेंच जागतिक बाजारपेठेंत अमेरिका, जपान, जर्मनी इत्यादि अनेक प्रगत राष्ट्रांशीं टक्कर देण्याची इंग्लंडवर पाळी आली आहे. त्यामुळें आपलीं देणीं भागविण्यासाठीं हिंदुस्थानच्या निर्यात व्यापाराचा अधिकाधिक उपयोग करून घेणें इंग्रज भांडवलदारांना भाग पडत आहे. यापुढें हिंदुस्थानच्या औद्योगीकरणाला विरोध करण्याऐवजीं त्याला हातभार लावण्यांतच इंग्रज भांडवलदारांचें खरें हित आहे. म्हणून हिंदुस्थानला वसाहतीच्या स्वराज्याचे अधिकार व दर्जा देण्यास त्यांचा विरोध होणार नाहीं. मात्र या राजकीय सत्तासंक्रमणानें दलित वर्गावरील

भार मुळींच कमी होणार नाहीं. म्हणून त्यांच्या जीवनांतील आर्थिक व सामाजिक समस्या सोडविण्यासाठीं देशांतील सर्व क्रांतिकारक शक्तींना एकत्र आणून साम्राज्यशाहीविरोधी आघाडी उभारणें हेंच सध्यां हिंदुस्थानांतील वर्गवाद्यांचें पहिलें कर्तव्य आहे असा रॉय यांच्या विवेचनाचा सारांश होता.

रॉय यांचे कांहीं निष्कर्ष स्थूलमानानें खरे ठरले आहेत. परंतु कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या १९२८ सालीं झालेल्या अधिवेशनांत त्यांना मान्यता मिळाली नाहीं. त्यामुळें लवकरच त्यांना या संस्थेंतून बाहेर पडावें लागलें. नंतर ते हिंदुस्थानांत आले. परंतु त्यांच्या क्रांतिकारक पूर्वायुष्यामुळें इंग्रज-सरकारनें त्यांना लवकरच तुरुंगांत डांबलें. सहा वर्षांचा कारागृहवास भोगल्यानंतर १९३६ सालीं त्यांची मुक्तता झाली. कम्युनिस्टांशीं पूर्वीपासून मतभेद झाल्यामुळें राष्ट्रसभेंत नव्यानें निर्माण झालेला समाजवादी पक्ष त्यांना अधिक जवळचा वाटला. मात्र या पक्षानें समोर ठेवलेल्या समाजवादी कार्यक्रमास देशांतील परिस्थिति अनुकूल नाहीं असेंच त्यांना वाटत होतें. हिंदुस्थानांत कामगारवर्ग अतिशय अल्पसंख्य असल्यानें कामगारक्रांतीच्या ध्येयाची घोषणा येथें व्यवहार्य ठरणार नाहीं. म्हणून सर्व श्रमिक वर्गांना सामावून घेणारें लोकशाही क्रांतीचें ध्येयच डोळ्यासमोर ठेवून झटणें हेंच समाजवादाच्या प्रगतीच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर आहे असें रॉय यांचें म्हणणें होतें. परंतु कॉंग्रेस समाजवादी पक्षामध्यें त्यांच्या या विचारसरणीला कधींच मान्यता मिळाली नाहीं.

कॉंग्रेसनें जीं ध्येयें स्वीकारलीं आहेत त्यांच्या सिद्धीसाठीं तिला लोकशाही क्रांतीचा कार्यक्रमच स्वीकारावा लागेल अशी रॉय यांची खात्री होती. म्हणून आर्थिक मागण्यांच्या द्वारें जनसमित्यांची स्थापना करण्यांत यावी आणि जनतेचें बळ पुरेसें वाढल्यावर इंग्रज सरकारवर अवलंबून न राहतां राष्ट्रसभेनें स्वतःच घटना समितीची स्थापना करावी असा कार्यक्रम त्यांनीं राष्ट्रसभेपुढें मांडला. त्याच्या प्रसारासाठीं त्यांनीं ‘ लीग ऑफ रॅडिकल कॉंग्रेसमेन ’ ही संस्था स्थापन केली; व ‘ इंडिपेंडंट इंडिया ’ नांवाचें वर्तमान पत्रहि सुरू केलें.

दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर काँग्रेसच्या अधिकृत धोरणाशीं रॉय यांचे असलेले मतभेद विकोपास गेले. हें युद्ध म्हणजे दोन साम्राज्यवादी राष्ट्रांमध्यें केवळ बाजारपेठांसाठीं चाललेली लढाई नव्हे. त्यामुळें साऱ्या मानवजातीचें भवितव्य संकटांत आलें आहे. स्वातंत्र्याच्या दृष्टीनें जगानें आतांपर्यंत जी प्रगति केली ती सर्व फुकट जाऊन कालाचें चक्र मागें फिरण्याचा धोका उत्पन्न झाला आहे. तो टाळण्यासाठीं प्रत्येक देशांतील पुरोगामी शक्तींनीं एकत्र येऊन प्राणपणानें हुकूमशाहीशीं झुंज दिली पाहिजे अशी त्यांची भूमिका होती. या युद्धांत लोकशाही राष्ट्रांचा विजय झाल्यानें इंग्लंडची हिंदुस्थानवरील पकड मजबूत होण्याचा बिलकुल संभव नाहीं. उलट पहिल्या महायुद्धानें सुरू केलेलें भांडवलशाहीच्या विनाशाचें कार्य दुसऱ्या महायुद्धामुळें तडीस जाईल; आणि हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठीं अनुकूल अशी पार्श्वभूमि आपोआप तयार होईल अशी रॉय यांची विचारसरणी होती.

महायुद्धाच्या प्रारंभीं ब्रिटिशांच्या साम्राज्यशाहीबद्दल हिंदी जनतेला वाटणारा द्वेष इतका तीव्र होता कीं हुकूमशाही राष्ट्रांच्या विजयामुळें खेद होण्याऐवजीं येथील लोकांना उलट आनंदाच्या उकळ्या फुटत. अशा परिस्थितींत रॉय यांचें युद्धसहकार्याचें धोरण बहुसंख्य लोकांना पटणें शक्य नव्हतें. म्हणून काँग्रेसमधून बाहेर पडून १९४० सालीं त्यांनीं रॅडिकल डेमोक्रॅटिक पक्षाची स्थापना केली. याच भूमिकेवरून १९४२ च्या चळवळीसहि त्यांनीं विरोध केला. त्यामुळें त्यांच्या पक्षाबद्दल राष्ट्रवाद्यांमध्यें कांहीं काळ अप्रीति निर्माण झाली. युद्धाच्या अखेरीस मात्र रॉय यांचा कल वर्गवादाकडून हळुहळू व्यक्तिवादाकडे झुकूं लागला; आणि पक्षनिष्ठ राजकारण लोकशाहीच्या तत्त्वास बाधक आहे अशा भावनेनें त्यांनीं १९४८ सालीं आपल्या पक्षाचें विसर्जन केलें.

स्वतंत्र प्रज्ञेचे एक बुद्धिवादी विचारवंत म्हणून रॉय यांना हिंदुस्थानच्या आधुनिक इतिहासांत श्रेष्ठ दर्ज्याचें स्थान आहे यांत मुळींच शंका नाहीं. भौतिकवाद, बुद्धिवाद आणि मानवतावाद या मूल्यांवर त्यांची दृढ श्रद्धा होती. गांधीप्रणीत अध्यात्मवादाची जनमनावरील पकड कायम असतांना लोकमताचा रोष ओढवून घेऊनहि आपल्या मूल्यांचा रॉय यांनीं निर्भयतेनें

प्रचार केला. त्यांची सूक्ष्म बुद्धिमत्ता, गाढ व्यासंग, आणि आंतरराष्ट्रीय राजकारणाचा अनुभव यांमुळें अनेक बुद्धिमान् कार्यकर्त्यांवर त्यांची छाप पडली. मात्र हिंदुस्थानांतील भांडवलदारवर्गाच्या हितसंबंधांचें जरी त्यांनीं वर्गवादी दृष्टिकोनांतून शास्त्रशुद्ध विवेचन केलें, तरी येथील मध्यमवर्गाच्या विशिष्ट परिस्थितीची व मनोवृत्तीची त्यांना नीट पारख झाली नाहीं. म्हणून अठराव्या शतकांतील युरोपच्या इतिहासाचा आधार घेऊन हिंदुस्थानांतहि वैचारिक क्रांतीसाठीं त्यांनीं मध्यमवर्गावरच भिस्त ठेवली. म्हणून विचारानें जरी ते लोकांच्या जवळ होते तरी ज्यामुळें सर्वसामान्य जनतेला उत्साह वाटेल असा कोणताच कार्यक्रम त्यांना हातीं घेतां आला नाहीं. पुढें पुढें तर त्यांच्या वर्गवादांतहि व्यक्तिवादी प्रवृत्ति प्रबळ झाल्या आणि त्यांतून नवमानवतावादाचें तत्त्वज्ञान जन्मास आलें. पण ज्या कारणामुळें आगरकरांच्या बुद्धिवादी विचारसरणीचा महाराष्ट्रांत पराभव झाला तींच कारणें रॉय यांच्या अपयशालाहि जबाबदार आहेत.

## राष्ट्रवाद, जातिवाद आणि वर्गवाद

अशा प्रकारें राष्ट्रवाद, जातिवाद आणि वर्गवाद या तीन प्रवृत्तींच्या परस्परसंबंधांतून आपल्या सामाजिक जीवनाला आजचा विशिष्ट आकार प्राप्त झालेला आहे. वास्तविक पाहतां राष्ट्रवादाप्रमाणेंच जातिवाद म्हणजेहि एकादें स्वयंपूर्ण तत्त्वज्ञान नसून सामाजिक प्रश्नांकडे पाहण्याचा तो एक परंपरागत दृष्टिकोन आहे. मात्र आधुनिक युगांतील राजकीय घडामोडी व आर्थिक व्यवहार प्रामुख्यानें राष्ट्रसंस्थेच्या माध्यमांतून चालत असल्यानें राष्ट्रवादी विचारसरणीला जसा वस्तुस्थितीचा आधार आहे, तसा तो जातिवादी विचार-संप्रदायास नाहीं. जातिसंस्था ही हिंदु समाजव्यवस्थेंतील जरी प्राणभूत व पुरातन संस्था असली तरी सध्यांच्या उद्योगप्रधान समाजजीवनांत तिला स्वयंपूर्ण घटकाचें स्थान उरलेलें नाहीं. म्हणून हिंदी राजकारणांतील जातिवाद हा मृतकल्प मध्ययुगीन व्यवस्थेचा व विचारप्रणालीचा जीर्ण अवशेष आहे असें म्हणावें लागतें. त्याच्या योगानें समाजांतील मूलभूत प्रश्न मागें पडून नको त्या ठिकाणीं लोकांच्या प्रतिकारशक्तीचा अपव्यय होत आहे. मध्ययुगीन व्यवस्थेशीं ज्यांचे हितसंबंध निगडीत आहेत अशा कांहीं

व्यक्तींचा किंवा गटांचा या जातीय वृत्तीमुळें जरी तात्पुरता फायदा झाला, तरी सर्वसामान्य जनतेच्या प्रगतीच्या मार्गांतील ती एक अवाढव्य धोंड आहे.

जातिसंस्था आणि ग्रामसंस्था यांच्या परस्परसहकार्यावर हिंदुस्थानांतील जुनी समाजव्यवस्था शतकानुशतकें उभी होती. ग्रामसंस्थेंत प्रत्येक जातीचे अधिकार आणि कर्तव्यें परंपरेनें ठरलेलीं असल्यामुळें निरनिराळ्या जातींत तेढ उत्पन्न होण्याचें कारण नव्हतें. गांवाच्या मर्यादित परिसरांत प्रत्येक व्यक्तीचा दुसरीशीं वारंवार संबंध येत असल्यामुळें साहचर्यांतून सलोख्याची वाढ होई. तसेंच दळणवळणाच्या साधनांच्या अभावीं अनेक गांवांतून विखुरलेल्या एकाच जातीच्या माणसांची संघटना होणें दुष्कर होतें. म्हणून ग्रामसंस्था जोंपर्यंत सुरक्षित होती तोंपर्यंत जातिसंस्थेंतील फुटीर प्रवृत्तींना फारसा वाव मिळाला नाहीं. इंग्रजी राजवटींत जीं नवीं शहरें उदयास आलीं, त्यामध्यें पाश्चात्यांच्या धर्तीवर स्पर्धाप्रधान अर्थव्यवस्था जन्मास आली. त्यामुळें ग्रामसंस्थेचा पाया ढांसळला, पण जातिसंस्थेवर एकदम आघात झाला नाहीं. ग्रामसंस्था ही मुख्यतः रूढीवर अधिष्ठित होती. जातिसंस्थेचा मात्र धर्मभावनेशीं घनिष्ठ संबंध होता; आणि तिचे बंधहि जास्त बळकट होते. इंग्रजसरकारनें धार्मिक व सामाजिक बाबतींत तटस्थतेचें धोरण पत्करलें होतें. तरीदेखील लोकव्यवहारांत घराण्याच्या प्रतिष्ठेऐवजीं व्यक्तीच्या कर्तृत्वाला महत्त्व येऊं लागतांच जातीचीं बंधनें हळुहळू ढिलीं पडूं लागलीं. जातपंचायतीचा दराराहि कमी होत चालला. ब्रिटिशांच्या स्पर्धेमुळें नव्या उद्योगधंद्यांची येथें स्वतंत्रपणें वाढ होऊं शकली नाहीं. त्यामुळें द्रव्यार्जनाच्या ईर्षेनें जातिबंधनें झुगारून देऊन वेगवेगळ्या नवीन क्षेत्रांत पदार्पण करण्याचा प्रश्नच आमच्यापुढें उपस्थित झाला नाहीं. उलट आर्थिक दृष्ट्या सगळ्यांचीच कुचंबणा होत राहिल्यानें सामाजिक सुरक्षिततेसाठीं जातिनिष्ठेवर अवलंबून राहण्याची लोकांना सवय जडली. म्हणून समाजधारणेंत जातिसंस्थेला जरी आतां कांहीं कार्यभाग उरला नाहीं, तरी लोकांची सामाजिक अहंता आपआपल्या जातीपुरतीच मर्यादित राहिली. मोठ्या प्रमाणावर औद्योगीकरण होऊन हिंदुस्थानांत नवी यंत्रप्रधान अर्थव्यवस्था विकास पावली असती, तर कदाचित् जातीचे पाश आपोआप गळून पडले

असते. पण मंदगतीनें वाटचाल करणारी भांडवलदारी अर्थपद्धति समाजांतील सर्व गटांना एकाच वेळीं सामावून घेऊं शकली नाहीं. त्यामुळें ज्यांच्या पाठीशीं अनेक शतकांची सांस्कृतिक परंपरा होती, अशा उच्चवर्णीयांमधूनच नवा वरिष्ठ वर्ग पहिल्यानें उदयास आला. कालांतरानें पुढें आलेल्या इतर जातींच्या व्यक्तींना हरएक क्षेत्रांत या उच्चवर्णीयांशीं स्पर्धा करावी लागली. म्हणून आपल्या समाजांत आर्थिक जीवनांतील व्यक्तिगत स्पर्धेला जातीजातींतील चुरशीचें स्वरूप प्राप्त झालें. सामाजिक व सांस्कृतिक दृष्ट्या निरनिराळ्या जातींत कोणतेच ऋणानुबंध नव्हते. म्हणून इंग्रजांच्या कृपाछत्राखालीं भिन्न भिन्न जाती एकमेकांपासून जास्तच दूर गेल्या.

राष्ट्रीयत्वाच्या परिपोषासाठीं या विकृत जातिनिष्ठेला छेद देणारी व्यापक सामाजिक अहंता निर्माण होणें आवश्यक होतें. कॉंग्रेसमधील पुढाऱ्यांचा तसा प्रयत्नहि चालू होता. पण लोकजागृतीच्या कार्याप्रीत्यर्थ त्यांनीं महाराष्ट्र धर्म, वैदिक संस्कृति यांसारख्या मध्ययुगीन कल्पनांचा आधार घेतल्यानें अभावितपणें जातिभावनेस खतपाणी मिळत गेलें. तसें पाहिलें तर आर्थिक व सामाजिक जीवनांतून धुमसणारा असंतोषच अलीकडील जातिवैमनस्याच्या मुळाशीं होता. नवे सामाजिक संबंध लक्षांत घेऊन या असंतोषाला नव्या जाणिवांच्या द्वारें जर योग्य वळण लावलें गेलें असतें, तर त्यांतून सामाजिक क्रांतीला प्रेरक अशी एक प्रचंड शक्ति निर्माण झाली असती. पण एकजुटीच्या नांवाखालीं राष्ट्रसभेनें सामाजिक जीवनांतील संघर्षाचे प्रश्न हाताळण्याचें टाळलें. म्हणून राजकीय ऐक्य फक्त वरवरचेंच राहिलें. एकराष्ट्रीयत्वाचीं गीतें गाऊनहि प्रत्यक्ष व्यवहारांत बहुतेक लोक जातीच्याच नव्हे तर पोटजातीच्याहि सीमा ओलांडूं शकले नाहींत. म्हणून भांडवलदारी अर्थव्यवस्थेपुढें जातिसंस्थेचा जरी निभाव लागला नाहीं, तरी शैक्षणिक व सामाजिक क्षेत्रांत जातिनिष्ठ संस्थांचा फार सुळसुळाट झाला.

ब्रिटिशांनीं भारतांतील या संकुचित जातीय वृत्तीचा आपलें आसन टिकवून धरण्यासाठीं यथेच्छ उपयोग करून घेतला. अल्पसंख्याकांना स्वतंत्र मतदारसंघाच्या जाळ्यांत गुंतवून आणि जातिवादी पुढाऱ्यांना अवास्तव महत्त्व देऊन राष्ट्रीय चळवळीशीं फटकून वागणाऱ्या सरकारधार्जिण्या नेत्यांचा

एक वर्ग त्यांनीं तयार करून ठेवला. त्यामुळें राष्ट्रीय भूमिकेवरून निरनिराळ्या जातींत सहकार्य होणें अवघड होऊन बसलें.सामान्य जनतेला झगडण्यास उद्युक्त करणारा जहाल आर्थिक कार्यक्रम हातीं घेण्याची वडीलधाऱ्या राष्ट्रीय पुढाऱ्यांची इच्छा नव्हती. बहुजनसमाजाच्या संघटनेकडे दुर्लक्ष करून त्यांनीं जातिवादी नेत्यांशीं पुनःपुन्हा तडजोड घडवून आणण्यासाठींच धडपड केली. त्यामुळें दिवसानुदिवस जातीय प्रश्न जास्तच उपद्रवकारक होत गेला.

जातिवादाचा हा प्रश्न कायमचा निकालांत काढण्यास ज्या मूलगामी उपायांची आवश्यकता होती ते योजण्याच्या बाबतींत राष्ट्रवादाच्या पुरस्कर्त्यांनीं जरी टाळाटाळ केली, तरी सामाजिक क्रांतीच्या दृष्टीनें या कार्यावर सर्व सामर्थ्य एकवटणें हें वर्गवाद्यांचें कर्तव्य होतें. सामाजिक जीवनांतील अंतःसंघर्षाचें वर्गवाद्यांना वावडें नव्हतें. उलट या वर्गभावनेला योग्य वळण दिल्यास ती नवसमाजनिर्मितीस उपकारक ठरेल अशीच त्यांची धारणा होती. औद्योगिक कामगारांचा वर्ग हिंदुस्थानांत फारच लहान असल्यानें वर्गवादाच्या प्रचारास येथें अनुकूल परिस्थिति लाभली नाहीं. परकीयांशी लढा करून राजकीय स्वातंत्र्य मिळविण्यांतच सर्व वर्गांचें हित असल्यामुळें कॉंग्रेससारख्या प्रत्यक्ष कार्य करणाऱ्या संस्थांनीं अंतर्गत विरोधापेक्षा राष्ट्रीय ऐक्यावर नेहमींच जास्त भर दिला. परंतु हा स्वातंत्र्यलढा यशस्वी होण्यासाठीं देखील किसानकामगारांच्या दैनंदिन गाऱ्हाण्यांची दाद घेऊन त्यांना संघटित करण्याची गरज होती. पण अशा प्रकारें वर्गभावनेस प्रोत्साहन दिलें तर अंतःकलह वाढतो; आणि केवळ राजकीय ध्येयवादाचाच पाठपुरावा केला, तर सामाजिक प्रगति खुंटते व राजकीय चळवळहि निःसत्त्व बनते असा वर्गवादी कार्यकर्त्यांपुढें पेंच येऊन पडला. साम्राज्यशाहीमुळें परतंत्र राष्ट्रांत निर्माण झालेली ही समस्या सोडविण्यासाठीं राष्ट्रवाद आणि वर्गवाद यांचा वास्तववादी भूमिकेवरून मेळ घालणें जरूर होतें. पण हिंदुस्थानांतील वर्गवाद्यांना तें जमलें नाहीं. राष्ट्रवादावर ज्यांनीं जोर दिला, त्यांचा वर्गवाद केवळ कल्पनेंतच राहिला. उलट वर्गवादांतच जे गढून गेले, त्यांना साम्राज्यशाहीविरोधी झगड्यांत जनतेशीं समरस होण्याचें भान राहिलें नाहीं.

राष्ट्रवादाच्या बाबतींत तर वर्गवाद्यांची गफलत झालीच, पण जातीयतेच्या निषेध करतांनाहि त्यांनीं विशेष तारतम्य राखलें नाहीं. वरवर पाहतां जातिवाद जरी सर्वत्र एकसारखाच दिसत असला, तरी भिन्नभिन्न थरांतील जातिवादाचा आशय अगदीं निराळा होता. कांहीं प्रदेशांतील आदिवासी गटांना जाति म्हणून संबोधण्यांत येतें. पण त्यांचे प्रश्न त्या त्या प्रदेशांच्या विकासानें सुटणारे आहेत. कांहीं ठिकाणीं जातीय झगड्यांतून वरिष्ठ वर्गांच्या दोन शाखांतील विरोध व्यक्त झाला आहे. बहुजनसमाजाच्या हातांत सत्ता गेली, तर आपलें भवितव्य काय होणार अशा विवंचनेनें वरिष्ठ वर्गांनीं कित्येक वेळां जातिवादी विचारसरणी पत्करलेली दिसून येते; तर आर्थिक पिळणूक व सामाजिक विषमता यांच्याविरुद्ध झालेल्या बहुजनसमाजाच्या प्रतिक्रियेनें अनेकदां जातीय झगड्याचें रूप धारण केलेलें आढळतें. म्हणून जातिवादावर सरसकट प्रतिगामीपणाचा शिक्का मारून त्यावर आग पाखडणें योग्य होणार नाहीं. जातीय संघर्षांत वाया जाणाऱ्या बहुजनसमाजाच्या या उत्साहाला वळण लावून सामाजिक प्रगतीला त्याचा उपयोग करून घेणें हें आज वर्ग-वाद्यांपुढील महत्त्वाचें काम आहे. परिस्थितीनें वर्गवादाला दिलेलें तें वास्तविक आव्हानच आहे. मुंबईसारख्या मोठ्या शहरांत जेथें वर्गवादी संघटना अस्तित्वांत आल्या तेथें जातिवादी प्रवृत्तींना अंशतः आळा बसला. पण त्यांचें कार्य चारदोन शहरांच्या बाहेर पसरलें नाहीं. खेड्यांतील जातिनिष्ठेवर त्यांच्यामुळें कधीं आघात झाले नाहींत. उलट अलीकडे खेडीं आणि छोटीं शहरें यांमधून वाढत चाललेल्या जातीय वृत्तीचा मोठ्या शहरांतील वर्गसंघटनांवर प्रभाव पडूं लागला आहे.

वर्गवादाच्या अपयशाला परिस्थितीच्या प्रतिकूलतेबरोबर येथील वर्ग-वाद्यांच्या विचारसरणींतील दोषहि कारणीभूत झाले आहेत. परकीय तत्त्वज्ञान येथें जसेंच्या तसें लागूं करण्याच्या अट्टाहासामुळें आपल्या सामाजिक प्रश्नांचा स्वतंत्र बुद्धीनें उलगडा करण्याचा त्यांनीं पुरेसा प्रयत्न केला नाहीं. जातीय प्रश्नांच्या बाबतींत त्यांचें धोरण मूलगामी विचारांपेक्षां तात्कालिक फायद्या-तोट्याच्या वजाबाकीवरच बहुधा अवलंबून राहिलें आहे. जातिवादी पक्षांना वाळींत टाकतांना किंवा त्यांच्याशीं हातमिळवणी करतांना त्यांनीं आपल्या

धोरणांत एकसूत्रीपणा ठेवला नाहीं. मात्र वर्गवादी पक्षांनीं पायाशुद्धतेचा कितीहि आव आणला, तरी जातीयतेपासून ते पूर्णपणें अलिप्त राहूं शकलेले नाहींत. उलट जातिवादी संघटनांनींहि वर्गवादी पक्षांना कितीदां तरी स्वयंस्फूर्तीनें मदत केली आहे. जातिवादाचा प्रश्न आतां कुठल्याहि एका गटापुरता किंवा पक्षापुरता राहिलेला नसून आपलें समग्र जीवनच त्यानें पोखरून टाकलें आहे. सर्वांनाच दिङ्मूढ करून सोडणारा हा प्रश्न कितीहि गुंतागुंतीचा व दुःसाध्य वाटला, तरी तो निर्धारानें सोडविल्याखेरीज समाजवादासारखीं ध्येयें कधींच सत्यसृष्टींत उतरणार नाहींत.



: ७ :

# उपसंहार

**१५ ऑगस्ट** १९४७ रोजीं भारत हें एक स्वतंत्र व सार्वभौम राष्ट्र असल्याचें जाहीर झालें. संयुक्त राष्ट्रसंघटनेंत या देशाला एक मानाचें स्थानहि मिळालें. राष्ट्रीय चळवळीचें स्वातंत्र्यसंपादनाचें ध्येय अशा रीतीनें हस्तगत झालें. मात्र राजकीय सत्ता प्राप्त होऊनहि देशांतील आर्थिक व सामाजिक प्रश्न अजून सुटलेले नाहींत. भारतांतील दैन्य व दुःख यांचें खापर आपण आतांपर्यंत इंग्रजांच्या माथ्यावर फोडीत होतों. परंतु इंग्रजांच्या साम्राज्यलालसेप्रमाणेंच आपल्या रूढ समाजव्यवस्थेंतील अंतर्गत दोषहि या पारतंत्र्याला व मागासलेपणाला कारणीभूत होते. आपल्या राष्ट्रवादाचें स्वरूप बऱ्हंशीं निषेधपर असल्यामुळें सामाजिक सुधारणेकडे राजकीय पुढाऱ्यांनीं विशेष लक्ष दिलें नाहीं. उलट पक्षापक्षांतील व जातीजातींतील एकजूट कायम राखण्यासाठीं सामाजिक प्रश्नांचा मूलगामी दृष्टीनें विचार करण्याचें कामहि स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत पुढें ढकलण्यांत आलें. म्हणूनच दारिद्र्य, बेकारी, अज्ञान, निरक्षरता, जातिवाद, वर्गकलह आणि प्रांतिक हेवेदावे अशांसारखे प्रश्न आज आ वासून आपल्यासमोर उभे आहेत; आणि त्यांच्या निर्णयावर आपल्या सामाजिक पुनर्घटनेच्या कार्याचें यशापयश अवलंबून आहे.

## संघराज्य आणि प्रादेशिक घटक

भारतीय संघराज्यासमोरील या निरनिराळ्या प्रश्नांमध्यें प्रदेश राज्यांच्या पुनर्घटनेचा प्रश्न हा लोकांच्या जिव्हाळ्याचा व अत्यंत निकडीचा आहे. सध्यांचीं प्रदेशराज्यें म्हणजे इंग्रजांनीं राज्यकारभाराच्या सोयीसाठीं पाडलेले प्रांत होत. कोणत्याहि विशिष्ट तत्त्वांवर त्यांची उभारणी झालेली नाहीं. वेगवेगळी भाषिक, सांस्कृतिक किंवा राजकीय परंपरा असलेले लोक प्रत्येक राज्यांत एकत्र आलेले आहेत; आणि वाढत्या लोकजागृतीबरोबर निरनिराळ्या भाषिक घटकांतील तेढ तीव्र स्वरूप धारण करीत आहे. ही तेढ नाहींशी होऊन प्रत्येक घटकाला इतरांच्या सहकार्यानें पण स्वतंत्रपणें आपला विकास करून घेण्यास वाव मिळावा म्हणून भाषावार प्रांतरचनेची मागणी पुढें आली. या मागणीला लोकमताचें पाठबळ मिळून 'संयुक्त महाराष्ट्र', 'महागुजरात', 'संयुक्त कर्नाटक', 'विशाल आंध्र' अशा अनेक चळवळी जन्मास आल्या. तेव्हां या प्रश्नाचा विचार करून राज्यांच्या पुनर्रचनेबद्दल शिफारशी करण्यासाठीं भारतसरकारनें एका कमिशनची नेमणूक केली आहे. अशा वेळीं राष्ट्र म्हणजे काय, त्याचे घटक कोणते, संघराज्यांत केंद्रीय सरकार व प्रादेशिक राज्यें यांचे परस्परसंबंध कोणत्या प्रकारचे असावेत याबद्दलच्या विचारांना चालना मिळणें क्रमप्राप्त आहे.

राष्ट्र हा शब्द या पुस्तकांत सर्वत्र अखिल भारताला उद्देशूनच योजण्यांत आलेला आहे. परंतु इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इत्यादि युरोपीय राष्ट्रांमध्यें ज्या प्रकारची राजकीय, आर्थिक, भाषिक व सांस्कृतिक एकात्मता दृष्टीस पडते ती भारतासारख्या खंडप्राय देशाला लाभणें प्रायः अशक्यच आहे. युरोपच्या गेल्या तीनचारशें वर्षांचा इतिहास पाहतां असें दिसून येतें कीं राष्ट्रीयत्वाची जाणीव निर्माण होण्यास भाषा हें एक सर्वांत प्रभावी साधन आहे. एकाच प्रदेशांत राहणाऱ्या व एक भाषा बोलणाऱ्या लोकांचा एकमेकांशीं सतत संबंध आल्यावर त्यांच्यामध्यें विशिष्ट प्रकारचे सामाजिक हितसंबंध, संस्था, मनोवृत्ति व परंपरा निर्माण होतात; आणि त्यांच्यामुळें त्या त्या भाषिकांत ऐक्याची व इतरांपासूनच्या वेगळेपणाची जाणीव उत्पन्न होऊं लागते. मात्र

या भावनेंतून राष्ट्रीयत्वाचा उदय होण्यास आर्थिक सहजीवन, सामाजिक संबंधांतील परिवर्तनक्षमता आणि राजसत्तेचें केंद्रीकरण यांचीहि तितकीच आवश्यकता आहे. युरोपमध्यें गेल्या दोनशें वर्षांत निरनिराळ्या प्रदेशांत अशा प्रकारें राजसत्तेचें केंद्रीकरण व औद्योगिक क्रांति घडून येऊन इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इत्यादि राष्ट्रें उदयास आलीं; आणि त्यांच्या विकासाबरोबर आर्थिक व राजकीय क्षेत्रांत प्रत्येक राष्ट्राला सार्वभौमत्वाचे अधिकार मिळालेच पाहिजेत अशी विचारसरणीहि तेथें रूढ झाली.

हिंदुस्थानचा गेल्या दीडशें वर्षांचा इतिहास युरोपहून वेगळा आहे. मध्ययुगामध्यें प्रादेशिक भाषांची व संस्कृतीची जेव्हां येथें उत्पत्ति झाली, तेव्हां त्यांच्या विकासाबरोबर निरनिराळ्या प्रादेशिक गटांमध्यें थोडी पृथगात्मतेची जाणीव होऊं लागली. महाराष्ट्रांत तिला राजकीय स्वायत्ततेचीहि जोड मिळाली. त्यामुळें या एकात्मतेच्या जाणिवेला अधिक स्पष्टता आली. परंतु आर्थिक स्थित्यंतराच्या अभावीं या सांस्कृतिक ऐक्याची राष्ट्रीयत्वामध्यें परिणति होऊं शकली नाहीं.

इंग्रजांनीं भारतांतील निरनिराळ्या प्रांतांना एकछत्री अंमलाखालीं आणलें; आणि वाहतुकीची साधनें उपलब्ध करून त्यांच्यामध्यें आर्थिक देवघेव व विचारविनिमय होण्याची सोय करून दिली; हिंदु धर्म व आर्यांची प्राचीन संस्कृति यांची सर्व प्रांतांना समान पार्श्वभूमि होतीच. त्यांतच इंग्रजी भाषा व उदारमतवादी तत्त्वज्ञान यांच्या झालेल्या संस्कारांची भर पडली; आणि निरनिराळ्या प्रांतांतील सुशिक्षितांमध्यें एक-राष्ट्रीयत्वाची जाणीव प्रथमच निर्माण झाली. मात्र आर्थिक व राजकीय दृष्ट्या सबंध भारतांत जरी एकमारखेपणा आला असला, तरी परंपरेनें चालत आलेली भाषिक घटकांची पृथगात्मता कायमच राहिली. प्रत्येक प्रांतांतील लोकांचा पूर्वेतिहास आणि मनोवृत्ति यामुळें एकाच राष्ट्रभावनेचा आविष्कार प्रत्येक ठिकाणीं निरनिराळ्या स्वरूपांत झाला. म्हणूनच आपल्या राष्ट्रवादाचें स्वरूप पहिल्यापासून दुलग झालें आहे. महाराष्ट्रांतील राष्ट्रवादी विचारांत भारत व महाराष्ट्र या दोहोंसाठींहि राष्ट्र हा शब्द वापरलेला आपणांस आढळून येतो. आर्थिक व राजकीय प्रश्नांचा विचार करतांना येथील तत्त्व-

चिंतकांनीं अखिल भारताला राष्ट्र मानलें; उलट धार्मिक व ऐतिहासिक परंपरेपासून जेव्हां त्यांनीं स्फूर्ति घेतली तेव्हां महाराष्ट्राच्या मोठेपणाची थोरवी गाइली. राजकीय चळवळीसाठीं एकजुटीवर भर देऊन कॉंग्रेसच्या द्वारें अखिल भारतीय व्यासपीठ उभारण्यांत आलें. परंतु विधायक कार्यासाठीं किंवा दैनंदिन कामकाजासाठीं भाषिक प्रांत हाच घटक मानणें राष्ट्रसभेच्या चालकांनाहि भाग पडलें. म्हणून राष्ट्रवादाचें मूलतत्व कोणतें किंवा भारतीय संघराज्यांत या प्रादेशिक घटकांचें स्थान कोणतें यासारखे प्रश्न राष्ट्रवादी चळवळींत अखेरपर्यंत अनिर्णीतच राहिले.

भारताचा अफाट विस्तार आणि भाषा, धर्मपंथ व सामाजिक परंपरा यांनीं उत्पन्न झालेले भेद लक्षांत घेतां युरोपीय राष्ट्रांतील लोकांप्रमाणें आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक सहजीवन येथील नागरिकांना कधींच जगतां येणार नाहीं हें उघड आहे. प्रादेशिक घटकांनाच तशा प्रकारच्या सहजीवनाची परंपरा असल्यामुळें भाषिक राज्यांची निर्मिति करून त्यांना ते जगण्याची संधि देणें लोकशाहीच्या व अंतर्गत सुस्थितीच्या दृष्टीनें आवश्यक आहे. अशा प्रकारच्या प्रांतिक स्वायत्ततेनें भारताच्या एकजुटीला बाध येईल अशी कांहीं विचारवंतांना भीति वाटत असली, तरी ती निराधार आहे. प्रत्येक राष्ट्रकाला स्वयंनिर्णयाचे व सार्वभौमत्वाचे संपूर्ण अधिकार असलेच पाहिजेत ही विचारप्रणालि या भीतीच्या मुळाशीं आहे. परंतु गेल्या पन्नाससाठ वर्षांत युरोपमध्यें घडलेल्या घटनांमुळें या तत्त्वाचा प्रभाव ओसरत चालला आहे. राष्ट्राराष्ट्रांतील आर्थिक, राजकीय व लष्करी संघर्ष तीव्र होत चालल्यामुळें आजच्या जगांत छोट्या राष्ट्रकांना अजिबात स्थान उरलेलें नाहीं. अनेक छोट्या राष्ट्रकांना सामावून घेऊन त्यांच्यामध्यें लोकशाही किंवा समाजवाद यांची व्यापक निष्ठा निर्माण करूं शकलेलीं अमेरिका किंवा सोव्हिएत युनियन अशीं मोठीं राज्येंच सध्यां सर्वत्र आघाडीवर आहेत. आपल्या स्वातंत्र्याचें संरक्षण करण्यासाठीं लष्करी बाबतींतच नव्हे, तर आर्थिक बाबतींतहि सार्वभौमत्वाचें तत्त्व बाजूस सारून एकमेकांशीं सहकार्य करण्याची फ्रान्स व जर्मनी यांसारख्या एका काळच्या बलाढ्य राष्ट्रांवर पाळी आली आहे. अशा परिस्थितींत भाषिक, सांस्कृतिक व राजकीय दृष्ट्या

एकात्म असलेले महाराष्ट्रासारखे प्रादेशिक घटक हीं स्वतंत्र राष्ट्रकें आहेत असें मान्य केलें, तरी त्यांना राजकीय व आर्थिक सार्वभौमत्वाचे अधिकार मिळाले पाहिजेत असा आग्रह धरणें असमंजसपणाचें होईल. आपल्या संस्कृतीच्या विकासासाठीं प्रत्येक राष्ट्रकानें स्वायत्ततेची मागणी करणें स्वाभाविक आहे; आणि तशा विकासाची संधि निरनिराळ्या राष्ट्रकांस देणें संघराज्याचें कर्तव्य आहे. पण जरूर पडेल तेव्हां संघराज्याच्या हितासाठीं आपल्या संकुचित स्वार्थावर पाणी सोडण्यास प्रत्येक राष्ट्रकानें तयार झालें पाहिजे. त्यासाठीं प्रत्येक घटकाचे हक्क आणि जबाबदाऱ्या व संघराज्याचे अधिकार आणि कर्तव्यें यांचा लोकशाही दृष्टीनें आपणांस मेळ घालावा लागेल. यासंबंधांत व्यक्तीचा अहंकार आणि राष्ट्राची अस्मिता, व्यक्तीचे हक्क आणि राष्ट्राचें सार्वभौमत्व यांची अनेक वेळां तुलना केली जाते. पण अशी तुलना करणें वस्तुतः चुकीचें आहे. राष्ट्रवाद व व्यक्तिवाद या दोन्ही विचारप्रणाली एकाच परिस्थितींतून एकाच काळीं जन्मास आल्या. जुन्या परंपरा आणि प्रतिगामी शक्ति यांच्याशीं दोघांनाहि एकदमच सामना करावा लागला. म्हणून राष्ट्रावरहि अनेक वेळां व्यक्तित्वाचा आरोप करण्यांत आला; आणि वैयक्तिक हक्कांच्या तत्त्वज्ञानाच्या आधारेंच राष्ट्राच्या स्वयं-निर्णयाचें तत्त्व स्थापित केलें गेलें. परंतु व्यक्ति निसर्गतःच स्वतःसिद्ध आहे. तिचे तुकडे पाडतां येत नाहींत. तिच्या निरनिराळ्या अवयवांचा एकमेकांशीं साक्षात् संबंध आहे. राष्ट्राचें तसें नाहीं. राष्ट्र ही कालाच्या प्रवाहांत निर्माण झालेली एक सामाजिक संस्था आहे, आणि बदलत्या परिस्थिती-बरोबर तिचें स्वरूप पालटणें केवळ अपरिहार्यच नव्हे, तर श्रेयस्करहि आहे. राष्ट्राचे घटक हे व्यक्तीच्या अवयवांप्रमाणें एकमेकांशीं संलग्न नाहींत; आणि राष्ट्रांतील व्यक्तींहून निराळी अशी त्याची स्वतःची अस्मिताहि नाहीं. राष्ट्र हा शेवटीं विशिष्ट परंपरेनें आणि हितसंबंधांनीं एकत्र आलेल्या व्यक्तींचा समुदाय आहे; आणि त्या व्यक्तींच्या गरजांप्रमाणें राष्ट्राची रचना आणि कार्य यांत बदल होणें आवश्यक आहे.

हें सर्व ध्यानांत घेऊनच प्रादेशिक घटकांचें भारतीय संघराज्यांतील स्थान ठरवावें लागेल. सत्तेच्या विभागणीचें तत्त्व आपल्या राज्यघटनेनें मान्य

केलेंच आहे. आर्थिक नियोजन, संरक्षण इत्यादि बाबतींत मोठ्या राज्याचे फायदे अधिक असल्यानें त्या बाबतींत केंद्रीय सरकारला जास्त अधिकार असणें घटक राज्यांनाहि उपकारकच ठरेल. पण भाषिक व सांस्कृतिक बाबतींत प्रत्येक घटकाचें वैशिष्ट्य कायम राखण्यांत आणि त्याच्या विकासाला संधि देण्यांत सर्वांचेंच हित आहे. प्रसिद्ध आंतरराष्ट्रीय राज्यशास्त्रज्ञ ई. एच. कार म्हणतात, "मानवी संबंध इतके बहुविध व गुंतागुंतीचे आहेत कीं आपल्या निरनिराळ्या प्रेरणांच्या परिपूर्तीसाठीं मानवानें नाना प्रकारच्या लहानमोठ्या संस्था निर्माण कराव्यात हें एक प्रकारें स्वाभाविक व अपरिहार्य आहे. राष्ट्रवादाच्या विधायक स्वरूपांत अंगभूत असलेल्या समानधर्मित्वाच्या आणि राजकीय व सांस्कृतिक परंपरेच्या विकासाला त्यामुळें पुष्कळच वाव मिळेल. आर्थिक व लष्करी दृष्टीनें अनेक राष्ट्रांना एकत्र आणून मोठमोठ्या संघटना उभाराव्या लागतील हे खरें आहे. परंतु त्याच्या योगानें राजकीय व सांस्कृतिक घटकांच्या स्वायत्ततेला बाध येण्याचें कारण नाहीं. उलट अशा प्रकारच्या परस्परावलंबी निष्ठा निर्माण करणें हाच सर्वंकष हुकूमशाही टाळण्याचा एकच एक पर्याय आहे."*

## राष्ट्रवाद आणि आंतरराष्ट्रवाद

आंतरराष्ट्रवादाचें वरील तत्त्व भारतीय राजकारणाप्रमाणेंच जागतिक

---

* 'The complexity of human relations fortunately makes it natural and imperative for human beings to combine for various purposes in a variety of groups of varying size and comprehensiveness; and this leaves abundant scope for the development of that community of feeling, of political and cultural tradition, which is the constructive side of nationalism. The existence of multi-national units of military and economic organization does not stand in the way of the administrative and cultural units thus encouraging a system of over-lapping and interlocking loyalties which is in the last resort the sole alternative to sheer totalitarianism.' E. H. Carr : *Nationalism and After* p. 59.

राजकारणाला लागू करण्यावर साऱ्या मानवजातीचें भवितव्य आज अवलंबून आहे. सुदैवानें हिंदुस्थानांत तरी राष्ट्रीय चळवळीची गेल्या शंभर वर्षांची परंपरा, आजची परिस्थिति आणि लोकांची मनोवृत्ति ही आंतरराष्ट्रवादाला पोषक आहेत. परतंत्र राष्ट्रांचा राष्ट्रवाद हा पुरोगामी व प्रतिकारात्मक असल्यामुळें आंतरराष्ट्रवादाशीं त्याचा विरोध असण्याचें वस्तुतः कांहीं कारण नाहीं. परराष्ट्रांवर आक्रमण करण्याची ज्यांच्यामध्यें ताकद नाहीं अशा लोकांचा इतरांची सहानुभूति संपादण्याकडे कल असणें स्वाभाविक आहे. शिवाय इंग्लंडमधील ज्या उदारमतवादी विचारसरणीचा हिंदुस्थानांतील राष्ट्रवादी विचारांवर प्रभाव पडला ती आंतरराष्ट्रवादावरच अधिष्ठित होती. सरकारनें लोकव्यवहारांत ढवळाढवळ न करण्याचें धोरण पत्करलें तर मानवाच्या नैसर्गिक स्वभावधर्मानुसार सर्वत्र शांतता आणि सहकार्य यांचें साम्राज्य प्रस्थापित होईल अशी उदारमतवाद्यांची श्रद्धा होती. त्यांच्या तत्त्वज्ञानावर विश्वास ठेवून येथील राष्ट्रवाद्यांनींहि साम्राज्यांतर्गत स्वराज्यापुरतें आपलें ध्येय मर्यादित ठेवलें होतें. सत्तादानाबाबत इंग्रजांनीं चालविलेल्या दिरंगाईला कंटाळून १९२९ सालीं राष्ट्रसभेनें राजकीय सार्वभौमत्वाच्या तत्त्वाची घोषणा केली. तरीहि प्रत्यक्षांत वसाहतीच्या स्वराज्यावर तडजोड करण्याची हिंदी नेत्यांनीं वारंवार तयारी दाखविली होती. सत्तासंक्रमणाच्या वेळीं इंग्रजांनीं दाखविलेल्या समजूतदारपणामुळें ही सलोख्याची भावना शेवटपर्यंत कायम राहिली. म्हणूनच स्वतंत्र भारत आजहि स्वखुषीनें ब्रिटिश राष्ट्रकुलाचा सभासद राहिला आहे.

उदारमतवादी पक्षाला ओहोटी लागल्यावर हिंदी राष्ट्रवाद्यांनीं इंग्लडमधील मजूर पक्षावर आपली भिस्त ठेवली. उदारमतवाद्यांकडून आंतरराष्ट्रवादाचा वारसा त्यांना मिळाला होता. मजूर पक्षाचा भांडवलशाहीशीं विरोध असल्यामुळें हिंदी राष्ट्रीय चळवळीबद्दल त्याला सहानुभूति होती. म्हणून टिळकांनीं इंग्लंडमधील आपल्या वास्तव्यांत मजूर पक्षाला एक लहानशी देणगीहि दिली. मात्र टिळकांचें धोरण वास्तववादी असलें, तरी त्यांनीं पत्करलेली संस्कृतिनिष्ठ भावनाप्रधान राष्ट्रवादाची विचारसरणी आंतरराष्ट्रवादाशीं विसंगत होती. सद्यकालीन परिस्थितींत राष्ट्राराष्ट्रांमध्यें असलेला विरोध त्यांना दिसून आला. पण त्या विरोधाचें मूळ नाहींसें करण्यासाठीं

जगांतील इतर देशांत चाललेल्या चळवळींशीं राष्ट्रसभेचा संबंध जोडण्याची त्यांना आवश्यकता वाटली नाहीं. दहशतवादी क्रांतिकारकांची वैचारिक बैठकहि टिळकांहून भिन्न नव्हती. स्वदेशांत तुरुंगवासाचा धोका असल्यामुळें त्यांना आयुष्याचा बराच काळ परदेशांत काढावा लागला. परदेशांतील क्रांतिकारकांच्या ओळखी करूनच हिंदी क्रांतिकारकांनीं शस्त्रविद्या संपादन केली. परंतु व्यापक तत्त्वज्ञानाच्या अभावीं या स्नेहसंबंधांतून त्यांच्या ठिकाणीं आंतरराष्ट्रीय निष्ठा जागृत झाली नाहीं. राष्ट्रीयत्व हेंच त्यांचें अखेरपर्यंत एकमेव मूल्य राहिलें.

पहिल्या महायुद्धामुळें आक्रमक राष्ट्रवादी विचारप्रणालीचे परिणाम जगाच्या नजरेस आले; आणि मानवी संस्कृतीचा संपूर्ण नाश टाळावयाचा असेल, तर यापुढें राष्ट्रांच्या सार्वभौमत्वावर कांहीं बंधनें घालणें जरूर आहे याची जगांतील विचारवंतांना जाणीव होऊं लागली. आपापसांतील तंटे युद्ध न करतां सलोख्यानें मिटवावेत ह्या उद्देशानें राष्ट्रसंघाची स्थापना झाली; मात्र प्रत्यक्षांत आपल्या हक्कांवर मर्यादा घालून घेण्याची कोणत्याच बलाढ्य राष्ट्राची तयारी नसल्यानें राष्ट्रसंघाचे शांततेचे प्रयत्न सफल झाले नाहींत. तरीहि अनेक आंतरराष्ट्रीय परिषदा, आंतरराष्ट्रीय मजूर संघ आणि आंतरराष्ट्रीय न्यायालय यांच्या कार्यामुळें आंतरराष्ट्रवादी विचारसरणीचा बराच प्रसार झाला.

पहिल्या महायुद्धानंतर हिंदुस्थानचेंहि इतर राष्ट्रांच्या प्रश्नांकडे अधिक लक्ष जाऊं लागलें. राजकीय चळवळीचीं सूत्रें या काळांत महात्माजींच्या हातांत होतीं. गांधीजींचा अध्यात्मनिष्ठ मानवतावाद आंतरराष्ट्रवादाला पोषकच होता. सत्य आणि अहिंसा हीं चिरंतन मूल्यें गांधीजींनीं संकुचित राष्ट्रहिताहून श्रेष्ठ मानलीं होतीं. म्हणून इंग्रजांच्या साम्राज्यवादाला जरी त्यांनीं विरोध केला, तरी त्यांचें गुणग्रहण करण्यास ते नेहमीच तत्पर असत. परंतु आपल्या राष्ट्रापुढील अंतर्गत प्रश्न त्यांना मूलगामी व निकडीचे वाटल्यामुळें आंतरराष्ट्रीय राजकारणाकडे त्यांनीं विशेष लक्ष दिलें नाहीं.

राष्ट्रसभेच्या चळवळीचा जगांतील इतर देशांमध्यें स्वातंत्र्यप्राप्तीप्रीत्यर्थ चाललेल्या चळवळींशीं संबंध जोडण्याचें काम जवाहरलाल नेहरूंनीं केलें.

नेहरूंचा आंतरराष्ट्रवाद हें त्यांच्या समाजवादी विचारसरणीचें एक अंग होतें. राष्ट्राराष्ट्रांतील संघर्षाला कारणीभूत असणाऱ्या आर्थिक व राजकीय प्रवृत्तींचा समाजवाद्यांनींच प्रथम शास्त्रशुद्ध रीतीनें अभ्यास केला होता. जागतिक बाजारपेठा काबीज करण्यासाठीं निरनिराळ्या राष्ट्रांतील भांडवलदारवर्गांत चाललेल्या स्पर्धेतून युद्धांचा प्रादुर्भाव होतो असा समाजवादी विचारप्रणालीचा एक सिद्धान्त आहे. म्हणून स्पर्धेवर आधारलेली प्रचलित अर्थव्यवस्था बदलून सहकार्य व नियोजन यांच्यावर आधारलेली नवी अर्थव्यवस्था स्थापन करण्यासाठीं एकमेकांस साहाय्य करण्याचा समाजवादी विचारवंतांनीं सर्व देशांतील कामगारांना आदेश दिला; आणि त्यांना एकत्र आणण्यासाठीं आंतरराष्ट्रीय संस्थाहि स्थापन केल्या. हिंदुस्थानांतील वर्गवादी पक्षहि पहिल्या-पासून आंतरराष्ट्रवादी होते. पण राष्ट्रीय चळवळीवर त्यांचें विशेष वजन नसल्यामुळें त्यांच्या आंतरराष्ट्रवादाचा तिच्यावर प्रत्यक्ष प्रभाव पडला नाहीं.

जवाहरलाल नेहरूंच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रसभेनें एक स्वतंत्र परराष्ट्रीय धोरण आंखलें. निरनिराळ्या देशांतील स्वातंत्र्यचळवळींना तिनें पाठिंबा दिला; आणि अनेक आंतरराष्ट्रीय परिषदांना आपले प्रतिनिधि पाठविले. राष्ट्रीय चळवळींतील परराष्ट्रीय धोरणाची ही परंपराच आज नेहरू पुढें चालवीत आहेत. म्हणून तिसऱ्या महायुद्धाचा धोका टळून जगांत शांतता नांदावी यासाठीं राष्ट्राराष्ट्रांतील तेढ कमी करण्याचा त्यांचा प्रयत्न चालू आहे. जागतिक राष्ट्रसंघटनेचा सभासद झाल्यावर भारतानें आपल्या शेजाऱ्यांशीं चाललेल्या झगड्यांत स्वतःवर बंधनें घालून घेण्याची तयारी दर्शविली ही गोष्ट आपणांस निःसंशय भूषणास्पद आहे. मात्र आज जगांत पडलेल्या दोन्ही गटांपासून अलिप्त राहून भारताला आपलें तटस्थतेचें धोरण असेंच पुढें चालू ठेवावयाचें असेल, तर आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी व सामर्थ्यवान् होण्यावांचून त्याला गत्यंतर नाहीं. म्हणून आज तरी भारताच्या दृष्टीनें आंतरराष्ट्रीय प्रश्नांपेक्षां अंतर्गत प्रश्नच अधिक जिव्हाळ्याचे आहेत.

औद्योगिक विकास, सामाजिक समता व लोकसत्ताक राज्यव्यवस्था हीं आपल्या राज्यघटनेचीं प्रेरक तत्त्वें आहेत. औद्योगिक विकासाच्या दृष्टीनें आर्थिक नियोजनाचें तत्त्व आपण मान्य केलें आहेच. देशांतील बहुतेक पक्षांनीं

समाजवाद हें आपलें ध्येय असल्याच्या घोषणाहि केल्या आहेत. पण हें समाजवादाचें ध्येय खरोखर मूर्त स्वरूपांत यावयाचें असेल, तर मूलगामी विचारक्रांतीची आणि संघटित प्रयत्नांची गरज आहे. समाजवादाचे वारे जरी सर्वत्र खेळत असले, तरी खेड्यापाड्यांतील अज्ञानी जनता अजून मनानें मध्ययुगांतच वावरत आहे. धर्म, रूढि, दैववाद यांचा बहुजन-समाजाच्या मनावरील पगडा अजून नाहींसा झालेला नाहीं. म्हणून देशामध्यें लोकशाही आणि समाजवाद हीं खऱ्या अर्थानें स्थापन व्हावयाचीं असतील, तर बहुसंख्य जनतेचे प्रश्न हातीं घेऊन ते सोडविण्यासाठीं क्रियाशील संघटना उभारण्याची आणि त्यांच्या द्वारें लोकांना नव्या मूल्यांची जाणीव करून देण्याची आवश्यकता आहे. प्रभावशाली राजकीय पक्षच हें काम करूं शकतील. पण लोकशाही तत्त्वाच्या व परंपरेच्या खंबीर पायावर येथील पक्षांची अद्याप बांधणी झालेली नाहीं. राजकारणाचा नैतिक दर्जा सुधारण्याचा गांधीजींचा तीस वर्षांचा प्रयत्न विफल ठरून राजकारण हा संधिसाधु लोकांचा प्रांत बनूं पहात आहे. त्यांतील धकाधकीला कंटाळून कोणत्या तरी विधायक कार्याकडे वळण्याची महाराष्ट्रांतील निष्ठावंत कार्यकर्त्यांची वृत्ति दिसून येते. पण राजसत्तेच्या मदतीशिवाय ह्या विधायक कार्याचें उद्दिष्ट कधींच पूर्णांशानें सफल होणार नाहीं. सत्ता आणि शिक्षण, सुधारणा आणि संस्करण यांचा बरोबर मेळ घातला गेला तरच महाराष्ट्राचे काय किंवा भारताचे काय अंतर्गत प्रश्न नजीकच्या काळांत गुण्यागोविंदानें सुटण्याची आशा आहे.



# संदर्भ – सूचि

## चुकीची दुरुस्ती

| पृ. | ओ. | चूक | दुरुस्ती |
|---|---|---|---|
| ३२ | ६ | रघूजी आंग्र्या | रघूजी भांग्र्या |
| १०१ | पृष्ठ–शीर्षक : | राष्ट्रवादाचा उदय | राष्ट्रवाद आणि व्यक्तिवाद |
| १०७ | ,, | राष्ट्रवाद आणि व्यक्तिवाद | स्वातंत्र्य आणि लोकशाही |